गुरंमळणें—अकि. गोडसर होणें; गाभुळणें (पेरू, आंबा इ० ); पिकण्यापर्यंत येणें. गुरंभा-भी-वि. पाडाचें; गदरलेलें; गाभुळलेलें (फळ).

गुरमळणें—अकि. १ गुणगुणणें; गुळमुळणें; पुटपुटणें; चांचरत, अस्पष्ट बोलणें. २ गुटमळणें; गोंधळणें; भवांकणें; कांकूं, अळंटळं करणें. ३ गुटमळणें; गमणें; रेंगाळणें; वेळ दवडणें.

गुरमा, गुरमाई, गुरमी—पुस्त्री. मस्ती; आवेश; ताठा; धुंदी; ऐट (कैफ, तारुण्य, विद्या इ० ची). 'प्रहर दिसा रविवारीं सर्व आले भारव गुरमीस।' –ऐपो ३९८. २ जेवणानंतर बसांत होणारी, औषधानें होणारी जळजळ, आग. ३ रांगाचा झटका. ४ जागरणानें होणारी डोळ्यांची जळजळ, लाली. [फा. गर्मी]

गुरव—पु. एक ब्राह्मणेतर पुजारी जात किंवा तींतील व्यक्ति. विशेषतः शंकराची पूजा करणारी जात; एक बलुतेदार; गांवच्या देवाचा पुजारी; याशिवाय याचा धंदा वाजंत्री वाजविणें, द्रोणपत्रावळी लावणें इ० [का. गोरव=भिक्षावेषांत शंकर; शैव भिक्षेकरी; धनगरांचा उपाध्याय] म्ह० १ देवळांची गेली घांट व गुरवाचें गेलें चऱ्हाट (झ्याट). गुरवकी–स्त्री. गुरवाचा धंदा (देवपूजादि कर्म), हक्क, वृत्ति वगैरे. ०डा–पु. (निंदार्थी) गुरव. [गुरव+डा निंदार्थी प्रत्यय] ०पुंज–पु. शेतकऱ्याकडून गुरवाला देण्यासाठीं सरकारनें वसूल केलेला–घेतलेला –हक्क; गुरवाचा धान्यांतील वाटा, बलुतें. गुरवालय–पु. (गो.) गुरव लोकांची वस्ती, वाडा. गुरवी–वि. गुरवासंबंधीं (पान, पत्रावळ इ० ). गुरवीण–स्त्री. गुरवजातीची स्त्री.

गुरवळी, गुरळी—स्त्री. एक पक्वान्न; गुळाची पोळी; साखरपुरी; गुळवरी. 'अनारसे फेणिया गुरवळिया।' –जै ९४. ५२. [गुळवरी वर्णव्यत्यासानें]

गुरवा—वि. श्रेष्ठ [सं. गुरु, गुर्वी]

गुरवार—वि (कु. गो.) गरोदर. [गर्भार]

गुर(रा)ला-ळी—पुस्त्री. चूळ; गुळणा. 'उदकामधें सांडी गुरळी।' –दा २.१.६४. [ध्व.]

गुराखी-ख्या—पु. गोवारी; गुरें राखणारा; गोपाल. [सं. गोरक्षक; प्रा. गोरक्ख] म्ह० गुराख्यानें गुरें टाकलीं म्हणून बरघनी टाकील काय.

गुराब-ध, गुराबा-बा—स्त्री. एक लढाऊ मोठें गलबत. हें फक्त अरबी समुद्रांतच चालत असून याची घडण विशिष्ट प्रकाराची असे. 'स्वर्वेलि मंडपींच्या भवसिंधूंतील या गुराबा ज्या।' मोउद्योग १३.१७३. 'चालीच्या गुराबा बहुत थोर ना बहुत लहान ऐशिया मध्यरीतीनें सजाव्या.' –मराबा ३४. [फा. घुराब्; इं. ग्रॅब]

गुराळ—गुऱ्हाळ पहा.

गुरु—पु. १ मंत्रोपदेशक. २ धार्मिक उपाध्याय. धार्मिक संस्कार इ० करणारा. ३ उपनयन संस्कारामध्यें गायत्र्युपदेश करणारा. ४ शास्त्रें इ० शिकविणारा; विद्यादाता. 'सकोप दिसती गुरु क्षणभरीच जे तापले।' –केका ८८. (यावरून) ५ (ल. निंदार्थी.) फूस, भर, प्रोत्साहन देणारा वाईट मसलत देणारा माणूस. ६ पिता; बाप; पूज्य, वडील माणूस. 'गाति जनमेजया तव गुरुच्या आश्चर्य मरण जननाचें।' –मोअश्व ४.८०. ७ या नांवाचा ग्रह. बृहस्पति; देवांचा गुरु. 'वृत्रारिप्रति वदला गुरु ज्या या भद्रधामनीतीतें।' –मोसभा ६.७०. (सामा.) शिक्षक; मास्तर; आचार्य. ९ –संबोधन. अहो! लब्धप्रतिष्ठित; बोवाजी! म्ह० गुरुची विद्या गुरुस फळली–भोंवली=लोकांस फसविण्याची युक्ति ज्याला शिकविली त्यानेंच त्याला (शिकविणाराला) फसविलें. सामाशब्द– ०किल्ली–स्त्री. १ न समजणारें, खोल, गूढ लिखाण, प्रबंध, मंत्र (गुरूनें सांगितल्याखेरीज न समजणारें). २ (सामा.) गूढ; कठिण गोष्ट, शंका. ३ खुबी; मख्खी; मर्म (कुलंगड्याचें); गूढ उकलण्याची युक्ति. 'प्रकरण जरा जड आहे, पण तुझ्यापासून तिला नरम करण्याची गुरुकिल्ली आतां शिकलोंच आहे.' –त्राटिका [गुरु+किल्ली=फक्त गुरूलाच चालवितां येणारी किल्ली] ०कुल–न. गुरूचें कुटुंब. २ गुरूनें विद्यार्थ्यांना पुत्रवत् मानून, त्यांचे खाणें, पिणें, विद्याभ्यास इ० सर्व सोय लावणारी पाठशाळा; प्राचीन आश्रमपद्धति. [सं.] ०कृपा–स्त्री. गुरूची मर्जी, आशीर्वाद. 'गुरुकृपा संपादन केली असतां विद्या लवकर येते.' ०क्रम–पु. गुरुपरंपरागत, अधिकृत शिक्षण. [सं.] ०गम्य–वि. ज्याच्या समजुतीस गुरु लागतो असें; गुरुकिल्ली लागणारें; दुर्बोध; गहन (श्लोक, वचन ग्रंथभाग). गम्य पहा. 'कां गुरुगम्य हन ठाय।' –ज्ञा ६. ४५१. [सं.] ०जन–पु. पूज्य, माननीय व्यक्ति; वडील माणसें. 'कधि गुरुजनीं सतीची शिवला ज्या कुमुदिनीस असदर्क।' –मोसंशयरत्नमाला १३. (नवनीत पृ. ३५०). वडीलधारीं माणसें; मानाची मंडळी. ०जनसभा–स्त्री. १ (खि.) युनायटेड चर्च ऑफ नॉर्दर्न इंडियाच्या एका विशिष्ट क्षेत्रांतील चर्चेसच्या आचार्य व प्रातिनिधिक वडिलांची सभा. २ इंग्लंडचे चर्चच्या एखाद्या पाळकीच्या आचार्यांची व मंडळीच्या अनेक कामांत त्याची मदत करणारांची प्रातिनिधिक सभा. हे सहाय्यक वडीलच असावेत असें नाहीं. गुरुजी–पु. गुरु; शिक्षक; आचार्य; पुरोहित. गुरुतल्पग-तल्पी–पु. १ गुरुपत्नीशीं गमन करणारा. २ (ल.) मातेसमान स्त्रीपाशीं गमन करणारा; महापापी; नीच. [सं. गुरु+तल्प+ग] ०दक्षिणा–स्त्री. विद्या संपल्यानंतर शिष्यानें गुरुस द्यावयाची देणगी, संभावना; शिकण्याची फी. [सं.]

०द्रव्य-न. आपल्या गुरूची मालमत्ता. (समासांत)गुरुद्रव्यहरण-साधन-अपहार-अभिलाष. [सं.] ०द्रोह-पु. गुरूचा द्वेष; गुरूचा गुन्हा करणें; गुरूचा विश्वासघात. [सं.] ०द्रोही-वि. गुरूचा द्वेष करणारा; गुरूशीं वैर करणारा. 'मित्रद्रोही गुरुद्रोही। विश्वद्रोही देवद्रोही।' [सं.] ०द्वार-न. शीखांच्या गुरूंनीं स्थापन केलेलें देऊळ. (सामा.) शिखांचें देऊळ. ०परंपरा-स्त्री. आपला गुरु, गुरूचा गुरु, त्याचा गुरु असा गुरूचा वंश. ०पीठ-न. गुरूचें राहण्याचें ठिकाण; गुरूची गादी. [सं.] ०पुत्र-पु. १ गुरूचा मुलगा. २ साधुसंतांमध्यें वाढलेला व त्यांच्याप्रमाणें वागणारा; सत्पुरुषानें उपदेश केलेला; साधु; शिष्य. [सं.] ०पुरुष-पु. नवरा; पति. 'व्रतोपवास करावा। गुरुपुरुष निरोपानें।' -गुच ३५.८७. [सं.] ०पूजा-स्त्री. १ कार्यारंभीं राशीस प्रतिकूल असल्यास करावयाची बृहस्पतीची पूजा. २ स्वगुरूची पूजा. ०पौर्णिमा-स्त्री. आषाढी पौर्णिमा, यादिवशीं आपला मंत्रोपदेशक गुरु, संन्यासी इ० ची पूजा करतात. [सं.] ०प्रचीति-स्त्री. १ गुरूची पारख, गुणदोष परीक्षा. २ गुरूचा अनुभव (बरा-वाईट) येणें. [सं. प्रतीति] ०प्रसाद-पु. १ गुरूची कृपा. २ गुरूच्या आशीर्वादाचें फल (विद्या, कौशल्य, भरभराट इ०). ३ (ल.) भांग; अफू; तंबाखू. [सं.] ०बंधु-पु. १ एकाच गुरूचे दोन किंवा अनेक शिष्य, ते परस्पर. २ सहाध्यायी. ३ स्वतःच्या गुरूचा पुत्र. [सं.] ०मंडली-गुरु करणें. (महारांच्या जातींत)-बदलापूर १७५. ०मंत्र-पु. १ गुरूनें सांगितलेला धार्मिक उपदेश; गुरूनें उपदेशिलेला मंत्र. २ (ल.) बरी-वाईट सल्ला, मसलत; गुप्त शिकवण (बहुतेक वाईट अर्थानें.) (क्रि० देणें; शिकविणें; सांगणें; म्हणणें). [सं.] ०मार्ग-पु. गुरूनें उपदेशिलेल्या मंत्रासंबंधीं जपादि विधि. [सं.] ०मुख-न. अध्ययनाच्या प्रसंगीं गुरूच्या मुखांतून वाक्य निघणें; प्रत्यक्ष गुरूचा उपदेश, शिकवण. 'ही माझी विद्या ऐकीव आहे, हिला गुरुमुख नाहीं.' [सं.] ०शाप-पु. गुरूनें रागानें काढलेलें वचन; गुरूनें दिलेला शाप. [सं.] ०शिक्षा-स्त्री. १ अभ्यासाविषयीं गुरूनें लावून दिलेले नियम; गुरूची शिकवण. २ नियम वगैरे मोडल्याबद्दल गुरूनें दिलेला मार. [सं.] ०संप्रदाय-पु. १ गुरुमार्ग पहा. २ विशिष्ट गुरूचे अनुयायी लोकांचा आचार, परंपरा वगैरे. ०संप्रदायी-वि. १ गुरुमार्गी. २ विशिष्ट गुरूचे अनुयायी (लोक, जमाव, संघ). ०स्मरण करणें-कार्यास आरंभ करणें. गुरूपदेश, गुरोपदेश-पु. गुरूनें दिलेला मंत्र.

गुरु-पु. सूर्यमालेंतील सर्वांत मोठा ग्रह; गुरु अर्थ ५ पहा. दर तेरा महिन्यास एक राशि अशी याची गति आहे. याच्या अस्ताचा काल मंगलकार्यांस वर्ज्य मानितात. गुरु सिंह राशींत असला म्हणजे सिंहस्थ व कन्याराशीस असला म्हणजे त्यास कन्यागत म्हणतात. ०पुष्ययोग-पु. एक चांगला योग. गुरुवारीं पुष्य नक्षत्र आलें असतां त्या योगास म्हणतात. हा अमृतसिद्धि योग होय. ०बल-न. स्वराशीस या ग्रहाचें आनुकूल्य असणें. जन्मलग्नकुंडलींत हा ग्रह दोन, पांच, सात, नऊ, यास्थानीं असलेला शुभ मानितात व या कालीं गुरुबल आहे असें मानितात. ०वार-पु. बृहस्पतीचा वार; (रविवारापासून) आठवड्यांतील पांचवा दिवस; बृहस्पतवार.

गुरु-वि. १ जड; लठ्ठ; वजनदार. २ मोठा विस्तृत. 'हा गुरु मार्गुय गा।' -गीता १३.२२२. ३ पचण्यास जड. (पदार्थ). ४ दीर्घ; द्विमात्र (स्वर). ५ कठिण; अवघड; भारी (वस्तु). ६ आदरणीय; मान्य; पूज्य. सामाशब्द- ०घंटाळ-वि. (कों.) मवडंवर माजविणारी. गुरुत्व-न. १ (यंत्रशास्त्र) पृथ्वीच्या मध्याकडे पडण्याचा पदार्थांचा कल. २ जडत्व; वजन. ३ मोठेपणा; थोरपणा. 'तोषेविना शाङ्र्गधर। गुरुत्वासीं।' -ज्ञा १६.२६. ४ गुरुपणा. गुरुत्वमध्य-पु. गुरुत्वाकर्षणाचा मध्यबिंदु; ज्या बिंदूसभोंवतीं पदार्थाच्या सर्व भागांचें कोणत्याहि स्थितींत समतोलन होतें तो बिंदु. गुरुत्वशून्य-वि. मुळींच वजन नसलेलें. गुरुत्वाकर्षण-न. विश्वांतील वस्तूंचें परस्पराकर्षण; एक जड पदार्थ दुसऱ्याला आपणाकडे ओढतो अशी स्थिति; पृथ्वीमध्याकडे ओढण्याची शक्ति. गुरुलघुविचार-पु. १ बोलण्यांत, लिहिण्यांत ऱ्हस्वदीर्घ स्वरांचा काळजीपूर्वक विचार; ऱ्हस्वदीर्घाकडे लक्ष. २ बारीक, खोल विचार; सर्व बाजूंनीं विचार. ०वती-वि. महत्व; मोठेपणा; विस्तार. 'ग्रंथ गुरुवतीचा ठावो।' -ज्ञा १.३३. गुरुवी-वि. थोर; मोठा; श्रेष्ठ. 'अर्जुना हे गुरुवी भक्ती।' -ज्ञा ९.२२८. गुरुवृत्त-न. मोठें वर्तुल, मंडळ.

गुरु-पु. (संगीत) दोन मात्रांचा काल.

गुरुमुखी-स्त्री. शिखांच्या धर्मग्रंथाची लिपि; ही देवनागरीवरून बनली आहे. [गुरु+मुख]

गुरुरी-स्त्री. ताठा; गर्व; मस्ती; गुर्मी; जोर. 'जुनरकर मोगलानेंहि आपले ठाई गुरुरी आणली आहे.' -पेद ३.१४७. [अर. गुरूर]

गुरुळा-स्त्री. चूळ; गुळणी. 'मीचि होईन सागळा। करूं ठाईन गुरुळा।' -ज्ञा १३.४१८. [ध्व.]

गुरु(रो)ळी-गुरळी; गुरवळी पहा.

गुरू-पु. गोवर, देवी या दुखण्याचे वाहणारे फोड. मुकागुरू- न वाहणारे फोड. [का. गुरुळ=खळी, छिद्र]

गुरूं-न. चतुष्पाद प्राणी; जनावर; गाय; बैल; म्हैस; रेडा; ढोरूं; ढोर. एक पशुजात. [तुल० इंग्रजि. गुरूव; पो. गुरेई] म्ह० लेंकरांगुरांनीं वाडा साजरा. ०ढोरू-र-न. गुरूं;

गवत खाणारें सशृंग जनावर. ०वासरूं–न. १ सर्व लहानमोठ्या जनावरांना व्यापक शब्द; गुरेंढोरें; जनावरें. २ जनावर; गुरूं; कळपांतील एक.

गुरूप–ब–वि. गुडुप; गडद; अंधाराचा; अंधारमय; दाट (अंधकार). [अर. ग़ुरूब=सूर्यास्त; का. गुड्डपु, गुडपु=लोखंडाची कांब.]

गुरूळ–पु. (कों.) शेताच्या बांधाला खेकड्यानें पाडलेलें भोंक; यांतून शेतांतील पाणी वाहून जातें. [का. गुरुळें=खळी, भोंक]

गुरोडा–पु. १ जनावरांचा गोठा; गायवाडा. २ (निंदार्थी) गुरूं. [गुरूं]

गुर्की–गुरकी पहा. वचक; दाब. 'लांगेलुंगे कवि भेदरले बवच्यावर त्याची गुर्की।' –होला १८.

गुर्गेलॅत–न. (गो.) थंड पाण्याचा माठ; मातीची घागर. [पोर्तु]

गुर्गेटा–पु. (गो.) कोळी; किडा.

गुर्जर–पु. गुजराथ देश; त्यांतील रहिवासी. गुजर पहा. [सं.]

गुर्दा–गदा, गुडदा पहा. 'बारा हजार गुर्दा।' –ऐपो ४४. [फा. गुर्ज़]

गुर्फटणें–गुरफटणें पहा.

गुर्बत–स्त्री. नम्रता; अजिजी; काकळूत. 'इंग्रेज गुर्बत दाखवून काव साधण्यास चुकणार नाहीत.' –दिमरा १.५४. [अर. ग़ुर्बत]

गुर्मळणें–गुरमळणें पहा.

गुर्मी–गुरमी पहा.

गुर्रावणें–अक्रि. (व.) गुरगुर करून अंगावर येणें; गुरकावणें पहा. [ध्व. गुर्र]

गुर्वचार–पु. (गो.) गरोदरपण; गर्भारपण.

गुर्वार–वि. (गो.) गरोदर; गर्भार. गरवार पहा.

गुर्विणी–वि. गर्भिणी; गरोदर; गर्भार. 'आणि सत्तासंभोगें। गुर्विणी होय।' –ज्ञा १४.८९. [सं.]

गुऱ्हाळ–न. १ ऊंस गाळण्याचा चरक; ऊंस गाळण्याचें यंत्र. २ चरक असलेली जागा. ३ गूळ तयार करण्याचा कारखाना (यंत्र, इमारत इत्यादि सर्व उपकरणांसह). ४ ऊंस गाळण्याचा, गूळ करण्याचा धंदा, काम. 'गुऱ्हाळ–लागलें–चाललें–संपलें.' ५ (ल.) लांबट हकीकत, भाषण; कंटाळवाणें भाषण; ऱ्हाट. 'पण श्रीमंताचें गुऱ्हाळ आवरेना त्याला ते काय करणार।' –ख. [गुळहार] म्ह० गोष्टीचें गुऱ्हाळ पायलीचा फराळ. ०घर–न. गूळ करण्याचा कारखाना; गुऱ्हाळ. म्ह० गुऱ्हाळघर आणि लगीनघर बरोबर.

गुल–स्त्री. गहजब? –शर. [?]

गुल–पु. १ फूल. २ दिव्याची काजळी; कीट. ३ आगकाडीला लावलेलें फास्फरस व गंधक यांचें पूट. ४ हुक्क्यांतील कोळशाचा गोळा, विस्तव. [फा. गुल्] सामाशब्द–गुल(ला) अनार–पु. १ डाळिंबीचें फूल; अनारकली. 'सखे गुलामनार गुलचमन निशिचा रमण तसा गोजिरा तुझा मुखवटा।' –होला १०४. २ डाळिंबी रंग. ३ एक झाड; गुलनार पहा. –वि. डाळिंबी रंगाची (शालजोडी, वस्त्र इ०). [फा. गुल्+अनार्=डाळिंब] ०कंद–पु. एक लेह; गुलाबाच्या फुलांच्या पाकळ्या व खडीसाखर यांचें मिश्रण; गुलाबाचा मुरब्बा. ०काडी–स्त्री. आगकाडी. ०केश–पु. कोंबड्याच्या शेंडी–तुऱ्याप्रमाणें असलेलें फूल. ०गुलाब–पु. गुलाबाचें फूल; गुलाब. ०गेंद–पु. फुलाचा गुच्छ. 'संगीन कुच भरदार, सजिव सजदार, गुलगेंद उसासले।' –प्रला ११३. ०चनी–चिनी, गुलाचीन–स्त्री. फुलाची एक जात; गुलदावरी. ०चांदणी–स्त्री. एक फूल. ०चिमणी–स्त्री. पिंवळ्या पोटाची चिमणी (पक्षी). ०छबू–छ्बू–पु. निशीगंध; हें झाड कंदापासुन होतें. फुलें विशेषतः सायंकाळीं उमलतात, त्यांस फार मधुर वास येतो. फूल लांबट असुन सफेत रंगाचें असतें व देंठ थोडासा वक्र असतो. –वि. मोहक चेहेरा असलेला (माणूस). [फा. गुलिशब्बो] ०छडी–जाफिरी–स्त्री. एक प्रकारचें फूल. [फा. गुलिजाफ़री] ०जार–वि. १ नाजूक; सुंदर; मोहक; रमणीय. २ टवटवीत; प्रफुल्ल. ३ संपन्न; ऐश्वर्ययुक्त. 'बाच्छाई तक्त गुलजार दिसे रंगबहार पुण्याची वस्ती।' –होला १७८. ४ आबाद. 'महाल उंडणगांव वगैरे महाल गुलजार दिले.' –रा ८.२१२. [फा. गुल्ज़ार्=गुलाबांची बाग] ०टोप–पु. १ एक फुलझाड; व त्याचें फूल. 'पर्यातक गुलटोप गुलगुलित जळीं कमलणवावरी।' –प्रला १५५. २ कबूतराची जात. ०तुरा–पु. १ (व.) शंखासुर नांवाचें फुलझाड. २ गुलमोहोर; यास पिंवळ्या व तांबड्या रंगाचीं झुपकेदार फुलें येतात. फुलास वास नसतो. याचें मूळ काढ्यांत घालतात, लांकूड बळकट असल्यामुळें खुंटे करतात. 'डवना मरवा गुल्तुरा। वाळागीर पडदे आणवा।' –पला ४.२२. ०दान–न. १ फुलें ठेवण्याचें पात्र. २ पेटलेला तोंडा न विझतां ठेवण्याची लोखंडी पेटी. ३ कात्रीनें दिव्याची कोजळी काढण्याचें पात्र. 'गुलदानें रुप्याचीं' –पया २८७. 'गुलदानांनीं गुल काढा.' –पया २८७. ०दावदी–री–ली–स्त्री. एक फुल व झाड. 'शरिर सुकुमार कीं गुलदावरी।' –प्रला ११०. ०नार–१ डाळिंबीचें फूल; गुलअनार. २ डाळिंबाची एक जात; हीस फक्त फुलें येतात, फळ धरत नाहीं. –कृषि ७०१. ०फूल–न.

गोजिव्हा; गुलेगोजबान. –मुंव्या १४०. ०बदन–वि. गुलाबाच्या फुलासारखा सुंदर देह असणारी (स्त्री). –पु. १ तापत्यांतील (रेशमी वस्त्र) एक भेद, प्रकार; एक प्रकारचें कापड. 'दाविली कंचुकी गुलवदनी।' –प्रला १४९. 'गुलवदनें रेशमी' –ऐटि ५.२३. २ एक रंग. ०बस–बाशी, गुलबाक्षी–स्त्री. सायंकाळी फुलणारें एक फुलझाड. याचीं फुलें पांढरीं, तांबडीं, जांभळीं वगैरे अनेक प्रकारचीं असतात. 'छत्रें आरशांचीं वधिवलीं रंग गुलबासी।' –प्रला ९२. –न. या झाडाचें फूल. –वि. या फुलाच्या रंगाचें. [फा. गुलि–अब्बास] ०मखमल–पुस्त्री. एक फूलझाड व त्याचें फूल; गेंद; छेंडू. ०मस–पु. रानटी पांढरें फूल व त्याचें झाड. ०मेंधी–मेंहंधी–स्त्री. मेंदीचा एक प्रकार व त्याचें फूल. ०मोहोर–पु. १ एक फुलझाड. २ (शोभेची दारू) दारूच्या झाडाचा एक प्रकार. एका बांबूस १६ लोखंडी तारा बांधतात, शेंडयाला फुलबाजी व इतरत्र रंगीबेरंगी ज्योती बांधतात. (जळता) सुईनळा दाखविल्याबरोबर ४ मिनिटांत फटफट आवाज होऊन तारा पडतात.

**गुलकणें**—अक्रि. खुषींत येऊन रंगेलपणें, मनापासून, मोकळेपणानें, सदयतेनें हंसणें. गुल–कण–कन–कर हीं अव्ययें **गुलकणें–हांसणें, गुळणी टाकणें**–यांबरोबरहि योजतात. [ध्व. फा. गुल=फूल? गुलकी. खुदकन पहा]

**गुलकातरी**—स्त्री. गुल, दिव्याची कोजळी काढण्याची कातरी; दिव्याची कातरी. [फा. गुल्=कोजळी+कातरी]

**गुलकावणी**—स्त्री. हुलकावणी; ढोंग; फसवणूक; मायावी भाषण, व्यापार, रोख, झोंक, आव. (क्रि० दाखविणें; करणें).

**गुलकाविणें**—सक्रि. १ हुलकावणी दाखविणें; फसविणें. २ आरडाओरड करून दबावणीनें घाबरें करणें; गोंधळविणें. ३ (मान शब्दाबरोबर प्रयोग) ओवाळणें; हलविणें (मान); चेष्टेनें मान मुरडणें. घुलकाविणें पहा. **गुलकावून घेणें**–गुलकाविणें. अर्थ २ पहा.

**गुलकी**—स्त्री. स्वच्छंदी, रंगेल हास्य; दयापूर्ण हास्य; सरल हास्य. (क्रि० येणें; टाकणें; मारणें).

**गुलखैरा–रू**—पु. एक चिनी–इराणी फुलझाड. [फा. गुलखार?]

**गुलगुल, गुलुगुलु**—क्रिवि. हळु हळु; कानाला गोड लागेल अशा प्रकारें; हलक्या स्वरांत (प्रेम, रहस्य, इ०च्या गोष्टी बोलणें). [ध्व. सं. गुलगुलाय्; प्रा. गुलगुल] ०गोष्टी–स्त्रीअव. हळु हळु चाललेल्या प्रेमाच्या गोष्टी; कानगोष्टी. 'कोणी आपल्या घरींच बायकोशीं गुलगुल गोष्टी बोलण्यास ...... निजून गेले.' –सुदे ७५.

**गुलगुलीत**—वि. १ जाड; लड्ड; गुबगुबीत; गोंडस (शरीर). २ मऊ व दबणारी (उशी, गादी). ३ फुगलेला आणि मऊ (भात). ४ (सामा.) फार मऊ (पदार्थ). [हिं. गुलगुलाना= मऊ करणें]

**गुलगुलेत**—पु. (गो.) पाण्याचा बुडबुडा.

**गुलड**—स्त्री. एक झाड.

**गुलडा**—पु. १ (विणकाम) ज्यास ताण्याच्या नळीकडचीं शेवटें बांधलेलीं असतात असें वेलीवरील आडवें लांकूड. ताण्याची दुसरी टोकें झुंपणी अथवा झुंपणें याला बांधलेलीं असतात. गुलडा आणि झुंपणी यांनीं ताणा ताणला जातो. २ वेलीच्या डोक्यावरील आडवी दांडी; हिच्या प्रत्येक टोंकास एक लांब पेंडकें–पेंडे–पेंढी असते. ही सुताऱ्याला (गुलड्याशीं समांतर असणाऱ्या काठीला) स्थिर राखते.

**गुलदस्त**—पु. १ फुलांचा गुच्छ; झेला. २ गंजीफांतील एक संज्ञा. चार चार पानांचा एक एक दस्त. पानें वाटतांना एक दस्त तसाच न पाहतां ठेवून शेवटीं तो लावतात. **गुलदस्तांत ठेवणें**–१ राखून ठेवणें. २ लपवून ठेवणें; गुप्त राखणें. 'पण तें सध्यां गुलदस्तांतच राहूं देणें बरें' –नपुक १८. [फा.]

**गुलदस्ता**—पु. (माळवी) फूलपात्र; फुल ठेवण्याचें भांडें.

**गुलप(फ)णें**—अक्रि. १ (कों.) कष्टानें उच्चारणें; बोलतांना अडखळणें; चाचरणें. २ पायांत पाय पडतील असें चालणें; पायांना आलेपिले देत चालणें. ३ गुरफटणें पहा.

**गुलमाल**—क्रिवि. नापत्ता. (क्रि० करणें; पळविणें).

**गुलमुच्छा**—स्त्री. गलमिशा; गालावरील राखलेले केस. 'गुलमुच्छा होत्या त्या वरच्या बाजूस चढविलेल्या.' –सूर्योदय १४७.

**गुलमेख**—स्त्री. एक प्रकारचा खिळा; गाठदार खिळा. हा लहान असून याचें डोकें पसरट असतें. [फा.]

**गुलसान**—स्त्री. (गो.) बंदुकींत घालण्याची शिशाची गोळी. [फा. गुल्=गोळी]

**गुलहवस–हौस**—स्त्री. ऐषआरामाची आसक्ति; चैनबाजी. **गुलहंसी–हवसी–हौशी–हौसी**–वि. चैनबाज; ऐषारामी; आंबटशोकी; विषयी; हौशी व खर्चिक. [फा. गुल्हवस्]

**गुलाई**—स्त्री. (गवंडी काम) गोलाई; कोपऱ्याच्या बाहेरील भिंतीचा गोल भाग. 'दरजा भरलेले सांधे स्पष्ट दिसून दरजा सारख्या जाडीच्या असून चपटया गुलाईच्या किंवा घोटणीच्या असाव्या.' –मॅरेट ७९. [हिं. गुलाई; सं. गोल]

**गुलाडी**—स्त्री. (विणकाम) करवतीकांठाचें विणकाम करण्याचें यंत्र; चाळा. [फा. गुल्=फूल]

**गुलाब**—पु. १ एक फुलझाड. हें झाड सरळ वाढतें. याचीं पानें सुंदर असून झाडाच्या सर्वांगास कांटे असतात. फुलाचा रंग तांबडा, गुलाबी, पिंवळा, पांढरा असतो. फुलांपासून अत्तर

काढतात व गुलकंद तयार करतात. २ त्याचें फूल. ३ गुलाबपाणी व अत्तर. 'गुलाबपाणी उत्तमसे तीन चार पाठविलेत तर बरें होतें.' -ब्रच २५३. [ फा. गुल्=फूल+आब=पाणी; हिं. गुलाब= गुलाबाचें फूल ] ०कंद-पु. गुलकंद. 'गुलाबकंद वजन पक्के एक शेर पाठविला तो घेणें.' -ब्रच १२९. ०कळी-स्त्री. गुलाबाची कळी; ही औषधी असते. ०चक्री-छकडी-स्त्री. साखरेच्या पाकांतील गुलाबाची मिठाई. ०छकडी-स्त्री. १ चटकचांदणी स्त्री; एक प्रकारचें गाणें. ०छडी-पु. खडीसाखरेची कांडी. ०जांब-जामून-पुन. मैद्यामध्यें तूप व खवा मिसळून तुपांत तळून आणि नंतर जिलबीसारखी पाकांत मुरत टाकून केलेली मिठाई. -गृशि १.४३६. [ फा. गुलाबजामन्=एक फळ ] ०दान-दाणी-नस्त्री. गुलाबपाणी ठेवण्याची व तें शिंपडण्याची झारी. [ फा. गुलाब्दान् ] गुलाबदान-पु. द्राक्षाची (पांढऱ्या रंगाच्या) एक जात. -कृषि ५१२. ०पाणी-न. गुलाबाच्या फुलापासून तयार केलेलें सुगंधी पाणी. हें पानसुपारीच्या वेळीं अंगावर शिंपडतात. ०पाश-पु.गुलाबदाणी.[ फा. ] ०शकर-स्त्री. गुलाबपाक. 'गुलाब-शकरीच्या वड्या सुमार पन्नास पाठविल्या त्या पावल्या.' -ख १२. ६६३६. ०शेवंतें-न. (गो.) सोन्याचें गुलाबाचें फूल; एक दागिना. गुलाबाचें फूल-न. १ गुलाब. २ गुलजार. ३ (ल.) नाजूक स्त्री, मुल. 'बाईसाहेब, हें ऊन फार कडक आहे बरें ... आपण आपलें हें गुलाबाचें फूल घरांत नेऊन जपून ठेवा.' -त्राटिका. गुलाबी--स्त्री. १ (कोल्हाटी, डोंबारी) दोरावर काम करणारी मुलगी, हिला लाडकें नांव. २ एक लहान झुडुप. -वि. गुलाबविषयक; गुलाबाचा (रंग, वास, अत्तर). ०अत्तर-न. गुलाबाच्या फुलांपासून काढलेलें अत्तर. ०चंदन-न. गुलाबासारख्या वासाचें चंदन; चंदनाची एक जात. ०जांब-जाम-पु. एक फळ; रायजांभूळ. [ फा. गुलाब्-जामन् ] ०झोंप-स्त्री. पहाटेची, थंड वेळेची झोंप. ०थंडी-स्त्री. सौम्य प्रकारची, सुखावह थंड हवा (ही गुलाबांना हितावह असते असें म्हणतात); पहाटेची थंडी.

गुलाम--पु. १ बटकीचा मुलगा; दासीपुत्र. २ कामासाठीं विकत घेतलेला माणूस; दास. ३ (ल.) लुच्चा; बस्ताद; ठक; चोर; हरामखोर; सोदा. (हैदरअलीस उद्देशून) 'गुलामानें दगाच केला होता.' -ख ८७९. ४ पत्त्यांतील गुलाम्या; गुलम्या. (इं.) जॅक. ५ (कौतुकानें) हुषार लहान मुलगा. ६ चंगकांचन गंजिफांतील सहावा रंग. [ अर. गुलाम् ] ०गिरी, गुलामी--स्त्री. १ दास्य; गुलामासारखें राबणें; गुलामवृत्ति; गुलामाप्रमाणें खुशामत. २ सोदेगिरी; शाठ्य; हरामी; लुच्चेगिरी. ३ गुलामांचा व्यापार. ४ (ल.) हांजी हांजी; खुशामत (क्रि० करणें). ०जादा-पु. (शिवीगाळ) हरामखोर; लुच्चा; लबाड. गुलामडा-पु. (तिरस्कारार्थी) गुलाम. गुलामपिचणी-पिसणी-स्त्री. (पत्त्यांचा खेळ) प्रथम पानें वाटतांना एक एक उताणें पान देऊन पहिल्यानें ज्याला गुलाम येईल त्यानें करावयाची पिसणी.

गुलाल--पु. एक रंग; तांबडा रंग दिलेलें पीठ; बाजरी, नाचणी इ० चें पीठ सुरंजी, पतंगी इ० लांकडाच्या पाण्यानें रंगविलेलें असतें ती बुकणी. मंगलप्रसंगीं, उत्सवांत, देवतांच्या जन्मोत्सवांत व जेवणावळीच्या समयीं रांगोळींत व विशेषतः शिमग्यांत याचा उपयोग करतात. [ हिं. ] ०गोटा-पु. गुलाल भरलेला गोळा; पातळ कांचेच्या, लाखेच्या, अभ्रकाच्या गोळ्यांत गुलाल भरून तो ज्याच्या अंगावर फेंकावा त्याच्या अंगावर तो गोळा फुटतो व गुलाल पडतो. शिमग्यांत हे एकमेकांच्या अंगावर फेकीत. 'गुलालगोटे शिवाय ठिवले निरनिराळे अंबारींत।' -ऐपो १९९. गुलाली-वि. १ गुलालाच्या, गुलालासारख्या रंगाचें (वस्त्र). २ गुलालाचा, गुलालासारखा (रंग).

गुलाल--स्त्रीन. गुलबासी पहा. एक फुलझाड व त्याचें फूल.

गुलाला, गुल्लाला--पु. एक फूल झाड.

गुलालाटु--पु. १ (मल्लविद्या) एक कुस्तीचा डाव. याचे दोन प्रकार आहेत. (१) जोडीदाराच्या हाताचें मनगट त्याच्या पायांमधून बाहेर धरून आपला दुसरा हात जोडीदाराच्या बगलेंतून घालून त्याच्या मानेवर पंजा ठेवावा व पंज्यानें जोडीदाराची मान दाबून व त्याच्या पायांतून काढून घेतलेला हात वर उचलून त्याला चीत करावें. (२) जोडीदाराचा एक हात पायांतून बाहेर काढून आपल्या एका हातानें त्याचें मनगट धरावें व दुसऱ्या हातानें जोडीदाराची मान दाबून आपला बाहेरील (उजवा किंवा डावा जो बाहेर असेल तो) पाय त्याच्या मानेवर घालून गुडघ्याच्या लवणीनें जोडीदाराची मान दाबावी व त्यास चीत करावें. [ हिं. ]

गुली--स्त्री. (प्रां.) प्रवाळ. [ हिं. गुली=तांबड्या प्रवाळाची एक जात ]

गुलुंगा--कुलंगा, कुलुंगा पहा.

गुलेल--स्त्री. (व.) गलोल; गोफण. [ हिं. ]

गुलपरी--स्त्री. पुष्पांगना; सुंदरस्त्री. 'उभी गुलपरी नमून या पदीं कर जोडून सेवेमधी।' -पला. [ फा. गुल्+परी ]

गुल्फ--पु. पायाचा घोटा. 'गुल्फद्वय धरिजे।' -ज्ञा ६. १९७. [ सं. ]

गुल्बांग--पु. भुमका; आवई; बोलणें; कंडी. 'बेदरास येण्याचा गुल्बांग दाट होता.' -रा ७.११२. [ फा. ]

गुल्म--पु. १ प्रकुपित वातादि दोषानें कोठ्यांत उत्पन्न होणारा गोळ्यासारखा एक रोग; कुशी, हृदय, नाभी, बस्ती हीं त्याचीं स्थानें होत; वायगोळा. 'एकांतें गुल्म उदरीं।' -गीता

१३.२४९४. २ पाणथरी. ३ विशिष्ट संख्येचा व रचनेचा सैन्यविभाग, तुकडी. तीन सेनामुखांची तुकडी (सेनामुख=३ हत्ती, ३ रथ, ९ घोडे व १५ पायदळ). ४ ग्रंथि; गांठ. ५ गांठ; गोळा; गळूं; गरस. ६ गुंतागुंतीचें व दाट किंवा पसरणारें क्षुप; तृण, वृक्ष, लता व गुल्म हे वनस्पतिक्षेत्रांतील मोठे वर्ग होत. [सं.] ०वात-पु. एक प्रकारचा वात. पोटाची किंवा पाणथरीची सूज. [सं.] गुल्मोदर-न. उदररोगाचा एक प्रकार. [सं.]

गुल्ल—न. (गो.) अतिशय गुंगी; कैफ. -वि. कैफानें उल्ल झालेला; धुंद. [सं. गुड-गुल=गूळ ?]

गुल्ल-ल्ली—पुस्त्री. गलबल. -शर. 'तत्वांचा गल्बला जेथें। निवांत कैचें असेल तेथें। याकारणें गुल्लिपरतें। कोणियेकें असावें।' -दा १३.५.२४. [ध्व.]

गुल्लडाग—पु. तापविलेल्या खिळ्यानें, मुद्रेनें दिलेला डाग, चोचा; पूल. 'गुल्डागांची जांचणी।' -दा ३.७.३४. [फा. गुल्=डागल्याची खूण+डाग]

गुल्ला—पु. (व.) गुकांडा; झुकांडी.

गुल्ली—स्त्री. १ (काशी) विटी; इटी. २ (ओतकाम) धातूचा चूर पुन्हां वितळून त्याची ओतलेली चपटी वाटोळी चकती. [हिं.]

गुल्ली—स्त्री. (व.) लहानसा ढीग, गंज; लहान गुड.

गुल्हेर—वि. शेंदरी; डाळिंबी (रंगाचें). [फा. गुल् ? गुलाल ?]

गुवलणें—उक्रि. (व.) वापरणें.

गुवाड—स्त्री. (राजा.) गुखडी पहा. [गू] गुवाडा-पु. (बे.) घाणेरी. गुवारडो, गुवाड्डॉ. -वि. १ (कु. गो.) घाणेरडा; ओंगळ, घृणाण. २ (ल.) कमी किंमतीचा.

गुवार—स्त्री. (गु.) गोवारी; गवार (भाजी) पहा.

गुवेरें—न. (लहान मूल किंवा आजारी माणूस यांच्या) विष्ठेनें भरलेलें वस्त्र. [गू+चीर, चेल]

गुसपणें—अक्रि. (गो.) गोंधळणें; गुंतणें. गुसपागोंधळ-पु. (गो.) गोंधळ; गुंतागुंत.

गुस(सु)ल—स्त्री. आंघोळ; घुसल पहा. 'आराम होऊन गुसल केली.' -पया ४६७. [अर. घुस्ल्] ०खाना-पु. न्हाणीघर; स्नानगृह; घुसलखाना. [फा. घुस्ल्+खाना]

गुसळण-णें, घुसळीव—घुसळण इ० पहा.

गुंसाई—पु. गोसाई; गोसावी; साधु; हरिदास. गोसावी पहा.

गुस्सा—पु. राग; क्रोध; कोप. [अर्. घुस्सा]

गुह—पु. १ कार्तिकस्वामी. २ रामास गंगापार नेणारा कोळी. [सं.]

गुहा—स्त्री. दरी; कंदरा; घळ; कपार; डोंगर-पर्वतांतील बीळ. [सं. गुप्-गुह, गुहा; तुल० इं. केव्ह]

गुहाडी—(व.) गुधाडी पहा.

गुहिरा—पु. सरडयाच्या जातीचा एक प्राणी; हा इच्छेस येईल त्याप्रमाणें रंग पालटतो. 'कीं गुहिरिया सरडाचे नाना रंग।' -स्वानु १३.२.९७. [गहिरा ?]

गुहिरा—वि. (व.) कुजट स्वभावाचा. 'तिच्या नवऱ्याचा स्वभाव गुहिरा आहे. तो बोलून दाखवीत नसतो.' [सं. गुह्, गूढ]

गुह्य—न. १ जननेंद्रिय; उपस्थ; शिश्न; योनी; भग. २ गुप्त गोष्ट, वर्तमान. -वि. १ खाजगी; एकांताची; आडवळणाची (जागा). २ गुप्त; गूढ; प्रच्छन्न (कृत्य, कारभार, गोष्ट). [सं. गुह्=लपविणें]

गुळकी-खी-खें—स्त्री.न. (शिंपी) गुंडी; विरडें; बटन. २ (दावें इ० च्या) विरडयांत अडकवावयाची गांठ. ३ विरडें व गांठ. (एकत्र, मिळून). ४ (कु. राजा) स्त्रियांचें एक शिरोभूषण; वेणीच्या आंत किंवा अंबाडयाच्या वर घालावयाचें अग्रफूल. [सं. गोलक]

गुळखें—न. (गो.) गोंधळ; लचांड. (गो.) अपुरें. [सं. गोलक]

गुळगुळथापडी, गुळथापडी—स्त्री. १ (लहान मुलास निजविण्यासाठीं हळू हळू थापटणें) गोड गोड भाषण, वर्तन; नरम नरम शब्द. २ गुळगुळीत, संदिग्ध किंवा मोघम भाषण; गुळमुळू बोलणें; याच्या उलट खडसावणें. 'असल्या ठिकाणीं गुळगुळथापडी काय करतोस? तो चोर ठरला, त्याला चोर म्हण. ३ समजूत पाडणारें, वळविणारें, अनुकूल करून घेणारें भाषण, वर्तन; युक्तिप्रयुक्ति. 'त्यां कोण्हाला कांहीं सांगून कोण्हाला कांहीं देऊन अशी सर्वांची गुळगुळथापडी करून अनुकूल केले.'

गुळगुळीत—वि. साफ, मऊ व चकचकीत; नितळ; सफाईदार; खाचखळग्याविरहित; खरखरीत नव्हे असा. [सं. गुल्-गोल; ध्व. गुळ् (मऊ पृष्ठभागावर होणारा)?] ०करणें-(ल.) उलटीसुलटी (हजामत, खरडपट्टी) करणें.

गुळचट, गुळंबा, गुळमट, गुळमटणें, गुळवणीवरी, गुळव्या, गुळसर, गुळार—गूळ मध्यें पहा.

गुळणा-णी—पु.स्त्री. (चूळ भरण्यासाठीं घेतलेलें) तोंडभर पाणी; घोट (क्रि० घेणें) २ (पाण्याची, रक्ताची) टाकलेली चूळ. (क्रि० टाकणें). ३ तोंडांत येणारें पित्त; तोंडांतील व्रण. (क्रि० येणें). ४ तोंड खुळखुळावणें, धुणें; चूळ भरणें. (क्रि० करणें). [ध्व. गुळगुळ; सं. गुलगुलाय्; प्रा. गुलगुल=गुळगुळ आवाज करणें; बोलणें ?] ०धरणें-१ गुप्त ठेवणें; मिठाची

गुळणी धरणें असा प्रयोग रूढ आहे (गुळणी धरल्यावर बोलतां येत नाहीं यावरून अर्थ) २ न बोलणें; तोंड दाबून धरणें. ॰सोडणें-गुह्य फोडणें. **तुपादुधाच्या गुळण्या टाकणें**=संपत्तींत लोळणें; संपत्तींत न्हाणें.

**गुळघवा-गुळधा, गुळधिवा-धुवा**—पूळघवा पहा.

**गुळब-बा, गुळंभ**—नपु.न. गुळुंब-भ पहा.

**गुळंब, गुळम,-मा-मी, गुळाम, गुळीम**—न. (गो. कु.) वाडगें; पितळेची मोठी वाटी. **गुळंब**—न. (वे. गो.) जेवण्याचें कांशाचें पात्र.

**गुळंबा, गुळांब-बा**—पुन. गूळ शब्दांत पहा.

**गुळमु(म)ळणें**—अक्रि. १ गुणगुणणें; तोंडांतल्या तोंडांत बोलणें. २ बोलण्यांत अडखळणें; घुटमळणें; कांकू करणें. [ध्व.]

**गुळमुळीत**—वि. मुळमुळीत; असंदिग्ध; अर्धवट; अस्पष्ट; तोंडांतल्या तोंडांत (भाषण इ०).

**गुळमेख**—स्त्री. मोटेच्या खालच्या चाकाची (कण्याची) आरी.

**गुळवेल**—स्त्री. एक कडूवेल; (कों.) गरुडवेल, गरूळवेल. लॅ. मेनिस्पेर्मम ग्लॅब्रुम; ही औषधांत फार उपयुक्त व महत्वाची असून तुरट, कडू, उष्ण, वीर्योद्दीपक व ज्वरनाशक आहे. बहुतेक सर्व रोगांवर ही उपयोगी पडते. हिला बारीक फळांचे घोंस येतात. घेर इ० विषारी झाडावरील गुळवेल औषधास घेऊं नये. कडू लिंबावर वाढलेली उत्तम. [सं. गुडूची, हिं. गु(गी)लोय; बंगाली गुलंच; गु. गळो; फा. गुलाई; अर. गिलोई; इं. गुलांचा]

**गुळहार**—गुऱ्हाळ पहा. **गुळहारी**—वि. गूळ तयार करणारा. 'कवणी एक गुळहारी असे, तो गुळ करी.' —चक्रधर सिद्धांतसूत्रें ५३.

**गुळ(ला)ला**—पु. 'गुळणा; चूळ. गुळला कीजे राउळें। आरोगणांतीं।' —ऋ ८४. [ध्व]

**गुळांफो**—पु. (कु.) शिजविलेला, पाणी मुरलेला भात.

**गुळी**—स्त्री. नीळ (झाड व त्यापासून होणारा पदार्थ). [गु. गळी] ॰तोळ-पु. निळीच्या एक मण उत्पन्नावर घ्यावयाचा एक रुपयाचा कर.

**गुळी, गुळी साखर**—स्त्री. तांबडट, भरड अशी एक प्रकारची साखर; गुळासारखा रंग असणारी एक प्रकारची साखर. [गूळ]

**गुळी**—स्त्री. १ शौचाच्या वेळीं बाहेर येणारा मलाशय. (क्रि० उतरणें). २ (गो. कु.) गोळी; गुटिका; लहान लाडू. ॰होणें-(गो.) थरकांप होणें. 'गुळी झाली.' =थरकांप झाला.

**गुळीं**—न. १ (कों.) वाल इ० द्विदल धान्याच्या मळणीनंतर निघालेलें, गुरांस घालावयाचें भूस. २ शेंगांचीं टरफलें, झाडाचा पाला, वेलाचे तुकडे इ० मिळून झालेलें गुरांचें खाणें.

**गुळुंब-भ, गुळुंबा, गुळूम**—नपु. १ गरस; गांठ; फोड; गळूं. २ झाडावर येणारी आवाळूसारखी गांठ. ३ बांडगूळ; परोपजीवी वनस्पती. [सं. गुल्म]

**गुळें**—न. (राजा.) (कु.) दुष्काळ-दंग्यामुळें परागंदा झालेला गांव, वस्ती; गुढार, गुढें पहा. [का.] ॰येणें-(वे.) पेंढार येणें.

**गुळ्यें**—न. (कों.) (अव. गुळिया). मासे पकडण्याच्या जाळ्यास वजनासाठीं लाविलेली चपटी कडी. [गोळी; किंवा का. गुळ=लोखंडी गज, सांपळा ?]

**गू**—पु. १ विष्ठा (मनुष्याची); हाग. २ धातूचा गंज; मळ. ३ डोळ्यांतील पू, मळ. ४ (ल.) दारू. [सं.] (ग्राम्र.) **गूकाडी करणें**-(काडीनें गू चिवडणें) १ एखाद्याचे दोष पुन्हां पुन्हां उच्चारणें. २ अतिशय त्रास देणें. ३ अतिशय अपकीर्ति करणें. ४ नासविणें; बिघडविणें; खराब करणें. **गूचा भाऊ पाद पादाचा भाऊ गू**-दोघेही सारखेच बदमाष लुच्चे. **गू चिवडणें**-(ल.) वेडें होणें; बावचळणें. **गूजाळणें**-१ अंगांतील पिशाच्च जाण्यासाठीं अंगांत येणाऱ्यापुढें विष्ठा जाळतात तो प्रयोग. २ (ल.) एखाद्याला अगदीं खिजविणारें, अपमानाचें, चिडविणारें कृत्य करणें. **गू जाळून धूर घेणें**-वाईट कृत्य करून त्याचा आनंद मानणें, त्याची मौज करणें, पाहाणें. म्ह० **गूवांत धोंडा टाकावा आणि शितोडा घ्यावा**=वाईट वर्तणुकीचें फळ भोगणें. **गुवावरून ओढणें**-अतिशय फजीती, अपमान करणें, छी थू करणें. सामाशब्द- **गूघाण**-स्त्री. वाईट परिस्थिति. 'कोल्हापुरांत न भूतो न भविष्यति अशी राज्यव्यवस्थेचे कामीं गूघाण झाली असें इतिहास बोलतो.' —केका आर्या ७. —वि. वाईट; त्याज्य. **गूघाण करणें**-नासणें; बिघडणें. **गूमाणूस**-पु. घाणेरडा, अव्यवस्थित माणूस. **गुवांतील कवडी घेणारा**-वि. अतिशय कंजूष. **गुवावरची माशी**-स्त्री. एक प्रकारची माशी.

**गूज**—न. गुप्त गोष्ट; गुह्य. हित, निज, या शब्दाशीं जोडून उपयोग. गुज पहा. 'बरें पाहतां गूज तेथेंचि राहे।' —राम १५५. **निजगूज**—न. स्वतःचें, आपलें गुह्य. [सं. गुज्]

**गूड-ढ**—न. गुड पहा. १ कणसासकट बांधलेली पेंढी, सुडी (जोंधळा, बाजरी वगैरेची). 'बाजरीचें -जोंधळयाचें-गव्हाचें-गूड-ढ.' २ (खा.) गंजी; ढीग; रास; सुडी. ३ (व.) कडब्याची वगैरे उंच व देवळाच्या शिखरासारखी रचलेली गंज. [का. गुड्ड=डोंगर. गुडी=देऊळ]

**गूढ**—न. १ कूट; कोडें. २ ग्रंथांतील, लेखांतील कठिण स्थळ; मेख. ३ पेंच; पंचायत. ४ गुप्त गोष्ट; गुह्य. 'म्हणौनि आघवेंचि गूढें। जें पाऊनि अति उघडें।' —ज्ञा १८.१३५२. —वि.

१ गहन; दुर्ज्ञेय; दुर्बोध; अगम्य. ( विद्या, शास्त्र ). 'तया हा परमार्थ गूढ ।' –ज्ञा ३.१७९. २ खोल; गुप्त; अज्ञात ( काम, गोष्ट ). [ सं. ] ( वाप्र. ) ०वाटणें–दिसणें–पडणें, गूढांत पडणें–विचारांत पडणें, कोडें, पेंच पडणें. सामाशब्द– ०अर्थ–पु. १ पुरलेला ठेवा; सूमिगत द्रव्य. गूढ अर्थसंचयाच्या भ्रमानें कोणी ... ... घरांतील जमीन ठोक ठोकून पहावी ... ...' –नि ७९६. २ गुप्त गोष्ट, हेतु, अभिप्राय. [ गूढ+अर्थ ] ०चार–पु. गुप्त बातमीदार; हेर; गुप्तपोलीस. गूढज, गूढपुत्र, गूढोत्पन्न–पुं. ( कायदा ) हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें बारा पुत्रांपैकीं चवथा; बेबाप्या: बापाचा पत्ता नसलेला. ०जत्रु–वि. फोपशा; लठ्ठ-निरंजन ( ज्याचें गळ्याचें हाड मांसांत गुप्त झालें आहे असा ). [सं. जत्रु=गळ्याचें हाड] गूढणें–समाविष्ट होणें; व्यापणें. 'दर्पु कामक्रोधीं गूढला ।' –ज्ञा १६.३९६. ०साक्षी–पु. ( कायदा ) गुप्त साक्षीदार. ०स्मृति–स्त्री. ( वैद्यक ) थोडासा स्मृतिभ्रंश; कांहीं वेळानें आठवणें. गूढार्थ–पु. १ समजण्यास कठिण असे ग्रंथ, लेख इ० तील भाग. २–वि. दुर्ज्ञेय; दुर्बोध. [ गूढ+अर्थ ]

गूत–थ—स्त्री. १ गुंतागुंत; तिढा; गांठ. 'दीर्घकाळ ग्रथित ( मराठी भाषेची ) तिची जी गूत ती हातीं घेऊन तिचे पदर सोडवून कांहीं तरी उकलण्याच्या धोरणांत आणून बसवावी.' –दादोबाकृत मराठी भाषेचें व्याकरण प्रस्तावना. ( ३ आ. ) पृ. २१. २ ( कों. ) अव्यवस्थितपणें पडलेलें, तुडविलेलें गवत; गुरांनींच खाण्याजोगें झालेलें गवत. ३ भात्याण्याचा पेंढा बांधतांना त्यांतून खालीं पडणारे भात्याणाचे लहान लहान तुकडे. ४ गुंतवळ. [ गुंतणें; सं. ग्रथित; प्रा. गुत्थ ]

गूथ—स्त्री. ( व. ) सूज.

गूद—पु. १ कंडु; खाज; आग ( क्रि० येणें; सुटणें ). २ ( ल. ) जोर; भर; चढ ( रोग, सांथ, पाऊस इ० चा ).

गून, घून—वि. (तंजा.) कुबडा; पोंक्या. [ का.गूनु=पोंक ]

गूम—वि. नष्ट; गहाळ; गुप्त. 'इनामतीच्या सनदा अलाहिदा आपल्यापाशीं आल्या होत्या त्या फित्रतीकरितां गूम जालिया.' –वाडसनदा १४०. –स्त्री. ( गो. ) गुप्त गोष्ट. [ फा. गुम् ]

गूय—पु. ( खा. ) गूळ पहा.

गूल—पु. ( गो. ) जरीची वीण. [ फा. गुल्=फूल ]

गूल—पुस्त्री. १ ( आगकाडी, मशाल, वात, यांचा ) जळालेला भाग. २ आगकाडीचें टोंक; जो भाग जळतो तो. ३ बंदुक इ० चा तोंडा पेटविल्यावर शेवटीं जो कळीसारखा आकार होतो तो. ४ विस्तवाची काजळी; किटाळ; फुणगी. ५ खिळ्याचा माथा, डोकें. ६ खिळ्याचें डोकें इ० तापवून दिलेला बांटोळा डाग. –पु. गुलाब. गुल पहा. [ फा. गुल् ] ०खिळा–पु. मोठ्या दरवाज्यांत ठोकतां येणारा रोंदाचा खिळा. गूलडाग–गुल्लडाग पहा.

गूल—स्त्री. १ दंगल; आरडाओरड; गलगा. 'तीन रोज उपवास लष्करांत गुल एकच जाहाली.' –पेद २०.१७६. २(ल.) बोभाटा; प्रसिद्धि; जाहीरपणा. 'राञींच गूल झाली असती तर फार वाईट होतें.' –बाळ २.१२७. [ अर. ग़ुला; फा. ग़ुल्-ग़ुला ] ०गलवा–पु. दंगा; बखेडा. 'खंबायतकर मोगल उगेच सरकारचे महाल खाऊन गूल गलव्याचे वेळेस हे शैत्य होतात.' –ऐटि १.८०.

गूळ—पु. आटवलेला उंसाचा रस; पदार्थाला गोडपणा येण्यासाठीं रस आटवून केलेला घन पदार्थ; साखरेचा कच्चा प्रकार, अवस्था; तांबडी साखर. [ सं. गुड; प्रा. गुळ; पाली गुळ; कों. गोड; खा. गूय ] ( वाप्र. ) ०करणें–उपहास, निंदा करणें. ०देणें–हातीं देणें–१ लालूच दाखविणें; लांच देणें. २ फसविणें; भुरळ घालणें; झुलविणें; तोंडावर हात फिरविणें. ०पुन्या वाटणें–हौस पुरविणें. गुळमटणें–१ ( राजा. ) आंबा; चिंच इत्यादींनीं गुळमट, गोडसर होणें. २ गुटमळणें; संदिग्ध, अडखळत बोलणें. म्ह० १ गाढवास गुळाची चव काय? २ जो गुळानें मरतो त्याला विष कशाला? सामाशब्द– ०आंबा, गुळंबा–ळांबा, गुळांब–पु. एक पक्वान्न. गुळाच्या पाकांत शिजविलेल्या आंब्याच्या फोडी; गुळाचा मोरंबा. ०कैरी–स्त्री. ( व. ) गूळ घालून केलेलें विन मोहरीचें आंब्याचें लोणचें. ०खोबरें–न. ( गूळ आणि खोबरें यांचा खाऊ ). १ ( ल. ) निवळ फसवणूक; लांच; लालूच. 'गुळखोबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक बळावा ।' –मो उद्योग ७.९. २ पोकळ भाषण, वचन. ०चट–चीट–मट–वि. १ थोडेंसें गोड; गोडसर. 'येक्या सगें तें कडचट । येक्या सगें तें गुळचट ।' –दा ११.७.१६. २ (तंजा.) गोड; मधुर. ०चट, चीट–गूळसाखर वगैरे गोड पदार्थ. गुळण्णा–पु. (गो.) गुळाचा गणपति. [ गूळ+अण्णा ] गुळत्र–य–न. गूळ, राब, काकवी यांचा समुदाय. 'मद पारा गुळत्र ।' –दा १५.४.१५. गूळदगड–धोंडा–पु. १ गुळाच्या ढेपेंत सांपडणारा दगड. 'गुळासारिखा गुळदगड । परी तो कठिण निचाड ।' –दा ८.५.४७. २ ( ल. ) ढोंगी, कपटी मनुष्य. ०धवा–धाधिवा–धुवा–देवा–धेवा–धावी–पु. केवळ तांबडा नव्हे, केवळ पांढरा नव्हे असा मिश्र रंग; गुळी रंग. –वि. अशा रंगाचा (मोती, इ० पदार्थ ). ०धानी–वि. लालसर; गुळधवा रंगाचा (मोती). ०पापडी–स्त्री. १ एक पक्वान्न; गुळांत पाकविलेल्या रव्याच्या वड्या. २ ( राजा. ) गुळाच्या पाकांत भाजलेली कणीक वगैरे घालून केलेले लाडू. ३( ल. )एखाद्यानें मागें अपराध करून समक्ष गोड गोड, कपटी भाषण करणें; गुळगुळ थापडी; गुळमट; गुळमणी

०पीठ–न. एकमेकांचा दाट स्नेह; मेतकूट; एकी; सलोखा; एक विचार. ०पोळी–स्त्री. गूळ घालून केलेली पोळी. गुळमट, गुळंबट–१ गुळचट अर्थ १ पहा. २ (गो.) आंबटसर. ०मारी–स्त्री. दर उसाच्या मळ्यापाठीमागें २२॥ शेर गूळ द्यावयाचा कर. ०वणी, गुळेणी, गुळोणी–न. १ गुळ मिश्रित पाणी. २ (कु. व.) गुळाच्या पाण्याचें कालवण (पोळीशीं खाण्यासाठीं). यांत कधीं थोडें पीठहि घालतात. [गूळ+पाणी] ०वरी, गुळोरी–स्त्री. एक खाद्य, पक्वान्न; गुरोळी पहा. 'मांडा साखरपांडा गुळवरी।' –एमा २७.२९०.; –ह१०.३४. गुळवा–गुळावा–गुळवी–व्या–गुळव्या, गुळरांध्या–पु. गूळ तयार करणारा. [गुड-वाहक] ०शील–शेल–शेलें–न. (व.) तांबडा भोपळा उकडून त्यांत दूध, गूळ घालून केलेली खीर. गुळाचा गणपती–गणेश–पुवि. १ आळशी; मंद; गलेलठ्ठ; अचळोजी. २ होयबा; बुळा; दुर्बळ; शेणाचा पोहो. म्ह० गुळाचा गणपति गुळाचाच नैवेद्य=वस्तुतः एकच असणाऱ्या दोन व्यक्ती; ज्याचें त्यासच देणें. गुळार, गुळहार–गुऱ्हाळ पहा. गुळेरस–पु. (हेट.) नारळाचें दूध व गूळ घालून केलेलें पिठाचे गोळे यांचें बनविलेलें एक पक्वान्न.

गृध्र—पु. गिधाड; मोठी घार. [सं.] ०व्यूह–पु. गृध्र पक्ष्याच्या आकारासारखी सैन्यरचना. 'गृध्रव्यूह सैन्य रचावें। गृध्रास देखून स्वभावें। गरुड नये त्या स्थळीं।' –जै १२.९३. गृध्रावलीनक(करण)–न. (नृत्य) पाय थोडा गुडघ्यांत वांक-वून पाठीमागें पसरणें व दोन्ही हात पुढें पसरणें.

गृह—न. घर; सदन; आलय; आगर; मंदिर; मकान. [सं.] सामाशब्द– ०कच्छप–पु. कांसवाच्या पाठीच्या आकाराचा दगडी पाटा, खल. ०कर्म–कृत्य–कार्य–धंदा–न. घरकाम; घरगुती धंदा (विशेषतः बायकांचे–झाडसारवणादि). ०कलह–पु. भाऊबंदकी; घरगुती तंटा; यादवी; अंतःकलह. ०कुक्कुट–मार्जार–श्वान–पुन. घर–कोंबडा–मांजर–कुत्रा; पाळलेला कोंबडा वगैरे; पाळीव जनावर. ०छिद्र–न. १ कुटुंबांतील दोष, व्यंग, उणेपणा; खाजगी वाईट गोष्टी; वर्मकर्म. (क्रि० काढणें; बोलणें). 'श्रीमंतांच्या घरोघर दुराचार व गृहच्छिद्रें किती असतात हें जवळजवळच्या लोकांस तरी पूर्णपणें विदित असतें.' –नि. २ (ल.) घरांतील फूट, भेद, बेबनाव; ज्यामुळें तिऱ्हाइताचा शिर-काव, फायदा होईल अशी घरांतील गुप्त, नाजुक गोष्ट. ०जात–गृहदास अर्थ २ पहा. ०दान–न. घर दान करणें. ०दार–न. घराचा पुढचा दरवाजा, दार. ०दास–पु. १ घरांतील चाकर, गुलाम. २ (हिंदु कायदा) दासीपुत्र. ०दासी–स्त्री. मोलकरीण. ०निमग्न–वि. घरच्या गोष्टींत नेहमीं गुंतलेला; फाजील गृहा-सक्त; घरबघा. ०पति–पु. यजमान; घरधनी; मालक. ०प्रवेश–पु. १ सुमुहूर्त पाहून, धार्मिक विधि करून नवीन घरांत समारंभानें रहावयास जाणें; घरभरणी; वास्तुशांति. २ विवाहानंतर नूतन वधूचा स्वगृहीं प्रथम प्रवेश; वरात. ०भंग–पु. घर, कुटुंब, पेढी, मंडळी इ० ची फूट, वाताहत, नाश, मोड; घरादाराचा सत्यानाश. ०भूमि–स्त्री. घराची जागा. ०भेद–पु. १ गृहकलह पहा. यादवी. २ गृहच्छिद्रें, घरांतील बिंग कळण्यासाठीं घरांत भांडण लावणें. ३ घरफोडी; दरवडा. ०भेदी–वि. १ घरांत, कुटुंबांत भांडणें लाव-णारा, उत्पन्न करणारा; घरभेद्या. २ घरांतील बिंगें माहीत अस-णारा. ३ चोर; दरोडेखोर. ०मंडन–न. घराची मांडामांड करणें; घर सुव्यवस्थित राखणें, सुशोभित, अलंकृत, सज्ज.–वि. घरांतील कर्ता पुरुष. घराला भूषणभूत असा माणूस; घराचा अलंकार. ०मंडप–पु. घरांतला, घरालगत घातलेला (रस्त्यावरील–सार्वजनिक नव्हे) मांडव. ०मंत्री–पु. दिवाण–मंत्र्यांपैकीं एक; देशांत शांतता आणि सुव्यवस्था राखणारा मंत्री; (इं.) होममेंबर. ०रत्न–न. (ल.) मुलेंबाळें. 'गृहरत्नानि बालकाः।' ०लंपट–लोलुप–गृहनिमग्न पहा. ०वास–पु. घरांत राहणें; गृहस्थाश्रमी असणें. याच्या उलट अरण्यवास. ०विच्छेद–पु. कुटुंब निर्वंश होणें–करणें; वंशक्षय; कुलक्षय. ०शांति–संमार्जन–शुद्धि–स्त्री. १ घराच्या शुद्धीकरणाचा धार्मिक विधि; वास्तुशांति; सुतेंखेतें, विटाळ, रोग इ० च्या नाशासाठीं केलेला धार्मिक विधि. २ घराची स्वच्छता; सारवण, झाडलोट वगैरे करणें. ०संपत्ति–स्त्री. १ गृहसौख्य; घर चांगलें असण्याचें सौख्य. २ मोठा घरखटला; मोठें कुटुंब; मोठा परिवार. गृहस्त–स्थ–पु. १ घरबारी; गृहस्थाश्रमी; चार आश्रमांपैकीं दुसऱ्या आश्रमांतील व्यक्ति (संन्यासी, अरण्यवासी नव्हे). २ सपत्नीक; सहकुटुंब; कुटुंब-वत्सल; प्रापंचिक; यांच्या उलट फटिंग. ३ कोणी माणूस, इसम, व्यक्ति. ४ भिक्षुक नव्हे तो. ५ कुलीन; सभ्य; भला. गृहस्थ-गिरी–पणा, गृहस्थाई–गृहस्थी–स्त्रीपुस्त्री. १ माणुसकी; सभ्यता; भलेपणा. २ गृहस्थवृत्ति; गृहस्थाचें कर्तव्यकर्म, आचरण. ०स्थधर्म–पु. गृहस्थाश्रम; गृहस्थाचीं कर्तव्यकर्में, वर्तन, वाग-णूक. 'श्रीकृष्ण म्हणे सुता सर्वांत गृहस्थधर्म सन्मत रे।' –मोउद्योग ३.५३. ०स्थभाई–पु. सामान्य नोकरपेशाचा; भिक्षुकीखेरीज धंद्याचा, भिक्षुक नव्हे असा मनुष्य. ०स्थाश्रम–पु. चार आश्रमां-पैकीं दुसरा आश्रम. गृहस्थधर्म पहा. 'आतां स्त्रीकरून यथार्थ। गृहस्थाश्रम संपादी।' ०स्थिति–स्त्री. घरची स्थिति; घरप्रपं-चाची व्यवस्था. ०स्थी–वि. गृहस्थाविषयींची (रीत–भात, वेष, भाषण, डौल, बाणा इत्यादि). ०स्थी अक्षर–न. सुबोध, ठसठशीत, ऐटबाज अक्षर; व्यवहाराला योग्य असें लेखन. ०स्थी कावा–पु. १ घरगुती खर्चाचा बेतबात; टापटीप. २ घराची आर्थिक, पैशासंबंधीं नीट व्यवस्था; मितव्यय. ०स्थी

खर्च–पु. मितव्यय; बेताबात; गृहस्थी कावा. ०स्थी बाणा–पु. १ गृहस्थाची वृत्ति; गृहस्थ धर्म. २ टापटिपीची, व्यवस्थितपणाची वागणूक. ०स्थी खेत–गृहस्थीबाणा अर्थ २ पहा. गृहांगन–ण–न घराचें अंगण. गृहांगना–स्त्री. घरधनीण; मालकीण. गृहांतर–न. दुसरें घर. गृहांतर, गृहाभ्यंतर–न. घराच्या आंतील, खोलींतील भाग. गृहासक्त–वि. गृहनिमग्न पहा. गृहिणी–स्त्री. गृहांगना; घरधनीण; पत्नी; बायको; विवाहित स्त्री. गृह्य–वि. १ घरासंबंधीं; घरगुती. २ पाळीव; माणसाळलेलें. गृह्याग्नि–पु. प्रत्येक त्रैवर्णिकानें लग्नानंतर किंवा वेगळें विन्हाड केल्यानंतर निरंतर पाळावयाचा अग्नि. विवाहानंतर वधूसह गृहप्रवेश करतेवेळीं ज्या अग्नीवर होम करावयाचा तोच अग्नि पुढें निरंतर जतन करून ठेवावयाचा असतो व यावर नित्य सकाळ-संध्याकाळ होम द्यावयाचा असतो.

गृहीत—वि. १ धरलेलें; पकडलेलें; घेतलेलें. २ मनांत धरलेलें; समजलेलें. –तागमा–स्त्री. बी. ए. च्या तोडीची महिलाविश्वविद्यालयीन पदवी; स्त्री पदवीधर. –विचावि १४२.

गे—उद्गा. १ अगे! चें संक्षिप्त रूप. 'तो गे! तोचि राम सर्वत्र पाहे।'–राम २००. २ (व.) म्हशीला बोलावण्याचा शब्द; हाँय.

गेंगडी—स्त्री. (व.) वेंगडी; हातपाय लटपटणें; भयग्रस्त स्थिति; घाबरगुंडी. 'समोर या राक्षसाला पाहतांच त्याची गेंगडी वळली.'

गेंग(गा)णें—अक्रि. नाकांतून बोलणें. गेंगाणा–ण्या, गेंगणा–वि. १ नाकांत बोलणारा (माणूस). २ सानुनासिक, नाकांतील (उच्चार). गेंगा(ग)रणें–अक्रि. १ पडशामुळें, थंडीमुळें नाकांतून बोलणें. २ भेदरणें, तिरपीट उडणें; गांगरणें; अतिशय घाबरणें. [ध्व.]

गेचक, गेचकळ—न. १ झाड, खुंट यांचें बेचक, बेळकें. २ हात, पाय यांच्या दोन बोटांमधील जागा; बेचकी. [का. गेज्जे=अडसंधी ?]

गेचु(चो)डी—स्त्री. (व.) गोचीड पहा.

गेज—पु. माप; मापण्याचें साधन. (आगगाडीसंबंधीं) आगगाडीच्या दोन रुळांमधील कमीजास्त अंतर; (इं.) ब्रॉडमिटरगेज. गेजग्लास–पु. (यांत्रिक) बॉयलरांतील पाणी व वाफ बरोबर दाखविणारी नळी; गेजचेंबर. [इं.]

गेज, गेजमाळ—स्त्री. (क.माण.) गौरीला वहावयाची कापसाची सांखळीसारखी माळ; वस्त्र; कापसाळें; सुतपुतळी. यांत मध्यें थोडासा कापसाचा पुंजका, नंतर वातीप्रमाणें बारीक, नंतर पुन्हां पुंजका अशा प्रकारें पेळू घेऊन वळतात.

गेंझट, गेंझा, गेझट, गेझा—वि. (कों.) अतिशय लोचट; हट्टी; दुराग्रही; चेंगट (माणूस).

गेट—न. १ दार; फाटक (बंगल्याच्या आवाराचें, बाहेरचें). २ चौकी; देवडी. ३ पोलीसचौकी. [इं.]

गेटं(ठ)ण—न. बैलाच्या गळ्यांतील वळलेला दोर, पट्टा; याला ठोकडा किंवा घांट बांधतात; घांटपट्टा. [घांटवण ?]

गेटम—पुन. १ जाडेंभरडें लोकरीचें आजम; कापड, गालिचा; रग्; ब्लँकेट. 'मांजिष्ट भोजिष्ट धारिवट। गेटम जातीचे पट निघोट।'–मुसभा १५.२२०. २ (खा. व.) सुताचा झोऱ्या; वोऱ्या; तक्‍व; झुताडा. [हिं. गीटम]

गेटम्—वि. (व.) व्यवस्थित; ठाकठीक. 'ही इमारत फार गेटम् आहे.'

गेठा—पु. कमर आणि पाय यांना (गुडघ्याखालीं) उपरणें गुंडाळून बसण्याची पद्धत; जेठा पहा. (क्रि० मारून बसणें).

गे(गें)ठा—पु. १ (खा. व.) बैलाच्या गळ्यांतील रंगीबेरंगी मण्यांची अगर कवड्यांची माळ. २ कानांतील एक दागिना (हा मराठ्यांच्या बायका घालतात); गांठ्या पहा. 'कानीं घालुनी गेठे हो।'–मध्व ३९. ३ खंडोबाच्या गळ्यांतील एक चांदीचा अलंकार, हा जेवतांना कानावर ठेवावा लागतो. गाठा–ठ्या पहा. (सामा.) एक चांदीचा दागिना. 'महार पोरयाचे गळ्यांत गेठे।'–अफला ६६. म्ह० गेठे गेले मोंके राहिलें. [सं. ग्रंथि ?]

गेठू—पु. (व.) लग्न इ० वेळीं मांडवाच्या मुहूर्तमेढीला (त्यांत सुपारी, हळकुंडें घालून) बांधावयाचें फडकें. 'गेठू बांधला.' [गांठ]

गेडकणें—अक्रि गदगणें; पाडाला येणें–लागणें (आंबा, फळ).

गेडमिळें–मेळी—स्त्री. (विणकाम) मागावरील ताण्याच्या खालीं (वहीच्यापुढें) असणाऱ्या अडसराचीं दोन टोकें ज्यांत बसवितात ते दोन उभे खुंट.

गेड(ड्ड)र—पु. (कों.) एक मासा.

गेंडा—पु नाकावर शिंग असणारा एक वन्य क्रूर पशु. [सं. गंड]

गेंडा—पु. (व.) जनावराच्या गळ्यांतील गोंडदार दोर; गेठण व गेंठा २ अर्थ १ पहा.

गेंदुर—न. (व.) गढूळ. [सं. गंडोल; प्रा. गंडुल; तुल० प्रा. व. गेडु=माती]

गेंडें—वि. (कु.) विषम संख्या. उ० १, ३, ५, ७ इ०; सम संख्येला फाडें म्हणतात. ०फडें–न. (कु) १ लहान मुलांचा एक (एकीबेकीचा) खेळ; २ पहिल्यानें मुलगा व मग मुलगी असा जन्मानुक्रम.

गेणां–पु. (गो.) पायाच्या बोटांतील एक चांदीचा अलंकार. [का. गणिके=बोटाचें पेर]

गेणी—स्त्री. (को.) एक मासा. याची लांबी १५ ते २० फूट असून याच्यापासून ५ ते १० मण तेल निघतें; तें गलबताच्या अवजारांना टिकाऊपणा येण्यासाठीं लावतात.

गेणी—स्त्री. कर; शेतसारा; भाडें. 'सोडवीन मकसोनी अपराध्। माझी गेणी देती तरी।' –शिपु २.४२.७७. [का.]

गेत—न. (गो.) गेळ.

गेताडपट्टी—स्त्री. (ना.) जोराची चपराक.

गेंद—पु. १ तुरा; झुबका; गोंडा (फुलांचा). २ पुष्कळशा पाकळ्यांचें फूल (झेंडू, बटमोगरा, इ०चें). मात्र अशा फुलाचें नांव गेंदाच्या पुढें जोडतात. जसें– गेंदमोगरा, गेंदशेवंती इ०. ३ झेंडूचें फूल. ४ घोड्याच्या लेंडीवरील रेशमाचीं किंवा चांदीचीं फुलें किंवा मुदा. ५ बायकांच्या पायांतील चौय्या बोटांतील चांदीचा, मोगऱ्याच्या फुलाच्या आकाराचा दागिना यांत वाळूचे बारीक खडे असल्यानें चालतांना त्यांचा आवाज होतो. ६ (ल.) गेंदेबाज वस्तू. उदा० स्त्रियांचे स्तन. 'रुंद छातिवर वुंद गेंद जणुं गुलाब बहारामधीं फुलती।' –प्रला ११३. ७ (सामा.) गुच्छ; झुबका; तुरा. ८ गोळा; गोलदार पदार्थ. [सं. गेंदुक=कंदुक; प्रा. गेंदुअ] ०जोडी–स्त्री. घोड्याच्या शेपटीवरील गेंद भूषणांचा समूह. गेंद अर्थ ४ पहा. 'जीन भिडविला घोड्याला गेंदजोड त्याला' –ऐपो ४३१. गेंद्तगर–स्त्री. तगरी (फूलझाड) मधील अनेक पाकळ्यांचें फूल असणारा एक प्रकार. गेंदेबाज–वि. गेंद असलेला; गोंडेदार; झुबकेदार.

गेना—पु. (व्र.) तांदुळांत न कुटतां राहिलेला भातकण. 'गेने धान आहेत.'

गेम—स्त्री. १ खेळ; डाव. २ खेळ पुरा होण्याची मर्यादा. [इं.] ०लागणें—हरणें; डाव अंगावर येणें.

गेय—वि. गाण्यास, प्रशंसा करण्यास योग्य. [सं.]

गेर—स्त्रीपु. (कों.) लोकक्षोभ; बंडाळी; दंगा. 'होळकराचे गेरींत त्यांचें सर्वस्व लुटलें गेलें.'

गेर—पु. (व.) तुकडा; पेरें. 'या लांकडाचे तीन गेर करा.'

गेर—अ. (गो.कु.) घरीं, कडे, इकडे या अर्थाचा प्रत्यय. 'अमगेर.' =आमच्याकडे [गृह?]

गेर—न. (कु.) अति कोंवळी सुपारी. [गर?]

गेरवा—पु. अंवें इ० नें धान्यावर पडणारा तांबेरा–रोग; गव्हाचा एक रोग. यानें गहूं बारीक होतो. 'यंदा गव्हावदन गेरवा गेला.' [गेरू]

गेरू—पु. १ काव; तांबडी माती. २ विटकरीची भुकटी; पाटीवर घालण्याची तांबडी धूळ. ३ (सुतारी) लांकडावर खुणा करण्यासाठीं तयार केलेलें (कसलेंहि) तांबडें पाणी. [सं. गैरिक; प्रा. गेरुअ; हिं. गेरू] गेरुंडी–स्त्री. (सुतार) खुणा करण्याचें, पाणी ठेवण्याचें पात्र, खापराचा ठोकळा; गेरूचें भांडें.

गेल—धावि. गत; मृत; गेला पहा. 'गेल घेउनी जावें नंदेवर।' –उषा १४१८.

गेल—स्त्री. चेष्टा; आगळीक? 'गेल घेतली थोर मर्कटें। लंका दग्ध केली कपटें।' –कमुरा ३.३.८९. [सं. केलि=क्रीडा; का. गेली=चेष्टा?]

गेला—धावि. (जाणें याचा भूतकाल) १ गेलेला; संपलेला; गत झालेला (काळ, दिवस इ०). २ (ल.) मेलेला; मृत. ०मेला–वि. १ मेलागेला; नष्ट. २ कांहीं झालें तरी; केव्हांहि, निदान. 'गेला मेला पाऊस पडेलच कोंकणांत.' ०बाजार–क्रिवि. (बाजाराची वेळ सरल्यावर देखील) किमानपक्षीं; निदान; कमींतकमी.

गेस्ट—पु. अतिथि; पाहुणा; अभ्यागत; आला गेला. [इं.]

गेह—न. घर; गृह; वस्ती; राहाण्याचें ठिकाण. 'प्रभो तुज जसें तसें मतिस गेह भासे वन।' –केका १०५. [सं.] गेहात्यय–पु. घरदार, आप्तसंबंधी यांचा त्याग. गेहात्यय आणि देहात्यय–पु. संन्याशानें केलेला घरादाराचा व शरीराचा त्याग. गेहेपटु–वि. घरचा हुषार; घरांत फक्त वाकचगार पण बाहेर कुचकामाचा; घरचा देशपांड्या (बाहेर भित्रा). गेहेपंडित–वि. गांवढळांत पंडित, अरेराव; घरचा काळ; घरपंडित. [सं.] गेहेप्रगल्भ–वि. जेथें विशेष गरजच नाहीं तेथें धाडस, चपळाई इ० दाखविणारा; घरशूर. [सं.] गेहेमेही–वि. (घरांत मुतणारा) घरबश्या; घरकोंबडा [सं.] गेहेशूर–नर्दी–पु. घरांत शूर; बायकांत शौर्याच्या गप्पा मारणारा पण बाहेर भित्रट, शेंदाडशिपाई. [सं.]

गेळ—न. १ बेचकें; दोन बोटांतील भाग; गेचक अर्थ १ पहा. २ दुभागलेल्या खुराचा एक भाग; दोन भागांतील अंतर. म्ह० गाईचे गेळीं, म्हशीचे वेळीं (दूध काढावें) =गाय फिरणांतून आल्यावर व म्हशीचें नियमित वेळीं दूध काढावें.

गेळ–ळी, गेळा, गेळफळ—स्त्रीपुन. एक झाड व त्याचें फळ. या झाडास दोन अंगुळें लांबीचे कांटे असतात, फळ सुपारीएवढें असून पिकल्यावर पिंवळें होतें; याचा गळवावर लेप केल्यास तें पिकतें; याला (कु.) गेळी–गेळो किंवा गेळफळ असेंहि म्हणतात. [सं. गालव]

गेळंदी—स्त्री. (जुन्नर) तांबड्या रंगाची खेंकडी.

गेळा—पु. लहान तोंडाचें वाटोळें भांडें; तेल इ० ठेवण्याची किंवा पाणी पिण्याची झारी, खुजा; झुरई.

गेळी—स्त्री. लहान गेळा.

गेळी—स्त्री. खुराचा भाग. गेळ अर्थ २ पहा. (अव. गेळ्या)

गै, गैगोळा इ०—गई, गईगोळा पहा. 'ते देववेल मज काय? करीन गै मी।' –र ३६.

गैवी, गैवती–त्या, गैवी–गैवान्या—वि. १ ढिला; नेभळा; गबाळ्या; अजागळ; बावळा; अव्यवस्थित. २ आळशी आणि टोणपा. गावदी पहा. [फा. घइव्; हिं–गैवी]

गैब–प, गैबत–ती—क्रिवि. (प्र. गईब, गईप) १ गुप्त; न दिसणारा; अदृश्य. 'गैबचि होऊनि जाती' –दावि २९५. 'त्यांतच गैबत जाले. त्यांचा मुर्दा देखिल दृष्टीनें कोणी देखिला नाही' –भाव ६३. २ नष्ट; गहाळ. [अर. घइब्; घइबत]

गैब—पु. (गो.) गुरांनीं केलेल्या नासाडीची नुकसानभरपाई करून देणारें खातें. [पोर्तु.]

गैबती—न. (राजा.) धुपार्तीचा बुदलीवजा दिवा, यांत तेलाचें भांडेंहि असतें.

गैवती—वि. (गो.) भलतिदा. फालतू; कोणीतरी; माहीत नसलेला; भलताच.

गैवी—वि. १ गुप्त; गूढ. २ निनांवी. [अर. घइबी] ०अर्जी–स्त्री. गुप्त, निनांवी अर्ज (वऱ्हाड खानदेशांत रूढ). ०आवाज–पु. आकाशवाणी; दैवी, गुप्त संदेश. 'गैबी आवाज वाजवी घंटा जलमय ब्रह्महृदय नीलकंठा।' ०खबर–वर्तमान–वार्ता–बातमी–स्त्रीनस्त्री. गुप्त, गुपित बातमी; चोरबातमी. ०फकीर–पु. गुप्त सामर्थ्यामुळें चमत्कार करणारा फकीर, गोसावी. ०बार–पु. कोठून आला हें न कळणारा बंदुकीचा बार. ०माणूस–पु. तोतया. ०मार–पु. आडून केलेला, न दिसणारा मारा. 'गैबीचा मारा जाहला.' –भाव ३४. ०वाद्य–न. आकाशवाद्य. 'विचित्र गैबीवाद्यें वाजोनलीं।' –सप्र २०.६८.

गैर—अ. निराळेपणा, भिन्नपणा दाखविणारा परंतु सामान्यतः अभाव किंवा अन्यथाभावदर्शक अरबी अव्ययशब्द किंवा प्रत्यय. याचा मनसोक्त (विशेषतः हिंदुस्थानी शब्दांबरोबर) उपयोग करितात. या शब्दाचे पुढील कांहीं अर्थ होतात—१ इतर; अन्य. 'गैर पथकें येऊन मोर्चेबंदी केली आहे.' –रा १२.१२५. २ अयोग्य; अन्यायाचा. 'हें तुम्हीं गैर केलें.' –मदरु १.१०६. ३ (नामाच्या किंवा विशेषणाच्या प्रारंभीं जोडल्यास) अवास्तविक, उलट; विपरीत. ४ विना; वांचून. 'गैर अन्याय मला गांजतो.' 'गैर अपराध दंड घेऊं नये.' [अर. घैर=निराळा, व्यतिरिक्त] (वाप्र.) ०अदबी–स्त्री. असभ्यता; अपमान; अनादर. 'गैर अदबी बोलला सबब पातशाहा यास राग येऊन डोळे काढिले.' –मदरु २.७०. ०अदा–वि. रद्द; न पटलेलें. 'शिंदे कडील वरात आली तर मग गैरअदाही व्हावयाची नाहीं.' –ख १०.५२.७९. ०अब्रू–स्त्री. अप्रतिष्ठा. 'गैर–अब्रू फारसी न करणें.' –वाखबावा २.७५. ०अमली–वि. परस्वाधीन; दुसऱ्याचें. 'चार लक्षांचे भरतीस अमली महालांपैकीं वेरीज कमी आल्यास गैरअमली महाल आहेत त्यांपैकीं भरतीस कमाल आकाराचे बेरजेचा महाल लावून देणें.' –रा १०.३२१. ०आबादी–वि. ओसाड; उजाड; बेचिराख. ०आरामी–स्त्री. अस्वस्थता. 'हजरतांचे शरीरास दोन दिवस गैरआरामी आहे.' –दिमरा २.३२. ०इतबार–पु. अविश्वास. 'तमाम फौजेस गैरइतबार जाहला.' –भाव ८०. ०इमान–न. इमान नसणें; द्रोह; अनिष्ठा. 'आमचें गैरइमान असतें तरी आम्हीं आजपर्यंत येथें तुम्हापाशीं न ठरतों.' –भाव १११. ०कबजी–वि. परस्वाधीन; गैरअमली पहा. 'सरंजाम गैरकबजी, कांहीं सुटला त्यांत वस्ती नाहीं.' –ख २.९४२. ०कायदा–वि. बेकायदेशीर; असनदशीर. (इं.) इल्लीगल. ०कायदा मंडळी–स्त्री. (कायदा) गुन्ह्याचें कृत्य करण्याच्या इरादानें पांच किंवा पांचाहून अधिक एकत्र जमलेले इसम. (इं.) अनलॉफुल असेंब्ली. ०किफायत–स्त्री. तोटा; नुकसान. 'किफायत, गैरकिफायत समयासमयास चित्तांत आणून किफायतीचीं कामें करीत आलां, पुढें त्याचप्रमाणें करावीं' –रा १.३४६. ०कौली–वि. परवाना किंवा अभयपत्र न दिलेलें; बिगर परवाना. –मराभा. ०खर्च–पु. १ जादा, किरकोळ खर्च. २ गैरवाजवी, अयोग्य खर्च. ०खुशी–षी–वि. नाकबूल; नाखुष; रुष्ट. 'खुषी किंवा गैरखुषी असा हा कौल बायकांची।' –पला १०४. ०चलन–नी–वि. १ चालू नसलेलें (नाणें). २ (ल.) अव्यवस्थित; बेशिस्त; अशिष्ट (वर्तन). ०चलन–स्त्री. १ चलनाचा अभाव; चलन नसणें. २ (ल.) गैर वर्तन; बदचाल. ०चाकर–वि. बडतर्फ; माजूल. 'जखमी जहाले त्यांस गैरचाकर करून जागिरा तगीर करविल्या.' –जोरा ७५. ०जप्त–वि. गैरअमल; गैरकबजी; परस्वाधीन. 'गैरजप्त देश साधावे.' –चित्रगुप्त ११०. ०जबाब–पु. उद्धटपणाचें, अनादराचें उत्तर. ०दस्त–स्ती–वि. सरकारसाऱ्याची सूट असलेली (जमीन). ०नफा–फायदा–पु. तोटा; नुकसान. 'येणेंकडून तुमचा गैरनफा जाहला.' –जोरा १४. 'अत्यंत वोढ केल्यास पाटीलबावांचा गैर फायदा आहे.' –जोरा ४७. ०प्रकारचा–वि. १ इतर; भिन्न; दुसरा. २ चमत्कारिक; हास्यापद; तऱ्हेवाईक; विलक्षण. ०बर्दार–वि. बहार नसलेला; फळहीन. 'पोफळी गैर–बर्दार, धोंडे वाळलेल्या आहेत.' –रा ११.७९. ०मजुरा–क्रिवि. (हिशेब) मजुरा(वजा) टाकल्याशिवाय; वजावाट न करितां. [गैर+मजुरा–मुजरा] ०मंजूर–वि. नामंजूर; रद्द. 'अष्टप्रधानांनीं आपले आगा वाजवी असतां गैरमंजूर करून एकपक्षी तह केला.' –रा १२.१२२. ०मर्जी–स्त्री. अवकृपा; रुष्टता; इतराजी; नाराजी. ०मसलत–मतसुबा–स्त्रीपु. मूर्खपणाचा, वेडगळपणाचा बेत, कट, योजना. ०महसर्दार–वि. अप्रतिष्ठित. –रा ८.४३. [अर. मआसिर=थोरवी] ०महसूल–पु. जुलमी करांपासून किंवा अन्याय्य मार्गानें

**जगौचें**—सक्रि. (गो.) वाचविणें. जगविणें.

**जघन**—पु. १ बस्तिप्रदेश; जांघ; जांगड (स्त्रियांचा). २ (काव्य) ढुंगण; कंबर. 'धरिला जघन द्वयकरीं।'–निगा १२१. [सं.]

**जघन्य**—वि. १ हलकें, नीच. २ शेवटचा; पाठीमागचा. –स्त्री.अपकीर्ति. [जघन] ०**वृत्ति**–स्त्री. अप्रशस्त हलकट, नीच, चाल.

**जघन्य**—वि. १ जगजाहीर. 'हें शून्यवादि यांचें मत जघन्य।'–कथा ६.११.९. [सं. जगत्] **जघन्यांत होणें**-जगजाहीर होणें (मूर्खपणानें किंवा वाईट कृत्य). 'कीर्ति जघन्यांत झाली।'–अफला ५१.

**जंघा-घ**—स्त्री. १ मांडी; सबंध पाय; जघन पहा. २ पोटरी [सं.] ०**त्राण**-न.मांडीचें किंवा पोटरीचें चिलखत. ०**ल-ळ**, **जंघी**-वि वेगवान; चपल (घोडा). 'जंघाल जो पवन-सं-गतिची सवे घे।'–र ७. 'हे वामनेक पद भूमि नमोनि जंघी।'–र ४.

**जचणें**—अक्रि मेहनत घेणें; फार श्रम करणें. 'कीं नैरा बापाचेया पुत्र जचे।'-ज्ञा १३.५४२. [जाचणें पहा]

**जंजार**—पु १ ओझें. २ त्रास; प्रयत्नाची पराकाष्ठा. (क्रि० तोडणें). [जंजाल-सं. जंज्=युद्ध करणें]

**जंजाल-ळ**—पु. १ त्रास; कष्ट; दगदग; चिंता; उपद्व्याप; गुंतागुंत; संसारांतील अडचणी. 'जगज्जाळ जंजाळ हा सर्व तुटे।'–दावि ८. २ आधिव्याधि; लोढणें; यातना; त्रास (माणसांच्या कामाचा). 'ही वायको पाठीमागें मोठा जंजाळ आहे.' ०**तोडणें**–अति त्राप कष्ट सोसणें. ०**पछाडणें**–१ छळणें; यातना देणें. २ खूप प्रयत्न करणें; जोराचा प्रयत्न करणें.

**जजि(झी)या**—पु. (मूळ अर्थ संरक्षणाकरितां बदला पैसा) मुसलमानेतरांवरील डोईपट्टी, कर. हा प्रथम महमंद पैगंबरानें वसूल केला होता. 'न्यायाचे मार्गानें पाहतां जजिया पट्टीचा कायदा केवळ गैर.'–वाड सनदा १५०. [अर. जिझ्या]

**जजिरा, जंजीर**—पु. १ पाण्यांतील किल्ला; जलदुर्ग. २ कुलाबा जिल्ह्यांतील एक संस्थान व किल्ला. [अर. जझीरा = बेट]

**जंजिरी**—स्त्री. १ लहान सांखळी. २ कमान (घड्याळाची); शेडा. ३ जंगी. गवाक्ष. –वि. तीक्ष्ण. 'भंवयकमांना ओढुन मारसी नेत्रवाण जंजिरी।'–प्रला १०६. [फा. झंजीर] ०**गोळी**–स्त्री. जोडगोळी.

**जंजीर**—स्त्री. १ जंजिरी पहा. [फा. झंजीर] २ नग. 'एक जंजीर फील.'–पया ३८४. ३ वेडी. 'गळ्यांत जंजीर तोफेची.'–मराचियोरा ६६. ०**तोडणें**-जंजाल तोडणें. ०**बंद**-वि. भरभक्कम; संगीन (इमारत). २ अगदीं बरोबर (हिशेब). ३ सुसंगत (भाषण, लेखन).

**जजु**—पु. (औपरोधिक) यजुर्वेदी लोक. [सं. यजुस्]

**जज्ज ज्य**—पु. दिवाणी कोर्टांत अध्यक्षस्थानीं वसणारा अम्मलदार; न्यायाधीश. 'चुकेना लग्नाचा जोडा पाई खोडा जज्य बोले।'–पला ८३. [इं.]

**जंज्याळ**—स्त्री. जेजाल पहा. लांकडी बैठक (दस्ता) असलेली मोठ्या तोंडाची बंदूक. हिच्या तोंडाचा व्यास १॥–२ इंच असून नळीची लांबी ७ विती असते. ही तोडयाच्या बंदुकीसारखी दिसते. हिला इंग्रजींत ब्लंडरबस असें नांव दिलें आहे. [सं. जंज्=लढणें; युद्ध करणें]

**जट**—स्त्री. १ पेड वळलेले केस (शंकर किंवा साधु लोक यांचे); न विंचरल्यामुळें, तेल वगैरे न लावल्यामुळें एकासएक चिकटलेल्या गुंतलेल्या केसांच्या कपाळावर व पाठीवर लोंबत राहणाऱ्या बटा; वळंबा; जटा. २ संघ; जूट; जमाव. **जटणें**–अक्रि. एकत्र होणें जुमणें. [सं. जट्=गुंतणें]

**जटल्ली**—स्त्री. (व.) थाप; बात 'तूं खूप जटल्ली ठोकली.'

**जटा**—स्त्री. १ जट अर्थ १ पहा. २ केंसांची गुंतागुंत. (गो) जटि. ३ वैदिक वाङ्मयांतील पठणविषयक एक विकृति. संहितेच्या दोन पदांचा संधि करून म्हणणें त्यास क्रम म्हणतात व त्या दोन पदांच्या पुढील पद त्यांस जोडून त्या तीन पदांची संहिता करून तीं तीन पदें उलट म्हणणें. उदा० 'अग्निमीळे ईळेग्निमग्निमीळे। ईळेपुरोहितं पुरोहितमीळ ईळे पुरोहितं।' इ० [सं. जटा, सटा; फ्रें.जि. जर] सामाशब्द– ०**गौर**–स्त्री. एक औषधी वनस्पति. इच्यावर शेवाळ्यासारख्या रेषा असतात व ही गौरीला वाहातात. ०**जूट**-पु. केसांचा समूह जटा पहा. 'जटाजूट एका मुकुट माथां शिरीं।'–तुगा २०५०. ०**धारी**–वि. जटा धारण करणारा (शंकर, गोसावी इ०). ०**पाठी**–वि. १ जटेचा पाठ करणारा (जटा अर्थ ३ पहा); अशासारखेच क्रम–घन शाखा–पाठी असे वेदपाठकांचे प्रकार आहेत. २ ज्यांनीं आपल्या जटा पाठीवर सोडल्या आहेत असा. ०**भार**-पु. जट अर्थ १ पहा. 'सावरूनिया जटाभार। वरि मुकुट घातला सुंदर।' ०**मांसी-मावशी**-स्त्री. पुष्कळ दिवस टिकणारी वनस्पति. ही हिमालयांत सांपडते. हिच्या तीन जातींपैकीं सुगंधी जात अधिक उपयोगी असून तिच्या मुळयांचें तेल केस काळे होण्याकरितां उपयोगांत आणितात. [सं.] **जटाळ्या, जटाळ्याबावा**–वि. जटा धारण करणारा.

**जटायु**—पु. रामायणांतील एक गृध्र राजा. [सं.]

**जटित**—वि. जडित 'कंटीं माळा मुखीं पद्य। जटित सूत्रीं।'–गीता १.४८२. [सं. जट्=संघात करणें]

**जटिल, जटील**—वि. जटाधारी पहा [सं.] ०**वेखंड**–न. काळें वेखंड. **जटिली**–वि. जटिलसंबंधीं; जटाधारी पहा. [जटिल]

**जठर**—न. पोट; उदर. [सं.] **जठराग्नि, जठरानल**–पु.-पोटांतील अग्नि, पचनशक्ति.

**जड**—स्त्री. मुळी. [ हिं. जड; सं. जट ] (वाप्र.) **॰दाबणें**-एखाद्या झाडाची फांदी मध्येंच जमीनींत पुरल्यावर त्या खांदीस मुळ्या फुटून त्या खांदीचें नवीन कलम करणें.

**जड**—स्त्री. धन; पैसा; मालमत्ता 'त्या सावकाराची लाख रुपयांची जड आहे' [ सं. ]

**जड**—वि. १ भारी; वजनदार; उचलावयास कठिण. २ (ल.) मंद; आळशी; मूर्ख. 'मी अत्यंत जड असें।'–ज्ञा ३.१८. ३ शीत. ४ पचनाला कठिण ( अन्न, पाणी ). याच्या उलट हलकें. ५ दुःखी; दुःख देणारें. ६ त्रासदायक; कठिण; महत्त्वाचें ( काम ). 'मदुद्धरण मात्र कां जड तुम्हां दिसे वा रिती।'–केका १९. म्ह॰ केलें नाहीं तोंवर जड खाल्लें नाहीं तोंवर गोड. ७ मोठेपणाचा; मानाचा; अधिकाराचा. ८ भारी किंमतीचा; मौल्यवान. ९ गंभीर; विद्वत्ताप्रचुर; परिपूर्ण. ( टीका, वाद, विषय ). १० भयंकर: जवर ( रोग ). ११ झोंपाळू. त्रासलेला; थकलेला; दमलेला. १२ अचेतन. भौतिक 'जड परि जवळिका।'–ज्ञा ९.११६. १३ ग्लित; कठोर (अक्षर). १४ (वेदांत) घन; द्रव, वायुरूप नव्हे असें; भौतिकशरीर. [ सं. ] (वाप्र.) **॰धरणें**-मोठा समजणें. **॰वाटणें**-कठिण, दुःखदायक, त्रासदायक असणें. **॰सांगणें**-अधिकाधिक वाढत जाणें ( रोग, अडचण ). शेवटीं जबरदस्त होणें. ( वूड, गांड ) **॰होणें**-प्रतिष्ठेमुळें एखाद्यास गर्व चढणें. सामाशब्द- **॰अवघड**-न. कठिण संकट आणि अडचण यांना व्यापक संज्ञा. **॰गीर**-वि. ( लुटीच्या भारानें ) भारावलेलें. –चित्रगुप्त ११९. **॰ग्रंथि**-पु. (वेदांत) आत्म्याचा भौतिक पदार्थांशीं संबंध, तसेंच बाह्य वस्तूंशीं संबंध. 'जड ग्रंथि सुटला म्हणजे ज्ञानप्राप्ति.' [ सं. ] **॰चिदैक्य**-न. मन आणि दृश्य पदार्थ यांचें ऐक्य. 'आत्मा न देखत मनीं व्यतिरेकरीति। गर्विष्ठ ते जडचिदैक्य सुखें करीती।'[सं.] **॰जीववाद**-पु. सर्व आधिभौतिक व मानसिक चैतन्य जड प्रकृतिपासून झालें असें प्रतिपादणाऱ्या कोणत्याहि तत्त्वज्ञानमतास जडजीववाद हा शब्द लावतात. **॰जूग**-न. ओझें आणि भार ( धंद्याचा, काळजीचा ). 'संसाराचें जडजूग जोडल्या पुतावर आहे.' **॰जोखीम**-न. संभवनीय आपत्ति, अनर्थ ( सर्व आपत्ती किंवा एखादी आपत्ति ). 'वाटेनें कांहीं जड जोखीम पडल्यास कसें करावें.' **जड डोसकें डोकसें**-न. हजामत करावयास कठिण अशा राठ केंस असलेल्या डोक्यास न्हावी लोक म्हणतात. [ जड+डोसकें ] **जडता-जडत्व**-स्त्रीन. १ ( शाप. ) प्रेरणारूप कारणावांचून आपली स्थिर अवस्था अथवा सरळ रेषेंत समचलनावस्था न बदलण्याचा जो पदार्थांचा धर्म त्यास जडता म्हणावें. –यंमू २१२. २ वजन; सुस्ती. **–त्वाकर्षण** न. गुरुत्वाकर्षण. **॰दुखणें**-न. जिवावरचें दुखणें; असाध्य रोग. **॰द्रव्य**-पु जागा व्यापणारा, वजनदार, ज्ञानेंद्रियांनीं कळणारा स्पष्ट पदार्थ. **॰पारडें**, **जडव** **पारडें**-न. १ सुबत्ता, भरभराट ( तराजूच्या ज्या पारड्यांत वजन जास्त असतें तें पारडें खालीं जातें व कमी वजनाचें वर जातें यावरून ). २ समृद्ध माणूस. ३ त्रासदायक काम. (क्रि॰ उचलणें; वाहणें; उरकणें; सोसणें). **जड बुडाचा**-वि. ( ल. ) श्रीमंत आणि वजनदार ( मनुष्य ). [ जड+बूड ] **॰बुद्धि-मति**-स्त्री. बुद्धीचा जडपणा; बुद्धिमांद्य. –वि मूर्ख; अडाणी. **॰बोका**-पु. गलेलठ्ठ; स्थूल ( माणूस, जनावर, वस्तु ). **॰भरत**-पु. १ एक ऋषी. २ ( ल. ) आळशी, सुस्त माणूस. **॰भारी**-न. (काव्य) संकट; आपत्ति. 'पडतां जडभारी। दासीं आठवावा हरी।'–वि. कठिण; त्रासदायक. 'माझिये जीवींचें कांहीं जडभारी।'–तुगा ८५८. **॰भ्रम**-पु. आधिभौतिक पदार्थाचें चुकीचें ज्ञान; सृष्टि शाश्वत असल्याबद्दल चुकीचा समज 'उद्धरी जिस जडभ्रम तीतें। राम उद्धरि जसा कुमतीतें।' **॰वाद**-पु. सर्व विश्वाची जडप्रकृति व गति यांनीं खुलासा करण्याची पद्धति. सर्व मानसिक क्रियांचा खुलासा आधिभौतिक व रासायनिक फरकांनीं होतो असें हें मत म्हणतें. पदार्थविज्ञान शास्त्रज्ञ, प्राणिशास्त्रज्ञ व जीवनशास्त्रज्ञ हें मत प्रतिपादन करितात. **॰शील-ळ**-वि. जड; वजनदार: भारी वजनाचा; अवजड. **जडात्मकता**-स्त्री सुस्तपणा: बुद्धिमांद्य; मंदपणा, उदासीनता. 'म्या शापिली तरि जडात्मकता मतीची।' [ सं. ] **जडाद्वैत**-न. एका जड प्रकृतींतच सर्व गोष्टींचा समावेश करणारें, अद्वैत; सृष्टीचें मूळ. –गीर १५९. **जडान्न**-न. पचायला कठिण असें अन्न. [सं. जड+अन्न] **जडांश**-पु आधिभौतिक पदार्थ. [सं.]

**जडकाम**—न. जोडण्याचें काम; सांधकाम [ जडणें+काम ]

**जडकावणें**—अक्रि. रोग, पाऊस इ॰ पहिल्यापेक्षां अधिक होणें, वाढणें, वळावणें. जडावणें पहा. 'दोन दिवस अपथ्य करितांच ताप जडकावला.' (ना.) जड पडणें; दुखूं लागणें (अंग).

**जडचिंब**—न ( कों. ) भातांतील ज्या दाण्यांत फार सत्वांश नसतो परंतु जे पोलपेक्षां थोडे जड असतात त्यांना जडचिंब म्हणतात. जडपळिंज पहा.

**जड(जर)जवाहीर**—न सोनें, रत्नें वगैरेनां व्यापक संज्ञा. 'सर्व जिनस अज्नास जरजवाहर नागपुरास घेऊन जाऊन ...'–रा ७. –खलप १.३. [ फा. झर्=सोनें+अर. जवाहिर्=रत्न ]

**जडण**—स्त्री. १ जडकाम; सांधकाम. २ (ल.) आंत बसविणें. जडविणें; खोवणें (रत्न इ॰ सोन्याच्या कोंदणांत). ३ जोड, सांधा. 'त्या सांध्याची जडण चांगली आहे.' ४ जोडणावळ, जोडण्याची मजुरी. [जडणें] **जडणावळ**–स्त्री १ जडण अर्थ ४ पहा. २ जोडण्यामध्यें कौशल्य, चातुर्य.

**जडणी**—स्त्री १ जडण अर्थ १ पहा २ ( कु. ) पायतणाची शिवणावळ. [ जडणें ]

जडणें जडविणें—उक्रि. १ सांधणें एकत्र होणें. २ (ल) कोंदणांत बसविणें (रत्न वगैरे). ३ (ल.) ठाम बसणें; नोकरीवर कायम होणें (अधिकाराच्या जागेवर माणूस, रोग, वाईट संवय) 'तो चाकरीवर राहावयास गेला तो जडला कीं नाहीं?' ४ चिकटणें; धरणें; बांधणें. 'एवं वासना जडल्या हरिरूपाशीं।' —एभा २.६८८. [सं युज्. हिं. जडाना]

जडतार-तारी—जरतार-तारी पहा.

जडप—न.(राजा)१जडकाम; सांधकाम. २जडण अर्थ २ पहा. ३ निरनिराळ्या जबान्यांची एकवाक्यता; मिलाफ; मेळा; जुळणी (अजमास, कूटप्रश्न, कोडें यांमधील). (क्रि० बसविणें; बसणें) [जडणें]

जडप-व—वि. १ कठिण; त्रासदायक (काम, धंदा). २ भयंकर (दुखणें); जास्त मोलाचा (पदार्थ, वस्तु) [अर. झर्व]

जडपळिंज— न. पोलापेक्षां थोडें जड भात. जडचिंव पहा.

जडवळी-वणी—स्त्री जुळणी; जोडणी; सांधकाम. [जडणें]

जडाई—स्त्री. १ जोडकाम (कला आणि काम) २ जोडकामाची मजुरी. [जडणें]

जडाजड-जडी—स्त्री एक करण्याची क्रिया; सांधकाम रचाई (भिंती, वस्तु इ०ची अनेक माणसांकडून व्यवस्थितपणानें केलेली). [जडणें]

जडाव—पु.१ जडणी; कोंदणांत बसविण्याचें काम, बसविलेली स्थिति, २ रचना; तरतूद 'त्या प्रमाणें मोर्चेबंदीचा जमावाचा जडाव नाला-तोफा वकील वेऊन...'—पेद ३.११६. ३ हुद्यावर कायमची नेमणूक. [जडणें] ०जोहर-हार, जडावाचे दागिने—नपु अव. सोन्याच्या कोंदणांत रत्नें वगैरे बसवून केलेले अलंकार, दागिने.

जडावणें—अक्रि. १ जोर वाढणें (पाऊस, वारा, रोग इ०चा). 'तेव्हां ती (जखम) जडावून राजास मृत्यूचीं चिन्हें होऊं लागलीं.'—इंग्लंडची बखर पृ. ११९. २ मरमराटीस येणें (बसलेला व्यापार). ३ जड होणें (त्रासदायक ओझें). ४ सुस्त, बधिर होणें (शरीर). ५ संपन्न होणें; श्रीमंत होणें; गांडीखालीं अब येणें; जडकावणें पहा. [जड]

जडित, जडीत—न.रत्नखचित अलंकार. —वि.=रत्नखचित 'ल्याली जडिताचें भूषण।'—ऐपो ७. [जडणें] ०जोहार—जोहार—जडावजोहर पहा.

जडी—स्त्री. वर्षभर जगणाऱ्या कापशीची एक जात. —कृषि ३८४.

जडी—स्त्री. मूळ; औषधी. पाळें. [सं. जट; हिं. जड] ०धरणें—१ मूळ धरणें २ (ल.) कायम, बळकट होणें. जडीबुट्टी—स्त्री. १ औषधी गुण असलेलें झाडाचें मूळ. २ आपत्कालासाठीं साठवून ठेवलेला पैसा. ३ (ल.) अद्भुत रीतीनें कार्य घडवून आणणारी अशी वस्तु; ताईत, गंडा, दोरा वगैरे.

जडीप-ब—जडप-व पहा.

जडीव—न. तुकड्यातुकड्यांचा जोडून केलेला पदार्थ. —वि. १ सांधलेलें; शिवलेलें, (मुख्य वस्तूला दुसरी वस्तु) २ जोडलेलें; ठिगळ मारलेलें; तुकडे तुकडे एकत्र केलेलें. ३ जोडलेलें. ४ कोंदणांत बसविलेलें. 'हा दागिना जडीव आहे.' [जडणें]

जड्या—पु (अव.जडे) पच्चीकाम, जडितकाम करणारा; पंचीगर. 'जडेलोक त्याच्या (हिऱ्याच्या) योगानें रत्नें कापितात.' —मराठी ६ वें पुस्तक पृ. ११४. [जडणें] जड्या भाऊ—पु. लटपटी करून काम, मुद्दा साधणारा. 'हा त्या गांवचा प्राचीन उपाध्याय नव्हे जड्या आहे.' ०गणपति—पु निरनिराळे हातपायादि सुटे अवयव जोडलेला गणपती याच्या उलट ठसा किंवा छापाचा गणपती.

जड्ड—न. (वे.) आजार; रोग. [का. जड्डु]

जण-णी-णें—पु न. (अव.) माणूस; व्यक्ति; असामी; लोक. या शब्दाच्या मागें संख्यावाचक शब्द लावतात. जसें दोन-तीन-चार-जण. 'ऐसे तिघे जण प्रबुद्ध थोर जाले।'—पंच १.२. दोघे-तिघे-चौघे जण किंवा व्यक्ति. हा शब्द फक्त मनुष्यांनाच लावितात. जन पहा. [सं. जन] (वाप्र.) जण हाराचें-जण चोराचें—कांहीं लोक चोराच्या बाजूला, कांहीं लोक धन्याच्या बाजूला असतात अशांना उद्देशून. जणाचे हातीं दोन धोंडे—कोणत्याहि तऱ्हेनें वागलें तरी लोक खुष राहात नाहींत याअर्थी. जणांत मिसळून राहणें-असणें—लोकांत मिळून मिसळून राहणें-असणें. जणकथा-वाल-जाहीर-मर्यादा-लज्जा-वाद—जन मध्यें पहा [सं. जन. पं. जणा; गु. जण; सिं. जणो; फ्रेंजी जेनो]

जणुं-जणों—अ. जसें काय; जसें कांहीं, जणु काय, मला वाटतें, दर्शनी. 'मुख दिसतें जणुं चंद्र उगवला।' [सं. ज्ञा=जाणणें—जाने=मला वाटतें]

जत—स्त्री संघ; जूट; संयोग; एकविचार. [सं. युति] ०नामा—पु. वंशावळ; वंशवृक्ष.

जंत—पु पक्वाशयांत उत्पन्न होणारे वाटोळे, चपटे, निळे, काळे कृमी; हे फार वाढले म्हणजे आमाशयाकडे येतात व त्यामुळें श्वासोच्छ्वास, ढेकर यांस बाण येते. यांचे पांच प्रकार आहेत यांच्या हालचालीनें मळ पातळ होतो व शूल, अशक्तता, फिकटपणा, अग्निमांद्य, वगैरे विकार होतात. —योर १.५१५. [सं. जंतु] ०वाताळें—न. जंतामुळें फुगणारें पोट. ०विकार—पु. पोटांत जंत झाल्यामुळें होणारा विघाड. जंतांचा उपद्रव—पु. जंतांपासून होणारी पीडा; दुःख.

**जतकारणी-णें**—जतावणी-विणें पहा.

**जतकी**—स्त्री. (वे.) बैलाच्या गळ्यांतील पट्टे. [का. जत्तिगि]

**जतन-जतनें**—क्रिवि. काळजीनें ठेवलेलें. (क्रि० करणें; ठेवणें; राखणें; असणें). 'तुझा पैका मजकडे जतन आहे.'

**जतन, जतना, जतनाई**—स्त्री. निगा; जपणूक; तत्परता; काळजीपूर्वक रक्षण; संरक्षण; संगोपन. 'हें आतां जतन करी नाम.' –तुगा १६४८. 'जतन करीगे याचें स्वाधिन केला न कापितां नाळ।' [सं. यत्न] **जतनेस-नाईस-ठेवणें-घालणें-असणें**-कोणाच्या स्वाधीन काळजीनें उपचार होण्यासाठीं संरक्षण होण्यासाठीं ठेवणें. **जतनाविणें**-सक्रि. काळजी घेणें; रक्षण करणें; शुश्रूषा करणें; सुरक्षित राखणें. **जतने**-क्रिवि. (कु.) संभाळून, जपून, सावधगिरीनें. 'बुळबुळीत झाड आहे, ज-ने चढ.' **जतनेऊन**-क्रिवि. (कु.) काळजीपूर्वक; सावधगिरीनें; निगा राखून. [जतन]

**जतनाय**—स्त्री. (गो.) संचय; साठा. [सं. यत्]

**जंतर**—न. १ (खा. सोनारी) तार काढण्याचें यंत्र, पट्टी. २ (आश्चर्यकारक आणि कल्पक) यंत्र. ३ तीक्ष्ण धारेचें शस्त्र, आयुध. [सं. यंत्र] **०पट्टी-पाटी**-स्त्री. (सोनारी) एकापेक्षां एक बारीक अशीं अनेक भोकें पाडलेली लोखंडी जाड पट्टी. या भोकांतून तार ओढून अवश्य तितकी बारीक करतात. (गो.) जतीर. **०मंतर**-पुन. १ जादुटोणा; छां छुं; छुं मंतर; थातुरमातुर. २ (दिल्ली) वेधशाळा (सवाई जयसिंगानें बांधलेली). [सं. यंत्र+मंत्र]

**जंतरवाय**—(गो.) चावटपणा; फाजीलपणा. [चतुराई]

**जतान**—स्त्री. (कु.) शुश्रूषा. [जतन]

**जतावणी**—स्त्री. सूचना; इषारा; ताकीद. [जताविणें]

**जताविणें**—सक्रि. सूचना देणें; बजावणें; हुकूम करणें; सक्तीनें मना करणें. [हिं. जताना; सं. यत्]

**जती**—पु. जैन लोकांतील संन्यासी; साधु; यति. २ योगी. 'कोमलांग राजीवनेत्र नव्हे शिवासारखा जती।' –प्रला ७. [सं. यति] **जत्या म्हणणें**—जती (यति) चे पवित्र लेख (स्तोत्रपाठ) वाचणें. 'त्यानें आम्हां देखतां साचार। जत्या केल्या पाठांतर।' यावरून (ल.) **०म्हणणें, मारणें**-गप्पा छाटणें, मारणें.

**जती**—स्त्री. जत्रा; यात्रा 'पुढें येते देवी। तिची जती चालों यावी।' –तुगा २८४. [जत्रा]

**जंती**—स्त्री. (वे) (अव. जंत्या) कडीपाटाच्या कड्यांवर व किलच्यांच्या खालीं बसविलेल्या गोलचीच्या लहान पट्ट्या

**जतीमती, जथामथी**—स्त्री. १ एकजूट; एकविचार. संयोग; एकमत. २ (कायदा) एकाची पूर्णपणें किंवा पुष्कळांची पृथक्पणें किंवा सर्वांबद्दल एकाची, किंवा प्रत्येकाची स्वतःबद्दल आणि सर्वांबद्दल जबाबदारी; एक जती एक मती पहा. [सं. युति + मति; जथणें + मथणें]

**जतीर**—न. १ (कु.) कुंभाराचें चाक. २ (खा.) कापसाची सरकी काढण्याचें यंत्र; कापूस लोढण्याचा रहाट जीन. [सं. यंत्र]

**जंतु**—पु. सजीव प्राणी-विशेषतः सरपटणारा प्राणी किंवा कीटक; कृमि (खालच्या जातींतील). [सं. जन्=उत्पन्न होणें] **०शास्त्र**-न. रोगकारक कृमींबद्दल विवेचन करणारें शास्त्र.

**जतो, जथो, जत्ता**—पु. (कों. राजा. गो.) (कुण.) लग्नामधील नवरानवरीला लागणारें किंवा अहेराचें कापड. [जथणें]

**जत्र**—क्रिवि. (काव्य) जेथें. 'जत्र जीव तत्र शिव हें तों न ये माझिया मनासी।' –ज्ञागा २९६. [सं. यत्र]

**जंत्र**—न. १ यंत्र. २ जंतरपट्टी पहा. ३ तोफ; बंदुक. 'जंत्रावरि चील मार।' –ज्ञा. ११.३९५. ४ (गो.) लांकुड पोखरण्याचें साधन [सं. यंत्र] **जंत्रांतून ओढणें**-१ (ल.) कडक शिस्त लावणें (दांडग्या मुलास). २ कसोटीनें पाहणी, परीक्षा करणें (हिशेब, जवानीमध्यें) **जंत्रांतून ओढलेला**-वि. अतिशय कृश झालेला; चरकांतून काढलेला. **जंत्रीं ओतलेला**-वि बांधेसूद; साच्यांत ओतल्याप्रमाणें सुरेख. **जंत्रीं धरणें**-कडक रीतीनें वागवून काम घेणें; तरवारीच्या धारेवर धरणें. **पट्टी-जंत्राची पट्टी**-स्त्री. जंतरपट्टी पहा. **०मंत्र**-जंतरमंतर पहा.

**जत्रा**—स्त्री. १ यात्रा; मेळा; (देवप्रीत्यर्थ उत्सवसंबंधीं). २ यात्रेकरूंचा मेळा. ३ यात्रेचें ठिकाण; क्षेत्र. [सं. यात्रा]. **०करणें**-१ क्षुद्र देवतांना बकरें, कोंबडें इ० बळी देणें. २ (क.) भूतबाधा न होण्याबद्दल कोंबडें किंवा बकरें मारणें.

**जंत्री**—स्त्री. १ क्रमवार यादी; सूचीपत्र, अनुक्रमणिका; कोष्टक, गोष्टी किंवा हकिकती यांची परंपरा, सांखळी, शकावली जसें-कायद्याची-चवाची-दराची-वहिवाटीची-सनाची जंत्री; हकीकतीची, गोष्टींची, हिशोबाची ग्रंथांची-जंत्री २ सनवार कोष्टक. ३ (बडोदें) यादी; सूची; कॅटलॉग. ४ (बडोदें) अंदाजपत्रक; बजेट –वि. यंत्रानें तयार केलेलें; बनवलेलें. [सं. यंत्र]

**जंत्री**—स्त्री. (व.) मूस. 'त्याची बायको इतकी सुस्वरूप होती कीं जशी कांहीं जंत्रींतून ओतली आहे.' [सं. यंत्र]

**जत्रु**—न. गळ्याजवळील हासळीचें (सरीचें) हाड. [सं.]

**जत्रेकरी-करू**—पु. यात्रेकरू-करी. [सं. यात्रा]

**जथ**—स्त्री. जूट; जमाव; समुदाय. [सं. यूथ] **जथणें**-सक्रि. १ एके ठिकाणीं जमणें; युक्त्या-प्रयुक्त्या करून एकत्र जमविणें, गोळा करणें (पैशाची रक्कम) तयार करणें, बांधणें (इमारत); एका रांगेत जमणें, उठणें चालीस लागणें; आरंभ करणें (दुकान, धंदा इ०). 'मी युक्तिप्रयुक्तीनें हजार रुपये जथले होते.' 'चौघांकडून चार लांकडें आणून एकदांचें घर जथलें.' 'धोंड्यावर धोंडे घालून लग्न जथलें.' २ तयार करणें, रचणें (पुस्तक). ३

जोडणें; जुळविणें. 'कोणती कशी गोष्ट मी जथूं।'—कचेसुच १६. (गो.) जथचें=जुळून येणें, सांचणें. जथविणें—सक्रि. जमविणें; गोळा करणें; एकत्र आणणें; घडवून आणणें.

जथा—पु. १ समूह; तांडा; मंडळी. २ कुटुंब; वंश; जात; कूळ; टोळी. 'सूर्यवंशी जथा निका।'—वेसीस्व ६.५२. [सं. यूथक; हिं. जथा] ०जथ-पत-थ—स्त्री. १ समूह. ढीग; एकत्र जमाव; युक्तिप्रयुक्तीनें केलेला (पैशांचा) संचय. २ एकत्र आणणें, सर्व बाजूंनीं गोळा करणें (अस्ताव्यस्त पडलेले पदार्थ). ३ धंदा किंवा काम यांच्यासाठीं केलेली सर्व तऱ्हेची उपाययोजना. ०बंध—क्रिवि. एकदम; एकत्र. ०वळ—स्त्री १ जथा अर्थ २ पहा. २ (आनुवंशिकता रोग, दुर्गुण, इ०ची) दाखवितांना विशेषतः उपयोग करितात. जथेकरी—पुअव. शेतकऱ्यांच्या टोळ्या. जथेवार—क्रिवि. कुळवार. जथो—पु. (चि.) ज्या वधूवरांचें लग्न व्हावयाचें त्यांचीं वडील आणि धाकटीं भावंडें. आई-बाप इ० चा समूह. (लग्न जुळविण्यापूर्वी पहाण्याचें एक आवश्यक कृत्य). —मसाप २.३६५.

जदीद—वि. १ नवीन (शिपाई, चाकर). २ अलीकडचा; नुकता. 'जदीद करार झाला.'—ख ७.३५७०. [अर. जदीद्]

जंद्री—स्त्री. (कु. गो.) पायांत घालण्याची-रुप्याची सांखळी; तोडा. (अव.) जंद्रो. [फा. झंजीर-जंजीर पहा]

जधीं—क्रिवि. जेव्हां, ज्या दिवशीं. 'जधीपासून हरि जन्मला आनंद चित्तीं।'—पला २४. [सं. यदा]

जन—पु. १ माणूस. (व्यक्तिशः व एकत्र) 'तुजं नको जन कोण म्हणे असें।'—र४७. २ जमाव (माणसांचा) (समासांत) मनुष्य-जन=मनुष्यजात; श्वजन=कुत्र्याची जात. ३ जग; लोक 'जैसा जनामाजी खेचर।'—ज्ञा ५.९९. म्ह० एकाचें जनाचें करावें मनाचें. ४ (प्र.) पु एव. मी. 'प्रसाद चतुरा कसा तरिं करा वरा हा जन।'—केका ६३. [सं.] जनकथा—स्त्री (प्रमाणरहित) दंतकथा, गोष्ट; परंपरागत हकीकत; आख्यायिका. [सं. जन+कथा] जन-चर्चा—स्त्री. लोकचर्चा, बोलवा. ०चार-चाल—पु.स्त्री. जनाचार; सर्वसामान्य लोकांची चाल, रीत ०जाहीर—वि. जगजाहीर [जन+अर. झाहिर] जनता—स्त्री. लोकसमूहः समाज. 'शतयोजनें तदाश्रित जनता ती सर्व दुःख निस्तीर्णा।'—मोसभा १.२३. जनदाटी—स्त्री. लोकांची गर्दी. 'तैसी जनदाटी बहु जाली।'—दावि ४२६. ०नीति—स्त्री. सामान्य समाजाची नीति; लोकवर्तन. ०पद—पु. देश; प्रांत. ०पदधर्म—पु. जननीति पहा. ०पदभाषा—स्त्री. देशी भाषा. 'गीर्वाण शब्द पुष्कळ जनपद भाषांचि देखतां थोडी।'—मो मंत्ररामायण, परिभाषा १७. ०प्रवाद—पु बाजार-गप्पः कंडी. ०प्रवाह—पु. जनरीत. ०प्रवृत्ति—स्त्री. लोकप्रवृत्ति; लोकांची चालचलणूक, रूढी, प्रघात. ०मर्यादा—स्त्री. सामान्य चाल, रीत, प्रवृत्ति; लोकरीत. ०रंजन—न. लोकांस आवडेल अशी वृत्ति; लोकांची करमणूक; त्यांस सुख देणें; लोकानें रंजन; लोकतृप्ति. ०रव—पु. १ गोंगाट (लोकांचा); बाजारगप्प; कंडी. ०रीति-रीत—स्त्री. लोकांची चालचलणूक, वागण्याची पद्धति. जनप्रवृत्ति पहा. ०रूढ—वि. लोकांत चालत आलेलें. ०रुढी-रुढ—स्त्री. लोकांची चाल-रीत. ०लज्जा-लाज—स्त्री. १ लोकांस काय वाटेल यासंबंधीं आशंका; लोकमताला मान देणें. २ लोकांची भीति. ०लोक—पु १ प्रत्येक मनुष्य. २ सप्तलोकांपैकीं पांचवा लोक. सप्तलोक पहा. ०वंदती-वाणी—स्त्री जन-प्रवाद पहा. ०वन—न. संसार आणि अरण्यः गृहस्थाश्रम, आणि वानप्रस्थाश्रम.'अहंता टाकूनि सर्वस्वें। जनवन समान भासे।' ०वाक्यजनार्दन—सर्व लोकांचें म्हणणें तें देवाचेंच ही समजः पांचामुखीं परमेश्वर. ०वाढ—स्त्री. दिढी, दुढी. हंगामांत सर्व लोकांनीं योग्य अशी ठरविलेली (अगाऊ दिलेल्या धान्याची) वाढ. ०वाद-वार्ता-श्रु न—पुस्त्री. जनप्रवाद पहा. ०व्यवहार-शिरस्ता—पु जनरूढी, जनरीत पहा. ०स्थान—न दंडकारण्यांतील एक ठिकाण. विशेषतः नाशिक जवळचा प्रदेश. 'जनस्थानीं वाट पाहे श्रीराम कृपानिधि।'—सप्र २.७५. जनस्वी—वि. लोकांसारखा वागणारा. 'माहायोगी आणी जनस्वी। जनासारिखे।'—दा १.८.११. जनाचार—पु. जनरीत.—क्रिवि. लोक वहिवाटीप्रमाणें. जनापवाद—पु. दोषारोप, ठपका. 'लीलावती शिकतो तो दरिद्री होतो असा जनापवाद मात्र आहे.' 'शर सह्य पार जातां हृदयींच जनापवाद-शर थारे।'—मोवन ९.५०. जनींजनार्दन—सर्व लोक हे देव-स्वरूपी आहेत अशी कल्पना. लोकमत हेंच देवाचें मत. 'जनीं जनार्दन म्हणोनी जना। संतुष्ट करावें।'—दा १८.४.३५. जनीं-मनीं—क्रिवि. (काव्य.) आंत-बाहेर; प्रकट आणि गुप्त. जनीं-वनीं—क्रिवि. गांवांत आणि (अथवा) वनांतरांत; लोकसमाजांत आणि अरण्यांत.

जनक—पु. पिता; बाप. 'करुनि जनक मार्गा धांवतां वेग गांठी।'—मुरामा ६.२९९. [सं] —वि. उत्पन्न करणारा; कारक. समासांत—हास्य-प्रीति-मृत्यु-अनिष्ट-कल्याण-जनक. जनक-पिता—पु जन्म देणारा बाप. याचे उलट दत्तक घेतो तो पिता. जनणें—अक्रि. प्रसवणें; विणें; जन्म देणें. [सं. जन्=जन्मणें]

जनन—न. जन्म; उत्पत्ति. [सं.] ०शांति—स्त्री. अनिष्ट प्रहावर जन्म झाल्यास शास्त्रोक्त जी शांति करावयाची ती. जननशास्त्र—न. उत्पत्तिशास्त्र. —नाशौच—न. सोयर. वृद्धि ०स्थान—न. जन्मठिकाण. ०स्थितिलय—न. उत्पत्ति-स्थिति-नाश. जननी—स्त्री. आई, माता. जनि—स्त्री. जनन; जन्म. जनित—वि. जन्म-लेला; उत्पन्न झालेला; तयार केलेला (समासांत) —संताप-संपत्ति गर्व-क्रोध-भय-लोभ-शोक-जनित. जनिता—पु. निर्माणकरता;

कारण; कर्ता, बाप; पिता. जनिष्यमाण-वि ज्याचा जन्म व्हावयाचा आहे असा; जन्मास यावयाचा. [सं.] जनु-जन्म. 'घेतां नांव जिंचें अनंत जनुचें जें पाप देहीं असे।' -नरहरि-गंगारत्नमाला २४. (नवनीत पृ. ४१९.)

**जनरी**—स्त्री. (गो.) पायांतील साखळी; तोडा; जंजीर, जंझी पहा.

**जनॅल**—न. (गो.) खिडकी [पो. जनेला]

**जनाजा**—वि. मानेवर केसांचे चार भोंवरे असणारा (घोडा).

**जनात**—स्त्री. (नाविक) जास्त मजबुतीसाठीं कांठाच्या खालीं जाडी फळी घडतात ती. ही जनात सर्वच गलबतांस असत नाहीं. जनातीची फळी घडण्याच्या फळीपेक्षां जाड असते.

**जनानखाना, जनाना, जनदानखाना**—पु. अंतःपुर; गोषा; राणीवसा; राज्यांतील एक खातें [फा. झनान्=स्त्रिया] **जनानी** वि. १ बायकांसाठीं केलेलें; बायकांना योग्य असे (वस्त्र, पदार्थ). २ बायकी गळयाला शोभणारें (गाणें, पेहराव). ३ बायकी (वागणूक, हावभाव, विचार, आवाज). ४ बायकी; नेभळेपणाचें, नामर्दपणाचें; याच्या उलट पुरुषी. ५ हिजडा नपुंसक [फा. झनानी]

**जनाब**—संबोधन. स्वामी; महाराज. [अर. जनाब]

**जनाब**—पु. १ उंबरठा २ अंगण; बाजू 'रघुवंशाचे जनाबांत सेवक लोकांनीं हजर असावें' —रा ३ ७३. [अर. जनाब्=श्रेष्ठत्व] **॰आली**-१ महाराज; बहुमानदर्शक संबोधन. २ उंच उंबरा.

**जनाबा**—पु. (व.) मुलाबाळांचा खटला; पसारा. [जन]

**जनार्दन**—पु. विष्णु. [सं.]

**जनार्दनी ऊद**—पु. पिंवळसर आणि चांगल्या जातीचा ऊद.

**जनावर**—न. १ पशु; चतुष्पाद प्राणी. २ (ल) साप. [फा. जानवर. मूळ फारशी शब्दाचा अर्थ प्राणी असा आहे. मराठी फक्त पशूला लावतात; तुल॰ सं. जन=जन्मणें] (वाप्र.) **॰उखळणें**-(माण.) पायाचें मूळ सुटणें; सांधा निखळणें. **॰ठिपणें**-मारलेल्या दगडानें जनावराचा पाय दुखावला जाणें. **॰तणकटणें**-गवत खाऊन खूप फुगणें. **॰बुरट असणें**-थोडें दूध देणारें असणें. **॰वांगरल्यासारखें दिसणें**-दुखणें असल्यासारखें दिसणें.

**जनित (करण)**—न. (नृत्य) एक हात वक्षःस्थळावर ठेवणें व दुसरा हात लोंबत सोडणें व चवडयावर उभे राहणें. **॰भौमिचारी**-स्त्री. (नृत्य) एक हात मुष्टिहस्त करून छातीवर ठेवणें व त्याच बाजूचा पाय अग्रतलसंचर करणें. [सं.]

**जनी, जनीचें पान**—स्त्रीन. एकप्रकारचें विडयाचें पान; पानवेलीचा प्रकार हें लहान, काळें, सुवासिक, तिखट, दोन्ही बाजूला खोंच असलेलें व बायकांना खावयास योग्य म्हणून यास बाइलीचें पान म्हणतात.

**जनुबा-जनूब**—स्त्री. दक्षिणदिशा [फा.]

**जनांबा**—पु. कर्नाटकांत घंडाला म्हणतात.

**जनोबाभट्टी**—वि. मोडी अक्षर लिहिण्याची एक घाटी; चिवलकरी वळणापेक्षां सरस. जनोबा नांवाच्या लेखकावरून.

**जन्नत-नशीन**—वि. कैलासवासी; स्वर्गवासी. [फा. जन्नत्=स्वर्ग+निशीन].

**जंव्हा**—क्रिवि. (गो) जेव्हां.

**जन्म**—पु. न. १ उत्पत्ति, प्रसव. २ आयुष्यमान. 'मी जन्मांत खोटें बोललों नाहीं.' ३ (समासांत) जन्मापासून. एकंदर आयुष्यभर जसें-जन्म-रंडा ॰ोड ॰ाठ ६० [सं. जन्=उत्पन्न होणें] (वाप्र) **॰घेणें**-अस्तित्वांत येणें. **॰जाणें**-(आळसामध्यें) आयुष्य खर्च होणें. **जन्मणें**-१ उत्पन्न होणें जन्मास येणें; निपजणें उपजणें. २ जन्म देणें जन्म [illegible] —णें (ल) ऋतुस्नात होणें न्हाण येणें. **॰देणें**-[illegible] होणें प्रसूत होणें. **जन्मान्जन्म**-१ जन्मप्रभृति. जन्मापासून. जसें जन्माचा रोग=वंशपरंपरेचा, जन्मापासून असलेला रोग. जन्माचा रोगी=जन्मापासून आजारी. २ जन्मभर टिकणारें जसें-जन्माचा गोड-सोबती=[illegible] ऋणानुबंधी [illegible] परि[illegible] [illegible] पदरात घेणें-एखाद्याच्या पालनपोषणाची जबाबदारी जन्मभर अंगावर घेणें. **-चा पाटा वरवंटा घेणें** एखाद्यास जन्मभर पोसणें, त्याच्यासाठीं श्रम घेणें. **-ची आठवण राहणें**-१ जन्मभर स्मरण ठेवणें; कधींहि विस्मृति न होणें. २ पक्की अद्दल घडणें. **-चे करणी कर्मी**-जन्मांतून एकदां होणारी, वारंवार न होणारी गोष्ट, कृत्य. नामाशीं याचा क्रियाविशेषणासारखा उपयोग करितात. 'त्यानें जन्माचेकर्मी एक मुंज केली परंतु दमडी दमडी दक्षिणा दिली.' **-तून जाणें**-(क.) निरुपयोगी होणें. (कर्तव्यशून्यमाणसासंबधीं योजतात). **जन्मास घालणें**-अस्तित्वांत आणणें. **॰घालणारास रडणें**-जन्मदात्याच्या नांवानें रडे फोडणें. **जन्मास येणें**-अस्तित्वांत येणें. **नवा जन्म होणें**-एखादा भयंकर अपघातांतून किंवा रोगांतून उठणें. **अन्य जन्मीं**-दुसऱ्या जन्मांत. म्ह॰ १ जन्मीं नाहीं तें कर्मी (अनिष्ट गोष्ट दाखवितांना म्हणतात). २ जन्मा आला हेला आणि पाणी वाहतां मेला. **समासशब्द**—**॰करंटा**-वि जन्मापासून दरिद्री, दुर्दैवी. **॰कर्म**-न. १ आयुष्यांतील विशेष काम; आश्रमधर्म. २ उत्पत्ति आणि कार्य आयुष्यांतील एकंदर हकीकत 'तूं काय समजलास? तुझें जन्मकर्म मला ठाऊक आहे' **॰काल-ळ**-पु. १ जन्माची वेळ. २ जन्मपत्रिका. ३ सर्व आयुष्य म्ह॰ जी खोड बाळा ती जन्मकाळा. **॰कुटाळ, जन्माचा**

कुटाळ–पु. नेहमींचा कुचेष्टा करणारा; नेहमीं कुटाळी करणारा. ०कुंडली–स्त्री. ज्या लग्नावर जन्म होतो त्या लग्नकाळचें ग्रहांच्या स्थितीचें कोष्टक. ०कुन्हाड–स्त्री.(ल.) नेहमींचा त्रास देणारा; गांव कुटाळ, सतत त्रास देणारा. ०खुंट–पु. (खोखोचा किंवा खोकडाचा खेळ) सीमेवरचे, दोन टोंकांवरचे गडी (माणस किंवा वस्तु). ०खोड–स्त्री. जन्मापासून लागलेला किंवा हाडीं मासीं खिळलेला दुर्गुण. ०गांठ–स्त्री. १ जन्मभर टिकणारा संबंध. २ वाढदिवस. [सं. जन्म+ग्रंथि] ०गुण–पु. स्वाभाविक गुणधर्म. ०चुडेल–चुडेल–स्त्री. (निंदार्थी) भांडखोर, कजाग स्त्री ०जन्मांतरीं–०जन्मीं–क्रिवि. पूर्वीपासून झालेल्या सर्व जन्मांमध्यें आणि ह्या जन्मांत अनेक जन्मांत. ०जुगाक–क्रिवि. (गो) आजन्म; प्राण असेपर्यंत. ०जूग–वि. जन्मभर पुरेल असें. 'जन्मजूग हातांत। विभूतिचा गोळा।'–अमृत १२८. ०जोड–स्त्री. जन्मभर पुरेल इतका साठा. ०जोडा–पु. जन्मगांठ पहा. ०टिपण–न. जन्मपत्रिका. ०तः–क्रिवि. १ जन्मापासून; जन्मामध्यें. 'जन्मतः वाईट गोष्ट मजपासून घडली नाहीं.' २ स्वाभाविक; स्वभावतः 'कोणी जन्मतः शहाणा असतो कोणी पढून होती.' जन्मतिथि–स्त्री वाढदिवस. जन्मकालची मिति. ०दगदगी–वि. नेहमीं काळजीचा, नेहमींचा चिंताक्रांत ०दरिद्री–भिकारी–वि. जन्मापासून भिकारी. ०दिन–दिवस–पु वाढदिवस;जन्मतिथि ०नक्षत्र–न ज्या नक्षत्रावर जन्म झाला तें. ०नाम–नांव–न. जन्मनक्षत्राच्या संबधानें अवकहडा चक्रावरून (बारशाच्या दिवशीं) ठेवलेलें नांव. ०पत्री–पत्र–पत्रिका–पत्री–स्त्रीनस्त्री जन्माच्या वेळचें वर्ष, तिथि, राशी, कुंडली इ० लिहिलेला कागद व त्यावरून सगळ्या जन्मामधील घडणाऱ्या गोष्टींचें तयार केलेलें कोष्टक; जन्मटिपण 'याची करा जी जन्मपत्री।'–कथा ५.४.१५. ०पाश–पु. जन्म, आयुष्य संपेपर्यंत मागें लागलेलें संकट, लचांड. ०प्रभृति–क्रिवि. जन्म झाल्यापासून. ०भाषा–स्त्री. मातृभाषा; मायभाषा; मूल जन्मापासून जी भाषा बोलतें ती. ०भूमि–भूमिका–स्त्री. मायदेश; जेथें जन्म झाला ती जागा. ०मरण–न. जन्मणें आणि मरणें; यांची परंपरा; जन्ममरणाची आवृत्ति. 'पुनरपि जननं पुनरपि मरणं।' ०मरणाधीन–वि. जन्ममृत्यूच्या स्वाधीन. ज्या गोष्टीस जन्म व मृत्यु लागलेले आहेत अशी (अशाश्वतपणा दाखविणारी). ०मर्याद–क्रिवि मृत्यु येईपर्यंत; सर्व जन्मभर; आजीव ०मास–पु. ज्या महिन्यांत जन्म झाला तो महिना ०योग–पु जन्मकालीन ग्रहांची शुभाशुभ फलसूचक स्थिति ०राशि–रास–पुस्त्री. ज्या राशीवर जन्म झाला ती, जन्मकालीं चंद्र ज्या राशीस असेल ती रास ०रोग–पु. जन्मापासून जडलेला रोग. ०रोगी–वि जन्मापासून आजारी; नेहमींचा दुखणेकरी. ०लग्न–न. जन्मकालीं जी राशीउदय पावत असेल ती. ०लिखित–जन्मपत्र पहा. ०वर–भर–क्रिवि आयुष्यभर. 'जन्मवरी स्वार्थ केला।'–दा ३.५.५०. ०विता–वि जन्म देणारा. ०व्रती–वि. जन्मभर व्रत घेणारा, आचरणारा. ०सवाशीण–सौभाग्यवती–स्त्री. १ सौभाग्यानें मरणारी २ (ल) वेश्या. ०सळ–वि. जन्मापासून खोडकर; त्रासदायक (मूल). ०सांड–स्त्री. जन्मापासून एखाद्या गोष्टीपासून पराङ्मुखता. (क्रि० देणें; करणें). ०साफल्य–सार्थक्य–न. आयुष्यांतील ध्येयाची सिद्धि. ०सावित्री–स्त्री १ (आशीर्वाद देतांना) जन्मसवाशीण 'तूं जन्मसावित्री होसी। चंद्रार्कवरी राहसी।'–कथा १ २ १७०. २ (ल) पांघरण्याचें किंवा नेसावयाचें जें कधीं धुतलें जात नाहीं असें वस्त्र ०सोंवळा–वि. १ जन्म सावित्री अर्थ २ पहा. २ (पवित्र समारंभामध्यें). तसलें सोंवळें नेसणारा ०सौभाग्य–न. जन्मापासून चांगलें नशीब. ०स्थ–वि. जन्मलग्नामध्यें असलेला; जन्माच्या वेळेचा (ग्रहकुंडलींतील). ०स्थान–न १ जन्मभूमि. २ जन्मलग्न. ०स्थानीं लघुशंका करणें–१ मातृगमन; मात्रागमन. २ (ल.) उपकार करणारावर अपकार करणें; कृतघ्नता. ०स्वभाव–पु. जन्मापासूनची वृत्ति, वागण्याची तऱ्हा. जन्माची प्रकृति. –ची गांठ–विवाहासारखा कधीं न तुटणारा संबंध. –ची जोड–१ जन्मजोड पहा. २ पतिपत्नी–बापलेक संबंध. ची भाकरी–बेगमी–जन्मभर टिकणारें पोटापाण्याचें साधन. –ची सांट–जन्माची भाकर पहा. जन्माचें सार्थक–जन्मांतील ध्येय, उद्देश, हेतु. (क्रि० करणें). जन्मांतर–न १ दुसरा जन्म (मागचा किंवा पुढचा). २ नशीव; दैव 'ज्या पालखींत बसावें असें माझें जन्मांतर नाहीं.' ०आठविणें–लहानपणचे दिवस आठविणें ०उपटणें–नशीब चांगलें अथवा वाईट अनुभवास येणें. ०काढणें–(ल.)–बद्दलचा अस्सल दस्तैवज शोधून काढणें. ०सांपडणें–मिळणें–हातास लागणें–वरील प्रकारचा दस्तैवज मिळणें, सांपडणें. ०पाहणें–शोधणें–तपासणें–जन्मपत्रिका पाहणें; संसारांतील कामकाज पाहणें. ०फुटणें–नशीब फुटणें; दुर्दैव ओढवणें जन्मांतरीं न घडणें–न होणें–संबंध जन्मांत न होणें जन्मांतर–कथा–गोष्ट–हकिकत–स्त्री मागच्या आयुष्यांतील गोष्ट किंवा वाईट कृत्य जन्मांतर(रीं)चा–वैरी–दुष्मन–दावेदार–वि मागील जन्मामधील शत्रु; याच्या उलट जन्मांतरींचा मित्र, सहकारी (वाप्र.) जन्मांतरींचा द्वेष–वैर मैत्री–ऋणानुबंध इ० वगैरे. जन्मांतरचें ज्ञान–न लहान मूल किंवा प्राणी यांच्यामधील दिसून येणारी उपजत बुद्धि जन्मांतरयोग–पु. मागच्या जन्मीं केलेल्या चांगल्या कृत्यामुळें या जन्मीं सुख मिळतें ही कल्पना. जन्मारभ्य–क्रिवि. जन्मापासून (आतांपर्यंत). जन्मांध–वि जन्मापासून किंवा उपजत आंधळा. जन्माष्टमी–स्त्री. गोकुळअष्टमी. श्रावण वद्य अष्टमी. जन्माक्षर–न. पंचांगामध्यें अवकहडा चक्रांत

जन्मनक्षत्राला जें अक्षर असतें तें. जन्मोजन्म–जन्मीं–क्रिवि. या व पुढील जन्मांत; अनेक जन्मांत; निरंतर. जन्मजन्मांतरीं पहा. जन्मांत्तरी–जन्मोत्री–स्त्री. जन्मपत्र पहा. 'वरिष्ठें वर्तविली जन्मोत्री। यासी दोन पुत्र आणि येक स्त्री।' –कथा ३.३.७१

जन्य—न. युद्ध. 'नृपभगंदत्तादि नरवरा जन्य।' –मोभीष्म ११.७६. [सं.]

जन्य—वि. १ जन्मलेला; उत्पन्न झालेला; तयार केलेला. (समासांत) पित्त–कफ–वात–शोक–क्रोध–काम–जल–अज्ञान–जन्य. २ अद्यापि जन्मणारा (भविष्यकाळीं). ०जनक–वि. उत्पन्न होणारा व करणारा यांचा जो परस्पर संबंध तो; पुत्रपिता (संबंध); कार्यकर्तृ (संबंध).

जन्यराग—पु. (संगीत) थाटामध्यें वर्गीकृत केलेला राग. विशिष्ट थाटावरून तयार झालेला राग.

जप—पु. १ वेदऋचा, गायत्री इत्यादि मंत्र यांचें पुनः पुन्हां पठण आवृत्ति; देवाचें नांव इ० मनांतल्यामनांत पठण करणें. २ मंत्र म्हणत जपाची माळ ओढणें. ३ (ल) निदिध्यास, उच्चार करणें; विवरण करणें (कार्य, इच्छा यांचें). (क्रि० धरणें; घेणें.) [सं.] ०जाप्य–न. जप व त्यासारखें इतर धार्मिक कृत्य. सकाळीं स्नान करून कांहीं जपजाप्य केलें पाहिजे.' ०तप–जपजाप्य पहा. ०माला–माळ–माळा–स्त्री. जपाची संख्यामोजावयाची माळ. ०धेणें–जप अर्थ २ पहा. ०यज्ञ–पु. नामस्मरणरूपी यज्ञ. जप्या–पी–वि. जप करणारा. जपीतपी–वि. नेमानें जप व तप करणारा.

जपण–णी, जपणूक—१ स्त्री. जतन; सांभाळ; राखण; वाट पहात बसणें; पाळत. (क्रि० करणें; जपणीस बसणें; लागणें) २ लक्ष लावणें. 'निजपणीं जपणी जड दाविना।' –वामन, नृहरिदर्पण ८१ [जपणें] जपणें–अक्रि १ सांभाळ करणें, लक्षपूर्वक नजर ठेवणें. 'चाकराम जपलें पाहिजे नाहीं तर जोगवील.' २ लक्षपूर्वक पाळणें, पहाणें. 'पथ्यास जपलें असतां औषधाचा गुण लवकर येतो.' ३ सावधानपणानें, काळजीपूर्वक वाट पहाणें. 'हंगामास जपलें तर जिन्नस सवंग मिळतो.' टपणें; टपून बसणें. 'तुझी स्त्री परम सुंदर। न्यावया जपती असुर।' [सं. गुप्] जपून–धातुअ. काळजीपूर्वक.

जपणें—अक्रि. १ पुन्हां पुन्हां उच्चारणें; वारंवार म्हणणें; जप करणें. २ (ल.) सारखी कुरकुर करणें; रडगाणें गाणें. 'द्रव्य गेलें तें गेलें आतां गेलें गेलें असें जपतोस कशास?' [सं. जप्=मनांत म्हणणें]

जपतव, जव्रतब—क्रिवि. कसें तरी; मोठ्या कष्टानें. जबतब पहा.

जंपती—पु. दंपती; नवराबायको. [सं. दंपती]

जपा—स्त्री. जासवंद (झाड व त्याचें फूल). [सं.] ०कुसुम–न. जासवंदीचें फूल. 'जपाकुसुम तेथेंचि विंवलें।' –रंयोवा ९.२५५.

जपाळ—पु.जेपाळ; जयपाळ पहा. (एक औषधी).

जप्त—पु. नियंत्रण; दबाव. 'असे लोकांवर जप्त कसा राहील?' –रा ५.५२. –वि. पकडलेलें; धरलेलें; सरकारजमा; (सरकारलें) अटकाव केलेलें. [अर. झब्त] –मुलूक–वि. प्रवेशजेता (संताजी घोरपड्यांचा किताब). ०रप्त, जफ्त रफ्त–पु. बंदोवस्त; व्यवस्था. 'करारवाके जफ्त–रफ्त करूं.' –रा ६.६१२. [फा. झब्त्–उ–रब्त्] जप्ती–स्त्री. १ जप्त करण्याची क्रिया; हरण; नागवणूक; अम्मल; ताबा; जप्त केलेला माल. २ (कायदा) मिळकतीवर खाजगी ताब्याऐवजीं कोर्टाचा ताबा सुरू करणें. ३ (ल.) नजरकैद. 'तुझे घरीं तुजवर जप्ती केली सखे सर्वत्रांहीं।' –होला १०३. जप्तीदार–चाला–पु. १ वेलीफ. जप्ती करणारा अंमलदार. २ (कों.) रत्नागिरी जिल्ह्यांतील खोतीगांवांत वसुलाकरितां सरकारनें नेमलेला नोकर; तलाठी; खोत कबुलायत देत नाहीं त्या वेळीं गांव जप्तींत टाकून सरकार त्या वर्षांपुरती वहिवाट करतें.

जफा—वि. (कु.) फाजील; जास्त. जाफा पहा.

जंब—पु. ढोंग. [सं. दंभ]

जब, जबा, जबे—स्त्री. विधीपूर्वक हत्या; वध; ठार करणें. 'पुढें गाय जब केली।' –ऐपो ११. (क्रि० करणें). 'काजीनें जबा करून द्यावी.' –भाइवसंवृ ६४. [अर. झब्ह]

जबडा—पु. तोंड; जाभाड; दामाड: (खालचा आणि वरचा या विशेषणासहित): वासलेलें तोंड. [हिं. सं. जभ्=जम्भ]

जबतब—क्रिवि. जेमतेम; कसें तरी; जपतव पहा. [हिं.]

जंबया, जंबिया. जंब्या—वि. एक प्रकारची कटयार; खंजीर. [फा. जंबिया]

जबर—पु. (पत्यांचा खेळ) डाव्या हातचा भिडू, खेळणारा.

जबर–रा—स्त्री. दरारा; वरचढपणा. 'जबर त्यांची सवसे ज्यादा गादीवर दवलतराव शिंदा।' –ऐपो १५२. –वि. श्रेष्ठ; ताकतवान (माणूस, पशु) जोराचा; सोसाट्याचा (पाऊस, वारा); कठिण; त्रासदायक (काम, ओझें); जंगी; मोठें (वर, नदी, झाड): उमट; कठिण (चढ, चढण): देण्यास कठिण; फार अवाढव्य (किंमत, दर): दुर्घट त्रासदायक (रोग): लांबलचक; कंटाळवाणा (रस्ता, मार्ग, प्रवास); अगडबंब, अवजड (दागिना) (प्रमाणराहित्य आणि प्रचंडपणा दाखविण्यासाठीं योजतात). [अर. जब्र: फा. झबर्] सामाशब्द– ०जंग–पु. लहान तोफ. –वि. शूर; जवानमर्द; लढवय्या. [अर. जब्र+फा–जंग] ०दस्त–वि. १ जुलमी; अन्यायी; दडप्या. २ श्रेष्ठ; मजबूत; बळकट; मोठ्या योग्यतेचा याच्या उलट जेरदस्त. ३ अदलावदलीनें जबर बरोबर योजतात. [फा. झबर्दस्त] म्ह० (व.)

जबरदस्तका ठेंगा शिरपर = जबरदस्तापुढें कुणाचेंच चालत नाहीं. ०दस्ती–स्त्री. १ जुलूम; जोर; अन्याय; बलात्कार. 'इंग्रजांची जबरदस्ती सर्वांवर पडली असें वाटतें.'–ख ११.६०३०. २ आवेशाचें कृत्य, यत्न; श्रम. 'जबरदस्तीनें नदी डोंगरावरून नेली.' जबरा–पु. (छापखाना) मोठा टाईप; मजकुरांतील स्थलनामें व व्यक्तिनामें या टाईपांत घेण्याची वहिवाट आहे. जबरी–स्त्री. जबरदस्ती. 'पादशाही जबरीनें घेईल.'–चित्रगुप्त पृ ३४. [फा. झबरी] जबरीची चोरी–स्त्री. (कायदा) दरोडा; कोणा मनुष्यास जीव घेण्याची वगैरे भीति घालून त्याच्यासमक्ष त्याच्या ताब्यांतून जंगम माल नेणें. जबरी-संभोग–पु. (कायदा) कोणा स्त्रीशीं तिच्या सम्मतीवांचून किंवा भय घालून मिळविलेल्या संमतीनें किंवा नवऱ्याचें नातें आहे अशी फसवणूक करून केलेला संभोग; बलात्कार.

जबर्जंग–दस्त—जबर मध्यें पहा.

जबात—वि. (गो.) हुषार; कुशाग्रबुद्धीचा; निष्णात.

जबान—स्त्री १ जीभ. २ वाणी; वचन. (क्रि० येणें; पाळणें). [फा. झबान् तुल० सं. जिह्वा] जबानी–स्त्री. साक्ष; (न्यायाधिशापुढील) साक्षीदाराचें लेखी, तोंडी म्हणणें, हकीगत. जबानीहुकूम–पु तोंडी हुकूम; लेखी नव्हे तो.

जबाब—पु १ उत्तर; प्रत्युत्तर; कांहीं एका प्रश्नास दिलेला जाब. २ हुंडीबरोबरचें त्रप. ३ (कायदा) प्रतिज्ञा. ४ तोंड. 'वाऱ्याचें मोंरु केवढें आहे व त्याचा जबाब कोठें आहे'–सूर्योदय १०९ [अर जवाब्] (वाप्र.) जबाबणें–क्रि. उत्तर देणें. हजर-जबाबी–तावडतोब उत्तर देणारा. सामाशब्द– ०दार–वि. ज्याच्यावर जबाबदारी आहे असा; जिम्मेदार; जोखीम घेणारा; भरंवशाचा. [फा. जवाब्दार] ०दार प्रातिनिधिक राज्यशासनपद्धति–स्त्री. जेथील कार्यकर्ते लोकप्रतिनिधींस जबाबदार असतात अशी राज्यव्यवस्था; रिस्पॉन्सिबल गव्हर्नमेंट या इंग्रजी शब्दास बनविलेला मराठी प्रतिशब्द. ०दारी–स्त्री. जिम्मा; जोखीम; भार [फा. जवाब्दारी] ०निशी–नीस–जबाबनिशी–नीस पहा ०सवाल–जाबसाल–पु. बोलणें. उत्तर प्रत्युत्तर. 'आम्ही जबाब सवाल केला जे.'–वरा ८१. जबाबी–वि. १ उत्तरें देण्यांत तयार; हुषार. २ ताशाचे ठोके वाजणारें (घड्याळ). 'एक घड्याळ जबाबी.'–रा १२.६८. ३ (कायदा) शपथ-प्रमाण करून न्यायासनापुढें सांगितलेली हकीगत, दिलेलें उत्तर. ४ (कों.) मामलेदाराच्या हाताखालचा जबाबलिहून घेणारा (कारकून). ०कार्ड–न जोडचिठ्ठी; उत्तर देण्याकरितां कार्ड जोडलेलें असतें असें कार्ड; रिप्लायकार्ड या इंग्रजी शब्दास प्रतिशब्द. ०हुंडी–स्त्री. पेढीवर पैसे भरून ज्याला पैसे पाठवावयाचे असतील त्याच्या नांवची पेढीवाल्या कडून घेतलेली पावती.

जंबाळ—पु १ चिखल; राड; रेंदा. २ पाण्यांत वाढणारें एक झाड; (लॅटिन) व्हॅलिस नेरिया. 'तों तो फुगे कुगेहद्वारीं मूत्रें-हि जैंवि जंबाळ।'–मोकर्ण २८.१९. [सं. जंबाल]

जंबीर—पुन १ लिंबू. २ लिंबाची एक जात. [सं.] जंबीराम्ल–न लिंबापासून निघणारें अम्ल. (इं.) सायट्रिक ॲसिड.

जंबु–बू—स्त्री. जांभूळ (झाड आणि फळ). [सं.] ०द्वीप–न. १ हिंदुस्थान. २ काश्मीराजवळील जम्मु संस्थान. [सं.]

जंबु(बू)क—पु कोल्हा. [सं.]

जबु(बू)न—वि. १ वाईट; घाण; खराब. 'जबुन हें कर्नाटकचें जळ।'–ऐपो ७४. २ दरिद्री; गरीब; म्याड. 'वऱ्हाडचे महाल जबून म्हणतात.'–रा १.११७. [अर. जुबून=म्याडपणा; फा. झबून्]

जंबुरक, जंबूर, जंबुरा—पु. उंटावरील एक लहान तोफ. 'सुत्रनाळी जंबुरे उंटावर रोंखुन।'–ऐपो १०९. [फा. झंबूरक्, झंबूरा]

जंबुर्दी—वि. पाचेसारखा हिरवा रंग असलेलें (हिरव्या सकलादीविषयीं उपयोग). [फा. झुमुर्रुद=पाच]

जंबू—पु. गुजराथेंतील एक ब्राह्मण जात व तींतील व्यक्ति. यांची वस्ती वऱ्हाडांतहि आहे. खिस्ती ब्राह्मण हे नगरकडे आढळतात.

जबेतराश–स—वि. हजरजबाबी; उत्तर देण्यास तत्पर; बोलण्यांत हुषार. [फा. जबान् = जीभ + तराश = कापणारा] ०तराशी–स्त्री. हजरजबाबीपणा. ०फरास–वि. वक्तृत्व करणारा. [फा जबान्+फराघ]

जंबेरी—स्त्री. कागदी लिंबाची गोड जात; जंबीर पहा.

जंबोरा—पु मोठा अंबर; खिळे उपटण्याचा चिमटा.

जब्बर–दस्त—जबरदस्त पहा.

जंभ—पु दंभ; ढोंग; गर्व; अहंकार. [सं. दंभ]

जंभोरा—वि (ना.) अतिशय आंबट (दहीं वगैरे). [सं. जंबीर]

जम—पु व्यवस्था; मेळ; जोड; जमाव; मिलाफ; बनाव; जुळवाजुळव; संबद्धता (वाद्य, पदार्थ, नानाप्रकारचे स्वभाव इ० चो). मिलाफ, जुळणी; एकी (बोलणें, भाषण, हिशोब यांत). (क्रि० पडणें; बसणें). [अर. जम्‌अ=जमणें; सं. यम्] ०खट्टा–पु. (व.) जमाव; गर्दी; अड्डा. 'जमखट्टाच जमला आहे तुमच्या घरीं.' जमचें–अक्रि. (गो.) जमणें. ०जमा–स्त्री. (गायन) दोन स्वरां-पासून तीन किंवा चार स्वरांपावेतों एकत्रपणा करून वेगवेगळे प्रकार करून दाखविण्याची क्रिया. –कला (बडोदें) १३४. ०जूट–पु. जंगजोड पहा. [जमणें+जुटणें] ०वाजमव–स्त्री. निरनिराळ्या ठिकाणाहून एकत्र करणें. ०विणें–सक्रि. १ एकत्र करणें; गोळा

करणें २ गोठविणें; थिजविणें; दाट करणें (द्रवपदार्थ). ३ पट विणें, मिलाफ घालणें; जमणें पहा.

**जमई**—स्त्री. एक शस्त्र; जमदाड पहा. 'हत्यार जमई जमदाड माड्ड घेऊन हातीं।' -ऐपो १०९.

**जमखाण-न, जमखाना**—पु सुत्रासन, जाजम मोठी सत रंजी 'दिवाशा जमखान टाकिलें।' -ऐपो १५. [फा. जम्खानाह्]

**जमणें**—अक्रि. १ एकत्र येणें; एकवटणें. २ घट्ट होणें; गोठणें; थिजणें इ० ३ दृढ आणि बळकट होणें (शरीर) 'या औषधांनीं शरीर जमेल.' ४ सांचणें; चांगला होणें; फळास येणें (भाजीपाला; उद्योग) ५ भरभराटीला येणें (उद्योग, प्रयत्न, काम). 'संसार जमत नाहीं.' ६ मिलाफ होणें; सांगड असणें; मेळ बसणें; जुळणें; पटणें; एकमत होणें (नानाप्रकारचे स्वभाव, घटकावयव); जम पहा. एकत्र होणें. मिश्रित होणें 'हे परसूमध्यें जमून गेले.' ७ मधुर होणें; मंजूळ होणें: कानास गोड लागणें (गाणें). 'उघड्या जागेमध्यें गाणें चांगलें जमत नाहीं.' ८ भरभराटीस येणें; श्रीमंत होणें [हिं. जमना; सं. यम्-यमन. तुल० अर. जम्अ-जम्म=गर्दी, दाटी]

**जमदग्नि**—पु. १ एक ऋषि. २ (ल.) शीघ्रकोपी माणूस.

**जमदड-दाड-दाडा-दाढा**—स्त्रीपु लांब पल्ल्याची तलवार. 'जमदाड माड्ड घेऊन हातीं।' -ऐपो १०९. -वि. लठ्ठ; धटिंगण; अगडबंब. [सं. यमदंड-दंष्ट्रा]

**जमन, जमनबिलावर**—यमन, यमनविलावर पहा.

**जमनीव**—स्त्री वधुवरांतील अंतःपट, पडदा. [सं. जवनिका]

**जमनीस**—पु. १ एक वसूली अधिकारी. २ फरासखान्यावरील एक अधिकारी [फा जमनवीस्]

**जमयेत**—स्त्री. मंडळी; जमात पहा.

**जमरूद**—पु १ पेरूचें झाड आणि फळ. २ पाच (जवाहीर). 'जमरूद पाचेचा जोड एक.' -रा ७, -खलप १.२१. [फा. झुमुर्रुद्=पाच]

**जमा**—स्त्री. १ आय; जमाव; संग्रह; नफा; उत्पन्न (जमीन, दुसऱ्याकडून रोख अगर अन्य रूपानें आलेली रक्कम, गांवें यांचें); प्राप्ति; मिळकत. २ (ल.) गणना; अंतर्भाव. 'आमची थोरांतहि जमा नाहीं आणि पोरांतहि नाहीं.' ३ येकूण रक्कम; बेरीज. [अर. जम्अ्; सं. यम्] -वि. एके ठिकाणीं जमविलेलें; गोळा केलेलें. (वाप्र.) **०करणें-धरणें**—१ जमाखर्चाच्या वहींत रक्कम जमेच्या बाजूला लिहिणें. २ गोळा करणें; एकत्र जमविणें. 'उच्छिष्ट फळें जमा करी।' -देवदास; संतमालिका ६७. **जमेंत न खर्चांत**—मुळींच महत्त्वाचें नसणें. सामाशब्द- **०कामिल-कमाल**—पु. पुरापुरा, कायमचा, शेवटचा सारा. **०कदीम**—पु. जुन्याकाळापासून चालत आलेला सारा. **०करन**—सक्रि. (ग्रा.) जमविणें. **०तकसीम**—निरनिराळ्या प्रांतांच्या साऱ्याच्या कराची जमेची बेरीज. -भाग्र वर्ष ७. अंक १-४. **०पंचोत्र**—न. बाहेरून येणाऱ्या मालावरील जकात. **०बंदी**—स्त्री. १ शेतसारा; दरवर्षी द्यावयाचा आकार; जमीनीची पहाणी करून ठरविलेला आकार. २ नियमित जमा व वसूल; सामान्य कर ३ शेतसाऱ्याचा जमाखर्च. [फा. जम्अ+बंदी] **०बंदी जमा**—स्त्री. जमीन मोजणीच्या वेळेस अधिकाऱ्यानें ठरवलेली जमाबंदी किंवा वसूल. याच्या उलट तालेबंदी जमा. **०वसूल**-पु. सरकारचावडी वसूलाची रक्कम (सरकारी). [अर.] **०वसूलबाकी**—स्त्री. जमेचा वसूल, कर आणि राहिलेली बाकी.

**जमाखर्च**—पु. १ आय-व्यय. २ हिशोब; व्यक्ति किंवा संस्था यांनीं चालविलेल्या उद्योगधंद्यांसंबंधीं होणाऱ्या देवघेवीची व्यवस्थित रीतीनें ठेवलेली नोंद. [अर. जम्अ+खर्च] (वाप्र.) **जमाखर्च बरोबर असणें**—नफातोटा बरोबर असणें; शिल्लक बाकी पूज्य. **०खर्च नसणें**—महत्त्वाचें नसणें. **०खर्चीं उगवि (घ)णें**—१ जमाखर्चांत दाखल करणें, मांडणें. २ कोणत्याहि कामाला, नोकरीला योग्य करणें. म्ह० १ जमाखर्चीं न पडे ताळा पंतीं कागद केला काळा. २ आजा मेला नातू झाला जमाखर्च बरोबर. सामाशब्द- **०खर्ची**—वि. १ हिशोबासंबंधीं. २ शिल्लक कमीजास्त न होतां, देणें घेणें चढतें किंवा कमी होतें ती. ३ जमाखर्च लिहिण्यांत हुशार.

**जमाजम**—स्त्री. १ एकत्र जमणें; गोळा होणें. २ पुष्कळ लोकांचा जमाव. (क्रि० जमणें).

**जमात**—स्त्री. १ जमाव. 'पाहुनी गोधनाची जमात।' -नव १३.५९. २ सभा; मंडळी; थवा; सैन्याची तुकडी; एकत्र जमलेली मंडळी; पंचायत. म्ह० जमात ती करामत. (समासांत.) पायदळ जमात=पायदळाची तुकडी; स्वारजमात=घोडदळाची तुकडी. [अर जमाअत] सामाशब्द- **०खाना, जमायतखाना**-पु. मशीदीचे तिन्ही बाजूस जमातीस बसण्यासाठीं बांधलेला दुमजली अगर तिमजली सोपा -ऐस्फुले २.३४. **०त(ती)दार-जमादार**-पु सैन्याच्या टोळीचा नायक; जमादार. [फा. जमाअत-दार] **०त(तीं)दारी-जमाद्दारी**—स्त्री. जमादाराचा हुद्दा आणि पदवी. [फा] **जमाती**—वि. सैन्याविषयीं. जसें-जमाती-खर्च-दरमाहा-मोहजबा-शिल्लक-हिशेब.

**जमादार**—पु १ जमातदार पहा. २ कंपनीच्या सैन्यांतील एक अधिकारी ३ (हिर, हरकारा, शिपाई यांच्या) टोळीचा मुख्य.

**जमादारी**—स्त्री. जमादाराचें काम आणि हुद्दा.

**जमादिलाखर**—पु. मुसलमानी वर्षाचा सहावा महिना. [अर. जुमादीयुल आखिर्]

**जमादिला(लो)वल**—पु. मुसलमानी वर्षातील पांचवा महिना. [अर. जुमादीयुल अव्वल]

**जमादिसानी**—पु. जमादिलाखर पहा. [अर. जुमादिस्सानी]

**जमान**—पु. जबाबदार; हमीदार; जामीन; प्रतिभू. 'ऐसा तह करून जमान घेऊन,' –रा १५.२४. [अर. झमान्] ०**कतबा**–पु. जामीनपत्र; हमीपत्र; मुचलका. **जमानत–नात**–स्त्री. जामिनकी; जबाबदारी. (क्रि० घेणें). ०**दार**–पु. हमीदार; जामीन. [अर झमान्दार्]

**जमाना**—पु. १ हंगाम; ऋतु. २ काल; वेळ; युग. 'आजी जमाना एक प्रकारचा आला आहे' –ख ११.१८३. [अर झमाना] (वाप्र.) **उलटा जमाना आहे**–विपरीत काल आहे. 'उलटा जमाना आलारे।' –अफला ६६.

**जमावंदी**—स्त्री. सैन्याची भरती; सैन्याची टोळी; समुदाय 'अशी जमावंदी करून।' –ऐपो १०७. जमा पहा.

**जमालगोटा**—पु. (व.) जयपाळचें बीं. यानें शौचास साफ होतें.

**जमाव**—पु १ जमात पहा. २ अनेक वस्तूंचा संग्रह. ३ फौज. ४ जमाव या शब्दाचा जम या शब्दाचे जे निरनिराळे अर्थ आहेत त्याप्रमाणेंहि उपयोग करतात. [अर. जमूअ] (वाप्र.) ०**पडणें**–कायम करून घेणें (धंदा, हुद्दा); दृढ–स्थिर–भरभराटीचा–चांगला होणें (धंदा, व्यापार). –**वानसीं**–क्रिवि. जमाव, गट करून टोळीनें (केलेली चोरी); मंडळीनिशीं–नें (केलेलें कृत्य)

**जमावर्दी**—स्त्री. पराक्रम; बहादुरी.

**जमाविणें**—स्त्री. एकत्र जमणें; गोळा करणें.

**जमिदार–री**—जमादार–दारी पहा.

**जमिनीलोक**—पुअ़ी. इनामदारवर्ग.

**जमियत**—स्त्री. मंडळी; सैन्य. जमात पहा.

**जमी**—स्त्री. जमीन. ०**दार**–न. जमीनीचा मालक. ०**दोज़**–पु. १ भुईकोट. 'जमीदोज़ किले इंग्रजाचे लढाईत परिच्छिन्न रहावयाचे नाहीत.' –रा ७.६१. २ जमीनीशीं खिळलेला; जमीनदोस्त.

**जमीन**—स्त्री. १ भूमी; धरणी; भुई; नद्या, समुद्र आणि वातावरण यांखेरीजची जागा. २ पृथ्वीचा पृष्ठभाग; अंतर; जागा. 'येथून दहा कोस जमीन चाललें म्हणजे समुद्र लागेल.' ३ शेत; लागवडीची जागा. 'राजापूर प्रांतीं सगळा कातळ आहे. जमीन थोडी.' ४ गच्ची; मजल्यावरची भुई अथवा पेंडाची तयार केलेली भुई. ५ वस्त्राच्या बाजूच्या कांठांमधील आंतील अंग; तवा. ६ चित्राची पार्श्वभूमि. ७ (ल.) मूळ आधार. भुई पहा. जमिनीचे प्रकार:– पड जमीन=नापीक जमीन. वहित जमीन=लागवडीची जमीन. तणेली जमीन=गवत माजलेली जमीन. करल–चोपण–खलगट जमीन=कांहीं खोलीवर चुनखडीसारखा टणक थर असलेली; हींतून पाणी लवकर झिरपत नाहीं. आगरी जमीन=समुद्र किनारीं, नदीच्या किंवा खाडीच्या काठीं असणारी रेताड जमीन. हींत रेतीपेक्षां मातीचा अंश अधिक असल्यामुळें नारळीच्या बागा करतात. कागदाळी=गोवा, कारवार कडील सुपारी, वेलदोडे यांच्या लागवडीची जमीन; मध्यम काळी=देशावरील जमीन. हींत २ ते ४ फूट माती असून खालीं मुरूम असतो. भारी काळी जमीन=मोठ्या नद्यांच्या खोऱ्यांतील पंधरा–वीस फूट खोल काळी माती असलेली जमीन; कूर्यांट जमीन=(कों.) डोंगराच्या उतारावर ठिकठिकाणीं बांध घालून केलेली भात जमीन. केवटा जमीन=मळईच्या वरची काळी अथवा तांबूस जमीन. खाजण–खारी जमीन=खाडी अडवून केलेली; हीस गझणी, कलट्टर, सापळ, माटी इ० नावें आहेत. पुळणवट=(कों.) वाळूची किंवा रेताड जमीन; हींत नारळाची लागवड होते. हीस रेवे, रेवट, शीठा इ० नावें आहेत. बांधणरब्बी=(कों.) ओढ्यानाल्यांच्या काठीं बांध घालून केलेली जमीन. वावल, खरी=(कों.) डोंगराच्या माथ्यावरील कातळांत भोंवतालची माती येऊन झालेली. मळखंडी=ह्या जमीनी गाळानें तयार झालेल्या असतात. त्यांचीं खाचरें बनवीत नाहींत. त्या देशांतील जिराईत जमिनीसारख्या मोकळ्या ठेवितात. अशा जमिनीवर ठाणें, कुलाबा जिल्ह्यांत पावसाळी गवत होतें. या प्रकारच्या जमीनींत मानवट म्हणून एक भेद आहे. घाटावरील करल जमीन व कोंकणांतील मानवट जमीन यांत बरेंच साम्य आहे. मळई=नदीकांठची, गाळानें सांचलेली. वायंगण=(राजा.) पावसाळी भात काढल्यावर रब्बीच्या वेळीं डोंगरांतील पाटाच्या पाण्यावर भाताचें दुसरें पीक काढितां येणारी. वरकस=डोंगराच्या उतारावरील जमीन. हिचें भरोड असें दुसरें नांव आहे. हिचे प्रकार दोन:– डोंगरी व माळ पहिलीची मशागत हातांनीं खणून करतात. जंगली भागांत हिच्यांत कुमरा–डाहळी या पद्धतीनें नाचणी, वरी, सावा, खुरासणी तीळ इ० पिकें काढितात. दुसरींत बैलाची नांगरट करितां येते. शेळ जमीन=डोंगराच्या खोलगट भागांत असणारी व सतत पाण्याचा झिरपा असणारी. मळी जमीन=दरीच्या पायथ्याशीं असणारी जमीन. हीस वैलू, गादळ अशीं दुसरीं नांवें आहेत. पाणथळ जमीन=स्वाभाविक खोलगटपणामुळें पावसाळ्यांत पाणी सांचणारी जमीन. हीस कारूगद्दे असें दुसरें नांव आहे. मक्कीजमीन=डोंगराच्या उतरणीवर एकाखालीं एक बांध घालून केलेली जमीन. हीस मॉलॉय, आढी, मॉरोड अशी दुसरीं नावें आहेत. [फा. झमीन्; झेन्द, झेम] (वाप्र.) ०**अस्मान एक होणें**–१ सपाटून पाऊस पडणें; धुरळा, धुकें यांनीं दिशा धुंद होणें. २ (ल) अतिशय गर्विष्ठ होणें. ०**अस्मानाचें अंतर**–फार मोठें अंतर, तफावत. ०**उकरणें**–आंगठ्यानी भुई उकरणें (संकटग्रस्त, भीतिग्रस्त होऊन घोडा टापेनें जमीन उकरतो तसें). ०**ओढणें**–जमीन लागवडीस आणणें. ०**धरणें**–१ आजारीपणामुळें अंथरुणाला खिळणें. २ रागाला वश होणें. ०**माडी ठेवणें**–बागाईत पिकाकरितां जमीन रिकामी ठेवून बाकीच्यांत एकच पीक काढणें.

०वाफेला येणें—पेरण्याच्या हंगामाला येणें. ०सोडणें—१ जमिनींतून वर येणें, दिसणें (पीक). २ (ल.) दुखणें, दारिद्र्य इ० तून वर येणें, उठणें. **जमीनीवर पाय नसणें**—चपळ घोडा, जलद पळणारा, गडबडया माणूस यांसंबंधीं योजितात. **—स पाठ (अंग) लागणें—वर पडणें**—दुखण्यानें किंवा अतिशय दारिद्र्यानें पीडणें. **—स पाय लागणें**—रोगमुक्त होणें. **—स मिळणें**—सर्वस्वी नाश होणें (अक्षरशः आणि ल). **म्ह०** जमीन बादशहाची लेक मायबापाची. सामाशब्द—**०उत्पन्न**—न १ जमीनीचें उत्पन्न. २ सारा किंवा वसूल. **०जुमला**—पु खेडेगांवांतील सगळी जमीन, घर, दार, वतन वाडी, कुरणें यांस व्यापक अर्थानें म्हणतात. [फा. झमीन्+अर. जुम्ला=सर्व] **०झाडा**—पु जमीनी, गांव, खेडें, यांची एक विस्तृत याद, यादी. **०दार**—पु वंशपरंपरेचे सरकारी वतनदार, कामदार; जसें—देशमुख—देशपांडया, (कोठेंकोठें) पाटील, कुलकर्णी. **जमीनदार, जमीदार**—पु. १ (व.) इंग्रजीपूर्वीच्या राज्यांतील सनदी सरंजामी माणसें. २ स्वतःसाठीं मेहनताना म्हणून कांहीं टक्के (शेंकडा दहा टक्के) वसूल कापून घेऊन बाकीचा वसूल उगवून सरकारांत पाठविणारा; वतनदार. [फा. झमीदार, झमीनूदार] **०दार व कुळें**—पुनभव. शेतीच्या उपयोगाच्या बऱ्याच जमिनी स्वतःच्या मालकीच्या असलेला सधन मनुष्य, त्या जमिनीचे वेगवेगळे गट करून ते जमिनीची लागवड करणाऱ्या गरीब लोकांस ठराविक मुदतीपुरते देतो व त्यापासून जमिनीच्या भाड्याबद्दल कर (खंड) घेतो, अशा व्यवहारांत जमिनीचे मालकास जमीनदार व जमीन करणाऱ्यास कुळ अशी संज्ञा आहे. **जमीनदारी**—स्त्री. १ जमीनदाराचा हक्क, हुद्दा, धंदा; जमीनखंड इ० २ (ल.) लुच्चेगिरी; छक्केपंजे. **०दारी मत**—न. (ल.) लबाडीचें, खोटें मत. [फा.] **०दारी जमा**—स्त्री. जमीनदाराकडून येणारा सरकारसारा, वसूल. **०दोस्त**—वि. १ (कुस्ती) जमीनीला खिळविलेला; लोळविलेला. २ सर्वस्वीं नाश झालेला; फना झालेला. **०धारा**—स्त्री. जमीनीचा कर; सारा. **०नीस—नवीस**—पु. १ शेत, जमीन, पिकें इत्यादींची पहाणी करून सारा ठरविणारा अधिकारी. २ (क.) दप्तरदार. [फा. जमीन+नवीस] **०बाब**—स्त्री सारा; कर. **०महसूल**—पु. जमीनबाब: जमीनीपासून कराच्या रूपानें होणारें सरकारी उत्पन्न. **०मोजणी**—स्त्री. जमीनीचें क्षेत्र मोजून जमाबंदी करणें. **०शिरस्ता**—पु. जमिनीची पहाणी करून प्रत लावून ठरविलेला सरकारसारा. **०सांड**—क्रिवि. (राजा.) जमिनीपासून निराळें (उचललेलें ओझें).

**जमीये, जमे**—वि. सर्व; एकंदर. 'जमीये दोस्तांस मुबारक लाये.'—पया ४८२. [फा. जमीइ—जम्इ]

**जमीव**—वि. १ जमविलेलें; एकत्र केलेलें. २ गोठलेलें; थिजलेलें. जमणें पहा. ३ वस्तु घेऊन तयार केलेलें (पत्ते, चिखलाची भिंत).

**जमेत, जमेदार, जमेदारी, जमेयत, जम्यात**—जमात—दार—दारी पहा. 'ते व आपली जमेत चालून पुढें आले.'—मराचियोधा ३२.

**जमांचें**—सक्रि. (गो.) जमविणें; एकत्र करणें.

**जम्मत**—स्त्री. (लहान मुलांच्या भाषेंत) गम्मत.

**जम्मन**—वि. (व.) मला मोठा; जंगी. 'जम्मन सर्प निघाला.'

**जय**—पु. १ यश; सिद्धि: विजय; फत्ते; जयोत्सव. २ देवाला नमन करतांना त्याच्या नांवाच्या पूर्वीं लावितात. ३ अर्जुन ४ भारत; कुरुपांडवकथा. 'तैसाचि लोमहर्षणनंदन उग्रश्रवाहि जयवक्ता।'—मोआदि १.६. [सं.] (वाप्र.) **०करणें**—जिंकणें; यशस्वी होणें. **जयास जाणें**—भरभराटीस येणें (यत्न, उपाय, आयुष्य). सामाशब्द— **०गोपाळ**—पु. गुजराथी लोकांतील नमस्काराचा पर्याय शब्द. **०घंटा**—स्त्री. जय झाल्यावर वाजविण्याची घंटा. **०घोष**—पु. चांगली गोष्ट किंवा जय झाला असतां तो सर्वांस कळावा म्हणून वाद्य वगैरेचा केलेला हर्षध्वनि. **०जय, जयजयकार**—पु. १ स्तुतिकीर्तन; जयघोष. —अव. लाड करणें; थोपटणें; कुरवाळणें. —उद्गा. भले शाबास! भले पट्टे! इ. उद्गार. जयगीत; जयाचें गाणें. 'जय जय स्वसंवेद्या।'—ज्ञा १.१. **०जया**—उद्गा. जयनाद. **०जयवंती**—स्त्री. (राग) गायनशास्त्रांतील एक राग. ह्या रागांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद, तीव्र निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण—संपूर्ण. वादी ऋषभ. संवादी पंचम. गानसमय रात्रीच्या दुसऱ्या प्रहराचा शेवट. आरोहांत तीव्र गांधार व तीव्र निषाद व अवरोहांत कोमल गांधार, कोमल-निषाद घेतात. **०ढाक**—पु. जय झाला असतां वाजवावयाचा नगारा; ढोलें. **०तिस्म**—वि. भरभराटलेलें (राज्य). **०तीर**—पु (कु.) दसऱ्याची वेंगुर्ल्यांकडील जत्रा. [सं. जैत्र] **०दुंदुभि**—पु. जय झाला असतां वाजविलेल्या नगाऱ्याचा आवाज व तो नगारा. **०ध्वनि**—पु. १ जयघोष. २ (ल.) कोणताहि मंगलसूचक शब्द. **०पताका**—स्त्री. जयाचें निशाण. **०पत्र**—न. ज्याचा पराभव झाला त्यानें लिहून दिलेलें जयाचें पत्र; लेखी कबुली, कागद (कुस्ती, पंडितांतील वाद, फिर्यादअर्याद यांतील). **०प्रतिष्ठा**—स्त्री. जयामुळें मिळालेला मान, वैभव. **०प्रतिष्ठित**—वि. जयानें प्रसिद्ध झालेला; जेता म्हणून नांव मिळविलेला. **०प्रस्थान**—न. लढाईवर जाणें; स्वारी: कूच; मोहीम (मोठ्या प्रौढीनें). **०फळ**—न. १ (काव्य) जय. २ (कुकीनें) जायफळ. **०मंगळ**—वि. घाऱ्या डोळ्याचा (घोडा.) डोकें, कपाळ, मान, छाती, ओंठ, वेंबी या प्रत्येकावर एकएक केंसाचा भोंवरा आणि पोटावर दोन व कुशीवर (पुठ्यावर) एकएक भोंवरा असलेला (घोडा). हें याचें शुभलक्षण होय. —अश्वप १.९२. **०वाद्य**—न. जय झाला

टाकून केलेला कड्याच्या आकाराचा वाटोळा पदार्थ. –गृशि १.४१३. जिलेबी असेंहि जुनें रूप आहे. [ हिं. जलेबी, जिलेबी ]

**जिलीद, जिल्द्‌न**—न. बांधीव पुस्तक; लेखबंध. –राव्य ८.११०. [ फा. ]

**जिलीब, जिलब**—स्त्री. १ समुदाय; लवाजमा; परिवार; इतमाम. २ स्वारी; मिरवणूक (राजा किंवा देव यांची, यांत कोतवाली घोडे, ईटवाले, बोथाटीवाले, बंदुकवाले, भालाईत, सांगवाले, आणि बाणाईत असे सहा प्रकारचे लोक असतात, शिवाय कोतवाली घोडेहि असतात). 'श्रीमंताची भेट घेतली जिलीब चाले मोहरें।' –ऐपो २८६. [ फा. जिल्व्, जिल्वी ] ०दार–पु. जिलीबमधील माणूस; नोकर; हुजऱ्या. ०हुद्दे–पुअव. वरील ईट इ० सहा प्रकारचीं शस्त्रें धारण करणारे हुद्देदार. **जिलबीस**–क्रिवि. स्वारींत पुढें. **जिलबीचा घोडा**–पु. कोतवाली घोडा.

**जिलेटीन**—न. एक पदार्थ; हें प्राण्यांचें मांस, अस्थी, कातडीं, खूर व शिंगें इत्यादिकांपासून तयार करितात. याचा सरसा–सारखा उपयोग करितात.

**जिलोह**—पु. १ लवाजमा. 'त्यास छत्राची व जिलोहाची तयारी जलदीनें करून पाठवावी.' –दिमरा २.१५०. २ थाट; समारंभ. [ फा. जिल्वा=भपका ] **जिलोहानें**–क्रिवि. थाटानें. ०खाना, **जिलौखाना–जलोह खाना**–पु. दरबारचें दालन; सभास्थळ. 'नवाबांनीं हवेलीचे जलोहखान्यापुढें एक तोफ ठेवली.' –रा ५. १२०. [ फा. जिल्वूखाना=देवडी, दिवाणखान्याशेजारची खोली ]

**जिल्हइ, जिल्ह, जिल्हे**—स्त्री. १ चकाकी; उजळा; तेजगी. २ पदार्थ गुळगुळीत करण्याची, चकचकीत करण्याची क्रिया; पॉलिश. ३ तेज. 'देवब्राह्मणाची मर्यादा नवाबबहादूर फार करितात म्हणोनच दिवसेदिवस दौलतीस जिल्हे व रौनक आहे.' –रा १९.५३. [ अर. जिला ] ०गर–गार–पु. उजळा देणारा. ०दार–वि. चकाकीत; चकचकीत 'जिल्हइदार अपकरे वाटते आज चरकी घरिले.' –प्रला १.१९. **जिलेवंत**–वि. शोभिवंत; चकचकीत. 'तकराव जिलेवंत नाचती समांगना आनंदांत।' –प्रला ४१.

**जिल्हा**—पु. १ देशविभाग; परगणा; प्रांत. (सामा.) भाग. देश पहा.' २ इलाख्याचा एक भाग; यांत तालुके पाडलेले असतात व यावर कलेक्टर अधिकारी असतो. ३ कागदाच्या बंदाचा अर्धा भाग (त्याला पाडलेल्या चार घड्यांपैकीं दोन घड्यांची जागा). ४ मिश्र राग. [ अर. झिला ] **जिल्हेस**–बंदाच्या अर्ध्या भागांत (कौल, करार) लिहिण्याची तऱ्हा. लिहून देणाराच्या सह्या उजव्या बाजूच्या जिल्ह्यांत आणि साक्षीदाराच्या सह्या डाव्या बाजूच्या जिल्ह्यांत असतात. **जिल्हेबीत–बीतरेघ**–नस्त्री. बंदाच्या चार रकान्यांपैकीं दोन रकान्यामधून काढलेली रेघ. ०दार–पु. जिल्ह्यावरचा अधिकारी; सुभेदार पहा. मराठी राज्यांत पेटा–तालुक्यावरच्या अधिकाऱ्यालाहि हा हुद्दा असे. २ (तुर्कीनें) जेलर; तुरुंगाचा अधिकारी. [ फा. ] ०मॅजिस्ट्रेट–पु. (इं.) डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट; जिल्ह्याच्या कलेक्टरला १ ला वर्ग मॅजिस्ट्रेटचा अधिकार असतो म्हणून त्यालाच जिल्हा मॅजिस्ट्रेट म्हणतात.

**जिल्हें**—न. (कों.) मासे धरण्याचें लहान जाळें.

**जिल्हेज**—पु. मुसलमानी (अरबी) वर्षातील बारावा महिना. [ अर. झील्‌हिज्जा ]

**जिवट, जिवस**—वि. १ रगदार; पाणीदार; जोरदार; दमदार; काटक (मनुष्य, जनावर). २ योग्य; लायक; समर्थ; ऐपत, मालमत्ता वगैरे असणारा. ३ बळकट; दृढ; कणखर. 'असा पुरुष नित ती एक मोगिल जिवट असेल रंडी।' –प्रला १८८. ४ नफ्याचा; फायदेशीर; उत्पन्नाचा (धंदा, उद्योग). [ सं. जीव+ट प्रत्यय ]

**जिवडा**—पु. १ (सामा.) क्षुद्र जीव; जंतु. २ सरपटणारा प्राणी; उरोगामी (साप, किडा इ०). ३ प्रियपुत्रादिकांस लडिवाळपणाचें नांव (कलिजा, हिरा याप्रमाणें). [ सं. जीव+डा=अल्पार्थी प्रत्यय ]

**जिवणी**—स्त्री. जेवणी; तोंड; दोन ओठांमधील तोंड उघडण्याकरितां असलेली चीर, फट. 'त्या मुलाचे ओठ लाल असून जिवणी लहानसर होती.' –कोरकि ४२९. [ सं. जीवन ]

**जिवणें**—अक्रि. जगणें; जिवंत असणें. [ सं. जीवन ]

**जिवत, जिवंत–कळा–कोळसा**—जीवंतमध्यें पहा.

**जिवती**—स्त्री. मूल जन्मल्यानंतर सहावीच्या दिवशीं पुजावयाची एक देवता; सटवी. 'रक्षी गुरुसेवा हे सच्छिष्यशिशूसि गाळवा जिवती।' –मोउद्योग ८.८८. २ तिची एक लहान प्रतिमा करून मुलाच्या गळ्यांत बांधितात ती.' ३ श्रावणमहिन्यांत मुलास दीर्घायुष्य मिळावें म्हणून माता दर शुक्रवारीं पूजन करतात ती देवता [ सं. जीवंतिका ]

**जिवती**—स्त्री. (व.) आषाढ वद्य अमावास्या. [ सं. दीपवती ? ]

**जिवनळ**—पु. (गो.) देवनळ; एकप्रकारचें गवत; बोरू.

**जिवलग**—वि. जिव्हाळ्याचा; आवडता; प्रिय; जिवास आधारभूत (पति, मित्र, पुत्र, ईश्वर इ०). जीवलग पहा. 'देवाच्या सख्यत्वासाठीं। पडाव्या जिवलगांसी तुटी।' –दा ४.८.८.

**जिवविणें**—उक्रि. जिवंत करणें; जगविणें. 'अन्न जिववी परिमित आहारीं। अधिक झालिया तेंचि मारी।' –मुआदि २०.८५. [ जीवणें प्रयोजक ]

**जिवसा**—वि. जिवलग पहा. [ सं. जीवसदृश ] म्ह० १ तांदूळ जिवसे पाहुणा जिवसा. १ पाहुणा जिवसा आणि तांदूळ जिवसे कसें साधेल.

**जिवा**—पु. (राजा.) जिता पहा. [ जीव ]

**जिवा**—पु. (नाविक) दोरीचे दोन पेड वळून झाल्या-नंतर त्यांत मिसळावयाचा तिसरा पेड; पिढाच्या दोन पाखरा ज्या जोडसुंभाच्या दोरीनें जोडलेल्या असतात ती गोट. [ जीव ]

**जिवाच्या**—हा शब्द व याचे समास जीव मध्यें पहा.

**जिवाजीपंत**—पु. ( विनोदानें ) जीव; प्राण; याच्या उलट मनाजीपंत ( मन ). 'मनाजीपंत निवून जातो जिवाजीपंतास जाव देणें पडतें.'

**जिवाणूं-णें**—न. ( को. ) ( सामा. ) सर्पाच्या जातीचा प्राणी; क्षुद्र जीव; जंतु; किरड. [ जीव ]

**जिवाद**—स्त्री. ( कु. ) बोरपड. जवादें.

**जिवानकल्ल**—पु. जीवखडा; अश्मा. –वदलापूर ७०. [ जीव+का. कल्लु=दगड ]

**जिवारा**—वि. किडयानें खाल्लेला (पदार्थ). –मुंग्या १९२.

**जिवाळा**—पु. जिव्हाळा पहा. ( कु. ) १ देह. २ जिवंत-पणा. –वि. सजीव. 'लवणाची मासोळी। जरी होय जिवाळी।' –अमृ ७.३६. [ जीव ]

**जिवाळें**—न. (महानु.) लहान कमळ.' चौकावरि जिवाळीं। नवरत्नाचीं।' –ऋ ७४.

**जिव्हा**—स्त्री. १ जीभ; रसनेंद्रिय. 'जगामध्यें जगमित्र। जिव्हेपाशीं आहे सूत्र।' –दा १९.२.१९. २ (ल.) अग्नीची ज्वाळा. ३ जिभेच्या आकाराची वस्तु. [सं. जिह्वा] (वाप्र.) **०खाणें**—रागानें, त्वेषानें जीभ चावणें. **०याकडी पडणें**—१ गैरसावध-पणानें बोलणें. २ अर्धांगवायूनें जीभ लटकी पडणें. **०विटाळणें**—१ जिव्हेचें रसज्ञान नष्ट करणें. २ शिव्या वगैरे देऊन जीभ घाट-विणें; जिभेनें पाप करणें. ३ नालायक, वाईट मनुष्याची एखा-द्याला शिफारस करणें, मध्यस्थी करणें. **०हातीं धरणें**—१ फार शिवीगाळ करणें. २ अतिशय वरळणें. ३ अधाशीपणानें खाणें. **जिव्हेला आडवेढा असणें**—बोलण्याची मनाई, आडकाठी असणें; बोलण्याला आडपडदा असणें; इतर वाक्प्रचारासाठीं जीभ पहा. सामाशब्द— **जिव्हाग्र**—न. १ जिव्हेचा शेंडा, टोंक. २ ( चुकीनें ) जिव्हार. 'ती काठी त्याचे जिव्हाग्रीं ( मर्मस्थानीं ) पडली. [सं.] **जिव्हाग्रीं असणें**—उपस्थित असणें; तोंडपाठ असणें. 'जें तो पढला आहे तें त्याचे जिव्हाग्रीं आहे.' **जिव्हा-छेद**—पु. जीभ कापणें. ( खरेपणा सिद्ध करण्यासाठीं योजितात ). **०दंश**—पु. ( जिभेला झोंबणारें, चटका बसणारें ) तोंडीलावणें. 'आणि राखेहूनि कोरडे। आंत बाहेरी येके पाडें। तो जिव्हादंशु आवडे। बहुतया।' –ज्ञा १७. १४४. [सं.] **०दोष**—पु. १ भाषणांतील दोष. २ जिभेंतील दोष; अडखळणें. **०मूलीय**—वि. क, ख वर्णापूर्वीचा विसर्गोच्चार. याची अर्धविसर्गपूर्वक ककार अशी व्याख्या केली आहे. उदा० अन्तःकरण; दुःख इ०. **०रूढ**—वि. वाटेल तेव्हां पाठ म्हणून दाखवितां येणारा; जिव्हाग्रीं अस-णारा; सदां सिद्ध; अगदीं तयार. **०रोग**—पु. १ जिभेवरील सूज, फोड. २ (सामा.) जिभेला झालेला रोग. **०स्तंभवात**—पु. जिभेचा अवष्टंभ; जीभ लुली पडणें. **जिव्हेचा जड**—वि. १ स्पष्ट, पूर्ण शब्दोच्चार करावयास असमर्थ; बोलण्यांत खोड असणारा. २ अबोल्या; फार बोलावयास नको असा.

**जि(जिं)व्हार-री**—नस्त्री. १ ( काव्य. ) हृदय; आत्मा; चेतनास्थान; काळीज; अंतःकरण. 'भेदिलें आमुचें जिव्हार।' –रास ३.८५. २ (ल.) प्राणाप्रमाणें चैतन्योत्पादक गोष्ट, तत्त्व; मर्म; सत्त्व. जीवनकळा. 'जिव्हार मोडलें वैराग्याचें।' –भाए ८४. 'जो वेद-शास्त्राचें जिव्हार।' ३ जीव. 'शस्त्रांगीं जिव्हारें। आरोपुनी।' –ज्ञा १.२२०. ४ जीवाची गुप्त गोष्ट, रहस्य; काळीज; मर्म. 'वेद जया-लागीं झकविले। लक्ष्मीयेही राहपिलें। जिव्हार जें।' –ज्ञा ११.११८. ५ जिव्हाळा. 'ना तरी सकल धर्मांचें माहेर। सज्जनांचें जिव्हार।' –ज्ञा १.११. जिव्हाळी पहा. **जिव्हारीं**—क्रिवि. १ नाजुक मार्गीं; मर्मीं; काळजाच्या भागीं; अंतःकरणांत ( जखम इ० ) 'नरपति रमणी ते खोंचलीसे जिव्हारीं।' –सारुह ३.५७. [जीव]

**जिव्हाळ**—स्त्री. जिव्हाळी पहा.

**जिव्हाळा**—पु. १ उगम; उत्पत्ति; मूळ; झरा. 'या विहि-रीचा जिव्हाळा लहान आहे यामुळें पाणी थोडें.' २ आत्मा; सार; मर्म; मुख्य तत्त्व. 'नेणती मुक्तीचा जिव्हाळा।' –एरुस्व ७.४३. 'जाणें भक्तीचा जिव्हाळा। तोचि दैवाचा पुतळा।' –तुगा, कीर्तन १.१२.३ पोहोंच; आवांका; धारणाशक्ति. 'मुलाचा जिव्हाळा पाहून अभ्यास सांगा.' ४ कळवळा; काळजी; उत्कंठा; जीव लागणें; मन जडणें. 'दुखणेकऱ्याच्या शुश्रूषेस जिव्हाळ्याचा माणूस असावा' ५ (वीणा, इतर तंतुवाद्यें) घोडी आणि तारा जेथें एकत्र होतात त्या बिंदूवर जो कापूस लावतात तो; झारा. ६ मर्मस्थल; वर्म. ७ जीवित; प्राण; चैतन्याचें उगमस्थान; आधार. 'नामरूपा तूंचि जिव्हाळा।' –एरुस्व १६.९२. 'विश्वाचा जिव्हाळा, व्यवहा-राचा जिव्हाळा.' ८ लाभ. 'तेतुला जिव्हाळा। मानावा हा।' –ज्ञा १३.१०८९. ९ माया; ममता. [सं. जीव+आलय] **जिव्हाळी**—स्त्री. १ एखादी मर्माची जागा; नाजुक, वर्माचा भाग (नखाच्या, शिंगाच्या खालचा किंवा कानाच्या मागचा); सचेतन मांसाचा भाग; मर्मस्थान ( क्रि० लावणें; लागणें ). २ विण्याचा झारा. जिव्हाळा अर्थ ५ पहा. [जीव+आलय] **जिव्हाळी-जिव्हाळीला लावणें-लागणें**—मर्मभेद होणें; ( अक्षरशः व ल० ) जिवाला लागून राहणें. **जिव्हाळ्याचा**—वि. अत्यंत मैत्रीचा; जिवलग; मायेचा; काळजीचा; कळकळीचा. 'तो गाजुदीखान याच्या जिव्हाळ्याचा होता.' –भाव ३०. 'माझ्या जिव्हाळ्याचा एथें कोणी नाहीं म्हणून तूं मला मारतोस.'

**जिव्हाळी**—स्त्री. १ शिंग ( वाजविण्याचें ), पिपाणी, पोंगें, अलगूज इत्यादींतून सूर निघण्यासाठीं त्यांच्या तोंडातून बसविलेला

अर्धवर्तुळ किंवा चपटा तुकडा. २ यंत्रांतील पडदा; (इं.) व्हाल्व. [जिव्हा]

जिष्णु—पु. १ विष्णु. २ अर्जुन. —वि. १ सदोदित विजयी; जयशाली. २ (समासांत) जिंकणारा. [सं. जि=जिंकणें]

जिसाळी—स्त्री. (शेतकी) एक औत. —शे ७.१७.

जि.जुस्त—वि. (गो.) बरोबर. [इं. जस्ट; फ्रें. पो. जुस्त]

जिहाद्—न. धर्मयुद्ध. —सन १८५७.७१. [अर. जिहद]

जिह्मदृष्टि—स्त्री. (नृत्य) कोणाला न कळेल अशी तिरकस दृष्टि करून पाहणें; पापण्या मिटवून आकुंचित करणें. हा अभिनय असूया; आळस, जाड्य, हे भाव दर्शित करण्याकरितां केला जातो. [सं.]

जिह्वा—स्त्री. जिव्हा पहा.

जिज्ञासा—स्त्री. ज्ञानाची इच्छा; कुतूहल; शोधक बुद्धि. [सं.]

जिज्ञासु—वि. १ ज्ञानाची इच्छा असणारा; शोधक; चौकस. २ अभ्यासी; विद्याव्यासंगी. [सं. ज्ञा—जिज्ञासा]

जी—सना. जो याचें स्त्रीलिंगी एक वचनी रूप.

जी—१ नांवाच्या पुढें आदरार्थी, बहुमानार्थी लावावयाचा प्रत्यय. जसें—गणपतरावजी; हनुमानजी; रामचंद्रजी; साहेबजी; २ हुकूम करतांना विशेष परिचयदर्शक असा योजावयाचा प्रत्यय. 'अरे खंडजी' ३ प्रश्नार्थक संबोधन (यांत उत्तर गृहीतत्व असतें). 'तिळ स्वधिशुश्रुवचनें अदयता शिवे काय जी!' —केका १०६. ४ महाराज, सरकार, स्वामी याप्रमाणें विनयार्थी संबोधन. 'ॐ नमो जी! आद्या।' —ज्ञा १.१.५ मान्यता, होकार दर्शविण्यासाठीं हो! आज्ञा! या अर्थाचा सेवकानें योजावयाचा शब्द. 'अरे हें काम करशील? जी महाराज.' ६ व्यक्तीच्या विशेषनामास लावयाचा सन्मानार्थी प्रत्यय. उदा० अपाजी, रघुजी, संभाजी इ०; ब्राह्मणांत पंत किंवा वडिलाचें नांव जोडावयापूर्वी योजितात. जसें—कृष्णाजीपंत, बाळाजी विश्वनाथ. [सं. जयिन्; प्रा. जइ] जीजी करणें, जी म्हणणें—हांजीहांजी करणें; खुषमस्करी करणें.

जी—उद्गा. पोवाडा, लावणी यांच्या कडव्यांच्या शेवटीं साथ करतांना उच्चारावयाचा शब्द. [ध्व]

जीऊ—पु जीव. 'त्रिविध तापानें तापलें मी बहू। जाइना कां जीऊ प्राण माझा।' —ब २५ [जीव]

जीक—वि. श्रमित; त्रस्त; जिक पहा.

जीख—स्त्री (गो.) जय. 'आजच्या खेळांत तुला वरीच जीख झाली.' [जिंकणें, जीक]

जीण—न (गो.) जिणें पहा.

जीणणें—अक्रि. जिंकणें; जिणणें पहा. 'एल्ही मधुकरांचां सांठीं। केवि जीणवे।' —शिशु २६६.

जींणें—न. १ जन्म; जगणें. जिणें पहा. 'काय जीणें मारिलें दुष्ट भाजे।' —चिंतामणि, ध्रुवाख्यान. १४ (नवनीत पृ. ४१२). [सं. जीव्]

जीत—वि. जिवंत; जिता पहा. 'जरी आत्म्याचें सार्थक न कीजे। जीत मेल्या सारिखें।' —मुआदि ३८.८०. ०ना मेला—वि. जीवंत अथवा मेलेला. म्ह० जीत ना मेली हरळीची मुळी= एखादा धंदा, व्यापार भरभराटीस असो किंवा मंद असो नेहमीं थोडा तरी फायदाची होतोच. हरळीची मुळी पहा. २ जिता कीं मेला; जितामध्यें पहा. जीत हाडांला खिळणें—सर्व जन्मभर एखाद्याला चिकटून राहणें. जीतणें—अक्रि. जगणें; जीवंत राहणें. 'जीताति हे सकल जीवहि चापपाणी।' —मुद्गलाचार्य आर्यांचें भाषांतर १. जीतवण—न. दृष्ट काढण्याची क्रिया. 'कुंती जीतवन करून। सूर्पणें टाकी ओवाळून।' —पांप्र ८.१५९. ०सती—स्त्री. (नवऱ्याच्या जिवंतपणीं आपणाला जाळून घेण्याप्रमाणें सतीत्वानें वागणारी) मोठी पतिव्रता स्त्री. ०हत्या(ते)र—न. जें नेहमीं हातांशीं असतें व ज्याचा उपयोग तावडतोब करतां येतो असें (तरवार, भाला, कट्यार यांसारखें) हत्यार. याच्या उलट बंदूक, तोफ.

जीत—स्त्री. (क.) जय; सरशी (खेळ; पण; होड यांमधील). 'प्रसंग आला असतां युद्ध करावें, हार—जीत ईश्वराधीन.' [सं. जि—जित]

जीत—स्त्री. १ आग्रह; जीद पहा. 'हर्देम खावंदासी जीत करावी.' —पेद ६.७९. २ (व.) पैज; होड; ईर. 'तिनें तापून धरला पती। दोघीजणी पडल्या जीती।' —पला ७७. 'यमा आज आलाच पाहिजे, नाहींतर तुझीमाझी जीत.' [अर. जिद्द]

जीतांजें—न (कुलाबा) एक प्रकारचा मासा

जीद—स्त्री. निकड; हट्ट. जिद्द पहा. 'राजे व व्यंकटराव मिळून करंडे याजकरवीं जीद धरविली.' —पेद २०.१०८. [अर. जिद्द]

जीन—न. कापडाची एक जात. —मुंव्या १२३.

जीन—पु. भूत. जिंद, जिन पहा. 'दिलीरखानाच्या अंगांत कोणी जीन शिरून बोलत आहे.' —सूर्यग्र ९०. [इं.]

जीन—वि. म्हातारा; वृद्ध; जीर्ण. 'कैसा जिंकावा हो करुनि बळें आहवा युवा जीनें।' —मोभीष्म ४.९. [सं. जीर्ण+प्रा. जिण्ण]

जीन—न्पु. खोगिराचा एक प्रकार. विशेषतः विलायती चामड्याचें खोगीर; पलाण. 'जडीत जीन तया पृष्ठीं।' —मुसभा १४.७८. [फा. झीन] ०खोगु—न. खोगिरावर बसणाऱ्याच्या सुरक्षिततेसाठीं केलेला टेका, आधार. ०गर—पु. चामड्याचें काम करणारी एक जात व तींतील व्यक्ति. हे लोक. खोगीर, लगाम, कातडी पट्टे, तोफ—बंदुकीचें कातडीसामान, वाहुल्या, खेळणीं

वगैरे करतात. [फा. झीनगर; तुल० सं. अजिनकार] ०गरी–वि १ जीनगरासंबंधी. २ जिनगरानें केलेलें (सामान). –स्त्री. जिनगराचा धंदा, कसब. ०तुकडा–पु. न्हाव्याच्या धोकटींतील वस्तरे ठेवण्याचा बुरणुसाचा तुकडा. ०पाठक–वि. सर्व रंग एक सारखा व फक्त पाठ पांढरी असणारा (घोडा–हा अशुभ असतात). –अश्वप १.१०१. [जीन+फटक] ०बंद–पु. जीन आवळण्याची दोरी; पट्टा. –वि. खोगीर वगैरेकसून तयार. ०बंदी–स्त्री. १ कूच करण्याची तयारी; सुस्तेदी. 'शिद्याच्या लष्करांत आवई पडली त्याजवरून तेथें दोन प्रहरांत जीनबंदी जाहली.' –ख ७.३४९८. स्वारी (मोहिमेंतील) 'पंचगंगेच्या पाण्यावर जीनबंदीनिशी राहिली.' –ख ९.४६७०. [फा.] ०बाजी–जीनबंदी पहा. 'शनवारांतून झुकत चालली केली हावद्यावर जीनबाजी।' –पला ४.१३.

जीना—पु. (महानु) जिंकलेली वस्तु; दान. 'कवणातें मागावा जीना।' –भाए १३१. [सं. जि–जिन]

जीभ—स्त्री. तोंडांतील एक अवयव; रसनेंद्रिय. २ (ल.) नंदीबैलाच्या पाठीवर जिभेच्या आकारानें चिकटविलेलें कातडें वाढतें तें. ३ जिभेच्या आकाराची वस्तु, भाग. नखाची–डोळ्याची –सापाची जीभ पहा. ४ फोगी; एक प्रकारचें झीड. ५ (व.) रणगाडा किंवा पाळणा याची खालची बाजू. ६ (नाशिक) जिभेसारखा लांबट पसरलेला फाटा. 'नदीची जीभ लांबवर पसरली आहे.' [सं. जिह्वा; प्रा. जिब्भा के; जि. जीव, जीवा] (वाप्र.) ०काढणें–पदार्थ खाण्यासाठीं आधाळसूतपणा करणें. ०चावणें–चावलीशी करून बोलणें–मिळून, संकोच धरून, दबत दबत बोलणें. ०चुरचुर बोलणें–अयोग्य, अप्रासंगिक, वेडेवाकडें बोलणें. ०जड असणें–लवकर पाठ करावयाला असमर्थ असणें. जीभ जड होणें पहा. ०जड होणें–१ (अस्पष्टोच्चारानें) बोलतां न येणें. चांगलें शुद्ध बोलतां न येणें. 'लहान मुलांनीं सुपारी खाल्यानें जीभ जड होते.' २ मंदबुद्धि होणें. ०झडणें–(खोटें वगैरे बोलण्यानें) जीभ कुजून पडणें; वाचा नाहींशी होणें. ०नरकांत घालणें–पोकळ वचनांनीं, रिकाम्या बढाईनीं वगैरे जीभ बाटविणें; खोटें बोलणें. ०बाहेर काढणें–गुप्त वार्ता फोडणें; न बोलण्याची गोष्ट, गुप्त गोष्ट बोलणें. ०बधिर होणें–जीभ जड होणें. ०मोकळी सोडणें–हवें तसें बोलणें, खाणें; बंधन, नियम न पाळणें. ०मांडणें–योवडी वळणें; मुकें बनणें; शब्द न फुटणें. ०लघलघ करणें–चुरचुर चालणें; बोलणें. ०लांब करून बोलणें–वरिष्ठांशीं अवळपवळ बोलणें; उर्मटपणानें बोलणें. ०लाळ घोटणें–खाण्याला उत्सुक असणें; पाणी सुटणें. ०वळवणें–(लहान मुलानें) बोलण्याचा प्रयत्न करणें; बोलावयास लागणें. २ शिव्या देणें; अद्वातद्वा बोलणें. ०विटाळणें–जीभ नरकांत घालणें पहा. ०शिंदळ–शिनरडी–स्त्री. वाह्यात, विन ताब्यांतील जीभ. –वि. फटकळ; शिवीगाळ करणारी. ०सोकणें–१ चटक लागणें. २ चव येणें (अन्नाची–सरावानें). ०सोकावणें–तोंड चटावणें. जीभ सोकणें पहा. ०हातीं धरणें–मन मानेल तसें बोलणें, खाणें. –भेचा पट्टा–अद्वातद्वा बोलणें, वाचाळता. –भेचा पालट–खाण्यांत बदल; रोजचा खाण्याचा पदार्थ न खातां दुसरा खाणें. –भेचा लोळ–टा–अतिशय कडत पदार्थ खाल्यानें जीभ भाजून जाणें. जिभेचे फुटाणे फुटणें–फाडफाड बोलणें. (एकाच) जिभेनें साखर किंवा गू खाणें–एकाच वेळीं संमति आणि असम्मति देणें, बरेवाईट म्हणणें; दोन्ही प्रकारें बोलणें. –भेला काटा लावणें–एखादी गोष्ट गुप्त ठेवणें. –भेला चिमटा घेणें–बोलणें किंवा खाणें यापासून तोंड आवरणें. –भेला डाग देणें–जीभ ताब्यांत ठेवणें; जीभेला नियंत्रण घालणें. जीभेवर असणें–१ तोंडपाठ असणें. २ अगदीं ताज्या आठवणींत असणें. ३ बोलून टाकण्याच्या तयारींत असणें. –भेस–ला–आडवा–वेढा नसणें–वाह्यात बडबड करणें; निरर्थक प्रलाप काढणें. –भेस–ला आवरून धरणें–निर्बंध घालणें; जीभ आटोक्यांत ठेवणें. –भेस–ला–टाचा देऊन(कांहींएक)ठेवणें–आपण न खातां दुसऱ्यासाठीं गोड पदार्थ राखून ठेवणें. –भेस हाड नसणें–जीभ ताब्यांत नसणें (खोटें बोलणें, शिवीगाळ करणें यांत); खोटें, अपशब्द बोलण्याचें भय नसणें. म्ह० उचलली जीभ आणि लाविली टाळ्याला=विचार न करतां बोलणें.

जीमूत—पु. मेघ; ढग. 'जीमूत प्रेरिले सत्वरा।'–मुआदि ४९. ९८. [सं.] ०वर्ण–वि. मेघवर्ण; निळा. 'नीळ जीमूतवर्ण रघुवीर।'

जीय—पु. जीव पहा. जीयावें–जगावें. 'या वरी आतां जीयावें या परीस हे पण वरें,' –गीतांचंद्रिका १.४६.

जीर—पु. (को.) कोवळें केळें.

जीर—स्त्री. लहान सांखळी. [फा. झिराह]

जीर्ण—पु. जीर्णज्वर पहा. –वि. १ जुनें; फाटकें तुटकें; कमकुवत; अशक्त; नासलेलें; वापरलेलें (वस्त्र, वस्तु, प्राणी). २ पचलेलें; जिरलेलें (अन्न). [सं. जॄ=वृद्ध होणें]. ०ज्वर–पु. पुष्कळ दिवसांचा बारीक ताप; हाडींताप. जीर्णोद्धार–पु. १ जुनी मूर्ति किंवा देऊळ यांची डागडुजी किंवा नवीन बांधणी; जुन्याचें नवें करणें. २ (ल.) जुनी वस्तु काढून नवी घेणें; बदल करणें; जुन्या बदलीं नवें घेणें.

जील—पुस्त्री. १ झीळ; संबळ वाद्यापैकीं लहान टिमकी; टिमकी. २ (व.) बैलाच्या गळ्यांतील घुंगरें. [फा. झील; तुल० सं. झिल्ली=एक वाद्य] ०देणें–(व.) उठावणी देणें; उत्तेजन देणें. 'जील देणारा कोणी सांपडलाच पाहिजे.'

जील—पु. (व.) काटेरी झुडपांची दाट जाळी.

जीलसुभानी—स्त्री. पादशहाची एक पदवी. 'हजरत जील-सुभानी यांणीं आज्ञा केली जे.' —रा ६.६२७. [फा. झिल्लि-सुब्हानी=ईश्वराची छाया]

जीव—पु १ प्राण; जीवित. २ प्राण असणारा जिवंत प्राणी. 'सर्व जीवांस ईश्वर पोसतो.' ३ लहान कीटक, प्राणी (चिलट, घुंगरडें, पिसूं, किडा इ०). 'या शेणांत जीव झाले आहेत.' ४ तेज; वीर्य; जोम; धमक; पाणी; शक्ति; धैर्य; कार्यक्षमता; सत्त्व; सार (माणूस, घोडा, बैल इ०चें). ५ यश; नफा; राम; अर्थ (कार्य, काम, उद्योग यांत). 'या व्यवहारामध्यें जीव नाहीं, केला न केलेला सारखा.' ६ बळकटी; स्थैर्य; मजबुती; टिकाऊ-पणा; मजबूतपणा (पदार्थ, वस्त्र यांचा). 'छत्रीचा जीव हलका म्हणून वाऱ्यानें फाटली.' ७ खरेपणा; सत्यता; विश्वसनीयता; मिलाफ; मेळ (बातमी वगैरेचा). 'या बातमीमध्यें, त्या ग्रंथांत जीव नाहीं.' ८ सौंदर्य; जोर (लिहिण्याचा). ९ मन; प्रवृत्ति; कल. 'एक जीव म्हणतो जावें एक म्हणतो न जावें.' १० अंत-रात्मा; सचेतन आत्मा; जीवात्मा; पहा. 'त्याच्यासाठीं माझा जीव भारी तडफडतो.' ११ देवगुरु बृहस्पति. 'त्याच्या आला परिखुनि यश निववायासि मन धरा जीव।' [सं. जीव; प्रा. जीवो; सिं. जीउ; हिं. जी] (वाप्र.) ०अधांत्रीं उडणें—संकटांत पडणें; भांबावून जाणें; घाबरून जाणें. ०अर्धा करणें—मनुष्याला अतिशय त्रास देणें. सर्व शक्ति खर्च करणें (श्रम, व्यर्थ शिकवण इ०). ०अर्धा होणें—भिणें; त्रासलें जाणें; गर्भगळित होणें; श्रमणें; दमणें; अर्धमेलें होणें. ०आटणें—१ मरेमरे तों काम करणें. २ अतिशय थकून जाणें (मेहनत, काळजी इ० नीं) ०आडकणें-टांगणें-टांगला असणें—आवडत्या वस्तूच्या प्राप्तीसाठीं घाबरें होणें, काळजी लागणें. ०आंबणें—(क.) त्रासून; जाणें कंटाळणें. 'त्याची उस्तवारी टेवतां टेवतां माझा जीव आंबून गेला.' ०उडणें—१ प्रेम नाहींसें होणें; विटणें. २ भीति-ग्रस्त होणें. ०कयंगटीस येणें—(क.) १ मेटाकुटीस येणें. २ मुरगळून पडणें. ०कालविणें—गलबलणें; अतिशय क्षोभ होणें; घाबरणें; गडबडणें. ०की प्राण करणें—अतिशय प्रेम करणें. ०कोंडाळणें—(ना.) गुदमरणें. ०कोरडा होणें-पडणें—घसा वाळणें; थकणें; अतिशय दमणें; (आजार, श्रम, भूक यांनीं). ०खाउन बोलणें-सुकणें-रडणें—आकांत करणें; आक्रोश-वोक्शी रडणें. ०खाणें-घेणें, जिवास खाणें—एखाद्याच्या जिवास त्रास देणें; झुरविणें. ०खावून काम करणें—मनापासून काम करणें. ०खालीं पडणें—उत्कट इच्छा पूर्ण होणें; साध्य गांठणें; मनाजोगें होणें. ०गोळा होणें—मरणोन्मुख होणें. अति-शय घाबरणें. 'जों जों देखे देव कांक्षेत योधा। तों तों त्याचा होतसे जीव गोळा।' —आसु २६. ०घेऊन पळणें—जीव वांच-विण्यासाठीं पळून जाणें. 'पळती जीव घेवूनिया।' ०जाळणें-मारणें—निग्रह करणें; दमन करणें (कामेच्छा, पाप वासना; मनोविकार यांचें). ०टाकणें—१ प्राण सोडणें. २ निराश होणें; चित्त स्वस्थ नसणें. ३ फार उत्कंठा लागणें; अतिशय हट्ट, छंद घेणें. ४ (पूर्वकालवाचक धातुसाधित याच्या पाठीमागें असेल तर. जसें—रडून-हुंगुन-खगुन-जीव टाकणें) =रडणें; हांसणें; खाणें (अतिशय जोरानें व प्रयत्नानें). ०टाकून पळणें—अतिशय त्वरेनें, घाईनें, एकदम पळणें; भिऊन पोबारा करणें. ०टांग-णीस लागणें—१ एखाद्या वस्तूवर प्रीति बसणें. २ चिंताग्रस्त होणें. ०ठिकाणीं नसणें—अस्वस्थ असणें; चैन न पडणें. ०डहुळणें-मळमळणें—(ना.) मळमळणें. ०तुटणें—१ अतिशय थकणें. २ तळमळ लागणें. एखाद्याचा ध्यास लागणें; एखाद्याबद्दल अतिशय काळजी वाटणें. ०तोडणें—दुःखानें सचिंत होणें. ०तोडून करणें—अतिशय मेहनतीनें करणें. (काम, धंदा) ०थारीं असणें—स्वस्थपणा असणें. ०थारीं नसणें—अस्वस्थ असणें; चैन न पडणें. ०थोडा थोडा होणें—(ग्लानि, देणें इत्यादि कारणानीं) अतिशय चिंताग्रस्त होणें; काळजी लागणें; भीति वाटणें; फार दुःख होणें; धैर्य खचणें. ०देणें—१ आत्म-हत्या करणें. २ सगळें लक्ष घालणें; लक्ष देऊन करणें; पुष्कळ प्रयत्न करणें. ०धडधड करणें—काळजी, भीति वाटणें. ०धरणें—नवीन शक्ति मिळविणें; रंगारूपास येणें; वरें व्हावयास लागणें. जगणें, वाढीस लागणें, (झाड वगैरे) ०धरून—१ धैर्य धरून; उत्सुकतेनें; उत्साहानें (कृत्य करणें). २ जिवंत राहून; अस्तित्व ठेवून (कसा तरी याला जोडून योजना). ०धुकुडपुकुड करणें—(ना.) घाबरणें. ०पछाडणें—मोठ्या कळकळीनें, लाचारीनें नम्र होणें. ०पडणें—एखाद्या गोष्टींत मनापासून शिरणें; गोडी लागणें; तत्पर होणें. ०पाखडणें—१ अतिशय मेहनत करणें; प्रयत्न करणें. २ जळफळणें; तडफडणें. ०पोळणें—१ दुःख होणें. २ चट्टा बसणें; धडा मिळणें. ०प्यारा असणें—जीवाविषयीं अतिप्रीति दाखविणें. म्ह० ज्याच्या त्याला जीव प्यारा. ०फुटणें—अतिशय उत्सुक होणें. 'तुझे भेटीसाठीं निशिदिवस माझा जिव फुटे।' —सारुह ६.१५८. ०बसणें—(एखाद्यावर) मन बसणें; प्रेम करणें; शोक असणें. ०भांड्यांत पडणें—जीव स्वस्थ होणें. ०मट्टयास येणें—दमणें; अगदीं थकून जाणें. ०मुठींत धरणें—१ काळजी-पूर्वक स्वतःचें संरक्षण करणें (धोक्यामुळें). २ स्वतःवर दाब ठेवणें; आत्मसंयमन करणें. ०मोठा, मोठा जीव करणें—१ जोराचा प्रयत्न करणें; धैर्य धरणें. २ उदार होणें (खर्च कर-ण्यांत) मन मोठें करणें. ०रखमेल येणें—(कु.) कंटाळा येणें; त्रासणें. ०राखणें—जीवाचें रक्षण करणें; आळसानें काम करणें. ०लावणें—प्रेम करणें; माया लावणें. ०वर-वरता

धरणें–अतिशय उत्सुक होणें; उत्कंठा लागणें. ०वारा पिणें–उदास भासणें; भयाण वाटणें. ०मुकणें–अशक्त, व्याकूळ होणें. ०सुचित नसणें–काळजींत असणें. ०सोडणें–१ मरणें. २ जीव धोक्यांत घालणें; स्वतःच्या जीवाची आहुति देणें. ३ अतिशय इच्छा दर्शविणें. ४ आजारी माणसावरून कोंबडें ओवाळून टाकणें (यानें आजाऱ्याचा रोग कोंबड्यावर जाऊन तें मरतें अशी समजूत). जिया आगळा–वि. एखाद्याच्या काम करण्याच्या शक्तीच्या बाहेर. जिवाचा कांलिजा–वि. प्राणापेक्षांहि प्रिय. जिवा(विं)ची गोष्ट–अन्तःकरणांतील गोष्ट. 'थेरू सांगे जीविंची गोष्टी। त्यांची आवडी लागली पोटीं।' –भारावल २.१७. जिवाची ग्वाही–पाखी देणें–खात्रीपूर्वक सांगणें. जिवाचा घान करणें–१ आटोकाट प्रयत्न करणें; जिवापाड मेहनत करणें. २ अतिशय छळणें; गांजणें (जीव जाईपर्यंत). जिवाचा घोंट घेणें–जीवाचा घात करणें; मरेपर्यंत छळणें. जिवाचा घडा करणें–साहसाचा प्रयत्न करण्यास तयार होणें. जिवाचा लोळ करणें–१ जीव वेदम करणें; जिवाला त्रास देणें. २ (ल.) फार मेहनत घेणें. जिवाची कांयकाय करणें–(कुत्र्यासारिखे मुकावयास लावणें म्हणजे) अतिशय छळणें. जिवाचा सोबती–वि. आयुष्याचा सोबती (नवराबायको, रोग). जिवाची राळवण करणें–अतिशय काम करणें (राळ्याच्या काडीसारखें होणें); त्रास घेणें. जिवाची हुल्लड करणें–मोठा नेटाचा प्रयत्न करणें. जी(जि)वा अगोचर–वि. शक्तीच्या बाहेर. जिवाचे चारधार करणें–थेर करणें; नाचणें; चैन, विलास करणें. जिवाचें रान करणें–अतिशय कष्ट सोसणें. जिवाच्या गांठीं बांधणें–मनांत नीट ठसवून किंवा बिंबवून घेणें. 'तरी हा अर्थु जिवाचिया गांठी। कां न बांधावा।' जिवांत जीव आहे तोंपर्यंत–मरण येईपर्यंत; जन्मभर; सदासर्वदा. 'माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत मी तुला सोडून चार दिवस देखील रहाणार नाहीं.' जिवांत-जीव घालणें–१ उत्तेजन देणें; सांत्वन करणें; धैर्य देणें. २ आपलें व दुसऱ्याचें मन एक करणें; आपले विचार दुसऱ्यास नीट समजावणें. जिवांत जीव येणें–गेलेली शक्ति, धैर्य पुन्हां येणें; धीर येणें. जिवानिशीं–जिवासकट. जिवानिशीं जाणें–मरणें (जुलमानें, अकालीं). म्ह० शेळी जाते जिवानिशीं आणि खाणार म्हणतो वातड. जिवापरता–१ सहन करण्याच्या बाहेर (श्रम, आजार). 'याला जिवापरतें दुखणें आलें आहे निभावेल तेव्हां खरा.' २ प्राणापेक्षां प्रिय. जिवापलीकडे–जिवापेक्षां प्रिय. जिवापाड–डें–क्रिवि. जिवाचें मोल देऊन, शक्तीबाहेर. जिवाभावाचा–पु. (सोबती, चाकर, पदार्थ, गोष्ट, काम) आपल्या स्वतःच्या संबंधीं, लाडका, आवडता, मूल्यवान वगैरे. जीवाभावाला–स–क्रिवि. स्वतःसाठीं; स्वतःला; विशेष जरूरीकरितां. 'हे पांचशें रुपये जीवाभावास ठेविले.' जिवाभावानें, जीवेंभावें–क्रिवि. अन्तःकरणापासून; प्रीतीनें; मनापासून; उत्साहानें; नेटानें. जिवाभ्यास–भ्यासानें–क्रिवि. आपलेपणाच्या भावानें; अगदीं मनापासून. 'जिवाभ्यासानें जेव्हां श्रम करावा तेव्हांच फलप्राप्ति.' जिवाला खाणें–तडफडणें; झुरणें; मनाला लागणें. जिवाला करवत लागणें–अतिशय दिता लागणें. जिवाला कांहीं–तरी करून घेणें–आत्महत्या करणें; जीव देणें. –ला खाणें–मनाला लागून राहणें; झुरणें; झिजणें. जिवावर–स्वतःच्या शक्तीवर, श्रमावर, बुद्धीवर (जगणें, काम करणें). जिवावर उठणें–दुसऱ्याच्या जिवाची काळजी न करणें; त्याचा जीव घ्यावयाला तयार होणें. (दुसऱ्याच्या) जिवावर (आपलें) पोट भरणें–दुसऱ्यावर अवलंबून आपला उदरनिर्वाह चालविणें. जिवावर उड्या मारणें–दुसऱ्याच्या पैशावर, मदतीवर चैन बढाई मारणें. जिवावर उदार–जिवाची पर्वा न करणारा. म्ह० जिवावर उदार तो लाखांचीं झुंजार. जिवावरचा–जीव धोक्यांत घालणारा; जीवघेणा. जिवावरचा–लाग–पाळी–गोष्ट–प्रसंग–खेळ–काम–लागलीच, तात्काल येणारा धोका, संकट इ०; जीव जाण्याचें भय असणारी गोष्ट. जिवावरचा ताप–ज्वर–रोग–दुखणें–प्राणघातक ताप, आजार इ०. जिवावरचें आघण उतरणें–कठिण प्रसंगांतून बचावणें, निभावणें. जिवावर द्वारका करणें–एखाद्याच्या आधारावर आश्रयावर चैन करणें; महत्कृत्य करणें; मोठा उपकार करणें. 'तुमच्या जिवावर एवढी द्वारका केलें घरदार दोमजली।' –पला ८५. जिवावर येणें–वि(बे)तणें, जिवाशीं गांठ पडणें–१ जीव धोक्यांत पडणें; मोठें संकट ओढवणें. २ दुष्कर वाटणें. ३ दिडणें. जिवावर लाल–वि. दुसऱ्याच्या मदतीवर चैन करणारा. जिवाविशेष–क्रिवि. स्वतःच्या शक्तीच्या पलीकडे. जिवासांड–वि. जीवाला धोका येण्याइतका (आजार, त्रास). जिवाशीं–जिवीं धरणें–बांधणें–अतिशय प्रीति करणें; बहुमोल वाटणें. 'काय इणें न धरावें अधनत्वें नृप-जन-वरा जीवीं।' –मोवन १३.१८. जिवास अहानगिरी करणें–डोणें–जीवावर मोठें संकट येणें, आणणें; संकटाचा प्रसंग ओढवणें. जिवास जीव देणें–प्रिय माणसासाठीं आपला जीव देणें. जिवास मुकणें–मरणें; मृत्यु पावणें. जिवींचा–प्राणप्रिय; जिवलग. जिवीं लागणें–१ आवडीचा असणें; प्रिय वाटणें. २ मर्मभेद होणें; जिवाला लागणें. जिवें धुस जाणें–धस्स होणें; जीवांत धडकी भरणें. 'तुमते एतां देखिलें। तैंची माझां जीवें धुस गेलें।' –शिशु १२५. जिवें वाचणें–एखादें संकट टळून जिवंत राहणें; जीव जाण्याचा प्रसंग असतां जीव न जातां बचावणें. 'आजी आम्हां येथें राखियलें देवें। नाहीं तरी जिवें न वांचतों।' म्ह० १ ज्याच्या

त्याला जीव प्यारा. २ जीवो जीवस्य जीवनम्. सामाशब्द— ०कण—पु. अल्प जीवदशा; जीवांश. 'जीवकणु जयाचा उपमर्दे।' —ज्ञा १८.१२७२. ०कळा—स्त्री जीवंत माणसाच्या तोंडावरचें तेज. याच्या उलट प्रेतकळा. ०कोश—पु. (काव्य.) प्राणाचें, आत्म्याचें आवरण; शरीर. 'ऐसें हिरण्यगर्भाचें अंश। प्रसिद्ध जीवकोश।' ०खडा—पु. (कुण. आगरी) अश्मा. —वदलापूर ४१. ०घात—न. जीविताचा नाश; वध. ०घातक—की—वि. १ प्राणाचा नाश करणारा. २ छळ करणारा, त्रासदायक. ०घेऊ—घेणा—घेण्या—वि. १ जीव जाईपर्यंत त्रास देणारा; लोचट (भिकारी). २ भारी कठिण (काम). ०जंतु—पु. १ लहान किडा, प्राणी; किडामुंगी इ० २ —अव. सर्व प्राणिमात्र. ०डा—पु. क्षुद्र जीवजंतु; जिवडा पहा. 'नाहीं भात वडा तया दहिंवडा कैंचा ग तो जीवडा।' —आसु ५. —पु. क्षुद्रजीव, प्राणी (साप, किडा-मुंगी इ०). ०डवाळ—स्त्री. जीवाची उपाधि. 'हें अज्ञानकृत जीवडवाळ।' —रंयोवा ८.१४३. ०त्व—न. चैतन्य; जीवदशा. 'जीवत्वदुर्गी आडिला।' —ज्ञा १७.२. ०दयासंघ—पु. प्राणिमात्रावर दया दाखविणारी, प्राणिमात्राचा जीव वांचविण्याचा प्रयत्न करणारी मंडळी; गोरक्षण वगैरे करणारी समिति. ०दशा—स्त्री. १ आयुष्य; अस्तित्व; सचेतन स्थिति. 'जीवदशा तोंपर्यंत संसार.' २ आत्मज्ञानावांचून जन्ममरणाच्या फेऱ्यांत असावें अशी अवस्था. ०दान—न. १ जीविताचें देणें, देणगी; प्राण न घेणें. २ दुसऱ्याच्या प्राणांचें संरक्षण. (क्रि० करणें; देणें). 'या रोगास कांहीं औषध देऊन तुम्ही मला जीवदान घाल तर पहा.' एखाद्या संकटांतून वांचविणें. ०दार—वि. १ सचेतन; जिवंत. २ (ल.) धैर्यवान; पाणीदार; जोरदार; शक्तिवान. ३ रसयुक्त; रसाळ. ४ (ल.) फायदेशीर (धंदा, उद्योग). ०धन—न. गुरेंढोरें, जंगम मालमिळकत. ०धर्म—पु. अविद्या कामकर्मादिक. ०धोंडा—पु. (कों.) अश्मा जीवखडा. ०पापी—(पापी आत्मा, बिघडलेला आत्मा) स्वतःमध्यें किंवा दुसऱ्यांत दुष्ट विचार आढळल्यानंतरचा दुःखाचा उद्गार. ०प्राण—पु. १ जीव आणि आत्मा; प्राण (जोर देण्यासाठीं वापरतात). 'मी तुजसाठीं जीवप्राण देतों.' २ आवडता माणूस; लाडका; जीव कीं प्राण असा माणूस, मित्र. ०भय—न. जीव जाण्याचें भय. ०भाव—पु. १ जिवाचा भाव; इच्छा; मनीषा. 'मागणें तें तुज मागों। जीवभाव तुज सांगों।' —तुगा १५७८. २ आत्मा; स्वतः (जोरदार अर्थी). ३ जीवदशा. 'हरिला कंसाचा जीवभाव देवें।' ०योनि—स्त्री. १ सरपटणारे प्राणी; क्षुद्र कीटक इ०चा वर्ग. २ जरायुज प्राणिवर्ग, योनि पहा. ०रखी—स्त्री. (कों.) देवाचा नक्षीदार देव्हारा. ०रस—पु. जीवन देणारा रस; (इं.) प्रोटोप्लॅझम्. ०लग—वि. १ (जीवास आश्रयभूत, आधारभूत) आवडता; प्राणप्रिय (पति; ईश्वर). 'माझिया जिवलगाविण। न करी मी मंगळ ध्यान।' २ आप्त; मित्र. 'जीवलग जीव घेती।' —दावि पृ.६७८. ०शक्ति—स्त्री. प्राणशक्ति; (इं.) व्हायटलफोर्स. ०शास्त्र—न. लहान जीवासंबंधीं शास्त्र; (इं.) बायॉलॉजी. जीवस—वि. जीवट. जीवसृष्टि—स्त्री. सचेतन सृष्टि. ०स्वर—पु. (संगीत) वादी पहा. ०हत्या—स्त्री. जीवजंतु यांचा नाश, वध, खून; प्राणिहत्या; हिंसा. जीवश्चकंठश्च—वि. अत्यंत घरोब्याचा; अतिशय दृढ (मित्र, मैत्री). एकजीव जाणें, एकजीव येणें—मरणाच्या दारीं असणें; शेवटची घटका येणें. एकजीव होऊन जाणें—एकत्र होणें; सांधून जाणें; एकरूप, एकच होणें.

**जीवणें**—अक्रि. जगणें. जिवणें पहा. 'म्या कैंवि अन्यजनसख्यसुखें जिवावें।' —मुद्गलाचार्य आर्योचें आपांदर १.

**जीवत्**—वि. जीवंत पहा. जीवत्पति—भर्तृका—वि. सुवासिनी, सौभाग्यवती स्त्री. [सं.] —पितृक—वि. आईबाप किंवा नुसता बाप जिवंत असलेला (माणूस). जीवन्मातृक—वि. आई जिवंत असलेला (माणूस).

**जीवंत**—वि. जीव, प्राण असणारा; जिता. [जीव] ०कळा—स्त्री. (प्र.) जीवकळा पहा. जिवंतपणाचें तेज; तजेला. ०कोळसा—पु. जिता कोळसा पहा. ०नरकवास—पु. जीवंत असून नरकाचे हाल भोगणें; त्रासदायक स्थिति, स्थळ; अति घाणीची जागा. ०पितृक—वि. जीवत्पितृक पहा. ०पिशाच—संबंध(समंध)—अवदसा—पुस्त्री. (ल.) उपद्व्यापी, त्रासदायक माणूस; जीवंतभूत. ०भेट—स्त्री. मरणोन्मुख माणसाची भेट; जिवंत असतांना भेट (आसन्नमरण स्थितींतील माणसाची). ०समाध—स्त्री. जीवंतपणीं स्वतःस पुरून घेणें. (व्याधिग्रस्त किंवा संन्याशी असें करतात). ०हत्या(ते)र—न. तलवार, भाला इ०; जीतहत्यार पहा. याच्या उलट मेलें हत्यार.

**जीवंतिका, जीवती**—स्त्री. जिवती पहा. 'ते असो प्रसन्न मायलेकरांसि जीवती।' —मध्व १९.

**जीवन**—न. १ आयुष्य; अस्तित्व; प्राणधारणा; निर्वाह. २ जगण्याचें, उदरनिर्वाहाचें साधन (नजीकचें किंवा अंतिम, भक्ष्य, अन्न, उद्योग-धंदा). ३ कोणत्याहि वस्तूचा आहार, भक्ष्य; धारणा—साधन; ज्याच्यावांचून जो पदार्थ जगत नाहीं तें त्याचें जीवन. जसें—अग्नीचें जीवन वायु, झाडाचें जीवन पाणी. 'वदनकथामृतश्रवण। तें जीवन मज तुझें।' —एरुस्व १.५. ४ पाणी; जल. ५ बसराई मोत्यें गोलपणांत, रंगांत, सारखेपणांत व तेजांत सर्वोत्कृष्ट असलीं म्हणजे त्यांस म्हणतात. अशीं मोत्यें दवांत १० ते १०० पर्यंत असलीं म्हणजे त्यास पातल जीवन म्हणतात. ६ वेतन. 'कां सेवकां देसी जीवन।' —ज्ञा ९.९९. —वि. आयुष्य देणारें; जीवदायक. 'तें जीवन नाम जपत। तेथे बैसला ध्यानस्थ।' [सं.] (वाप्र.) ०घालणें—प्राण घालणें; आयुष्य देणें; जगविणें.

'त्यासी जीवन घालीन मी।' सामाशब्द– ०कलह–पु. जगण्यासाठीं धडपड, कष्ट. 'ह्या काळांत जीवनकलह मोठ्या निकरानें चालला आहे.' –टि १.४५६. ०कला–ळा–स्त्री. १ जीवकळा पहा. याच्या उलट प्रेतकळा; मरणकळा. 'बुद्धिवान् मनुष्यास देहही करवेल पण जीवनकळा ईश्वराचे हातीं.' २ आयुष्य पुष्कळ दिवस राखण्याची युक्ति. ०पाडें. –नापाडी–राडें–माफक–क्रिवि. यथाशक्ति; यथासाधन; शक्त्यनुसार; सामर्थ्यानुरूप (काम सांगणें, दंड करणें, औषध देणें इ०). ०पाणी–न. शक्ति; जोर; आवेश; दम; योग्यता; धारणाशक्ति. जीव अर्थ ४ पहा. 'या घोड्याचें जीवनपाणी पाहून ओझें घालणें तें घाला.' ०रसायन शास्त्र–पाश्चात्य वैद्यकांतील एक प्रकार. बारा क्षारांच्या औषधांचें शास्त्र. मानवी शरीरांत बारा क्षार असून त्यांत एक अगर अधिक कमी झाल्यास रोग होतो, ही उणीव कमी असलेला क्षार शरीरांत घालून भरून काढितात. ०सूत्र–वि. जीवाधार; जीवाचा चालक. 'जेथ जगाचें जीवनसूत्र। श्री महात्म्या असे।' –ज्ञा १८. १८०३. ०हेतु–पु १ जगण्याचा हेतु, कारण. २ जीवाचें कार्यक्षम साधन. –नोपाय–पु. १ निर्वाहसाधन, जीव राखण्याची युक्ति. 'जीवनोपावो कां जैसा। कोल्हाटियांचा।' –ज्ञा १८.६०६. २ उदरनिर्वाह; शरीरधारणा. ३ संकटापासून वांचण्याचा उपाय.

**जीवन्मुक्त**—वि १ जीवंतपणींच आत्मज्ञान होऊन देहाभिमानापासून मुक्त झालेला; या जन्मींचे संस्कार व पुढील जन्ममरणाचे फेरे यांतून सुटलेला. २ पूर्ण आत्मज्ञानी. ३ अत्यंत विरक्त; संन्यस्त.–मुक्ति–स्त्री. आध्यात्मिक ज्ञानानें ऐहिक संस्कारापासून व पुढील जन्ममरणापासून झालेली सुटका; जीवन्मुक्ताची स्थिति. –मृत–वि (जिवंतपणींच मेलेला). १ दुष्कीर्ति प्राप्त झालेला; निंद्य; पतित. २ (ल.) मूर्ख; वेडा.

**जीवविणें**—सक्रि. चैतन्ययुक्त करणें; जीवंत करणें. 'परि आतां चंद्रापासोनि निववितें। जें अमृताहूनि जीववितें।' –ज्ञा ९. २४. 'आतां एक करी ताता। संजीवनी देऊन जीववी सुता।' –पांप्र ५.५२.

**जीवा**—स्त्री. (भूमिति) ज्या. [सं.]

**जीवाजीव**—पुअव. जडाजड; प्राणी आणि वस्तु; सजीव निर्जीव प्राणी, सृष्टि. [जीव+अजीव] जीवाजीवाधार–पु. जळस्थलात्मक पृथ्वी. [जीव+अजीव+आधार] जीवात्मा–पु. जीवरूप आत्मा; गुणांनीं बद्ध, देहाभिमानी आत्मा. 'पिंडीं व्यापक ब्रह्मांश। त्यास जीवात्मा बोलिजे।' –दा ८.७.४९. याच्याहून शिवात्मा किंवा परमात्मा–शुद्धआत्मा हा निराळा आहे.

**जीवारंभ–जीवादारभ्य**—क्रिवि. १ जन्मापासून. २ जीवंत असें पर्यंत. जीवारम्य श्रम साहस करून स्वामिकार्य करावें.' –मराआ २५. ३ मनापासून; तनमनधनेकरून; जीवापलीकडे. 'ये समयीं जीवाम्य श्रम करून दौलत वांचवूं.' –मराचिसं २२.

**जीविका**—स्त्री. १ उपजीविका; जीवनोपाय पहा. 'यज्ञा-ऐसें वर्तन। जीविकें केलें।' –ज्ञा १७.३३९. २ शक्ति; सामर्थ्य; अनुकूलता. 'त्याणें आपल्या जीविकेप्रमाणें धर्म केला.'

**जीवित**—न. जीव; आयुष्य; अस्तित्व; जिणें; प्राणधारणा. –वि जीवंत केलेला; सजीव केलेला. जीवितेश–पु. १ (काव्य) जीविताचा, आयुष्याचा शास्ता (देवता, यम, नवरा, प्रियकर इ०). २ जिवलग, प्रियकर माणूस. जीवित्व–न. प्राण; आयुष्य; अस्तित्व. जीवित पहा. 'वाळें ओढुनि काढिती बाहेर। जीवित्वावरि उदार त्या।' [जीवित]

**जीवी**—वि. जगणारा; निर्वाह करणारा. (समासांत) भिक्षा–नौका अन्न–मांस–चिरं–कल्प–जीवी. [सं.]

**जुअ**—पु जोडा, जोडी; युग्म. –वि. जुळें. 'जुआं सांगडीं।' –दाव २८०. [सं. युग; प्रा. जुग, जुअ]

**जुआळिकारूं**—वि. जवळ असणारा; रहस्यांतील, गुह्य गोष्टी सांगण्यास योग्य असा. 'गुपितिअें जुआळिकारूं। मातुसांगितें।' –शिशु ३५४. [सं. युज्]

**जुई**—स्त्री. एक पुष्पलता व तिचें फूल. जाईच्या फुलापेक्षां हें फूल थोडें लहान असतें. याचा औषधिगुण जाईप्रमाणेंच. [सं. यूथिका; प्रा. जूहिआ; हिं. गु. जुई, जुही]

**जुक(ख)ड, जुंक(ख,ड)**—न. जूं, जोखड पहा. जुखाड–न. जूं (तिरस्कारार्थी). [सं. योक्त्र]

**जुकविणें**—अक्रि. टाळणें; फसविणें. झुकविणें पहा. 'या इष्कातें जुकविणें।' –होला ७६.

**जुकाम**—न. थंडी; पडसें. –अश्वप २.१४५ [अर. झुकाम्]

**जुक्ति**—स्त्री. युक्ति; जुगत पहा. [सं. युज्–युक्त]

**जुखेळ**—पु. जुगार; द्यूत. [सं. द्यूत; प्रा. जूअ; हिं. जूआ+खेळ. म. जुवा]

**जुग**—न. १ युग. २ जुळें; जोडी. ३ एका घरांत असलेल्या दोन सोंगट्या. [सं. युग] ०डाव–पु. सोंगट्या–फाशांच्या खेळांतील एक डाव. ज्या दानानें दोन सोंगट्यांचें जुग एकदम नेतां येतें असें दान; उदा० पोबारा, चवदा, पंधरा, दसदोबारा इ०. ०दान–न. १ जुगडाव पहा. २ सुयाळें; कागद वगैरे ठेवण्याची पिशवी; जुजदान.

**जुंगट**—न. गुंजट (वर्ण विपर्यासानें).

**जुगणी**—न. रत्नखचित पदक (छातीवरील). [जुग; हिं. जुगनी]

**जुगणें**—अक्रि. १ भाग, तुकडे जोडणें, जुळविणें. २ (ल.) जमणें; मिलाफ होणें; एकमत होणें; सिद्धयनुकूल परस्पर सुसंगत

होणें (दोन माणसांचे विचार, उपाय, पदार्थ). 'एक बैल पडला तापट, दुसरा पडला मऊ यामुळें नांगराचे कामास दोघांचें जुगत नाहीं.' ३ सनगूत पडणें; सख्य होणें; तडजोड होणें (शत्रु, वादी; प्रतिवादी यांची). ४ मिलाफ बसणें; परस्पर जमणें; जुळणें; अनुरूप घटना होणें (काव्याचे चरण इ-कांची). 'आम्ही कापड बेगार होतों परंतु कापडकऱ्याचें आमचें जुगत नाहीं.' ५ संभोगार्थ स्त्रीपुरुषांनीं एकवटणें. ६ अनेक सोंगट्या एका घरांत येणें. [सं युग]

जुगल—स्त्री. १ जमाव; समूह. २ सख्य; मिलाफ; एकतानता (वाद्यें, उपाय यांची). 'या मृदंगाची आणि गवयाची जुगल चांगली होते.' ३ सामना; बरोबरी. ४ जोडीनें गाणें; खेळणें; दुसऱ्याशीं आपलें जमविणें; साथ; एकमेकांचा संयोग. 'याला पुढें तसें गातां येत नाहीं पण मागून सूर देण्याविषयीं जुगल चांगली करितो.' ५ एकत्र केलेलें खलबत; मसलत. ६ (सामा.) जूंग; जूट; जोडी. [सं. युगल; प्रा. जुगल] जुगविणें—१ एकत्र जोडणें; संयोग करणें. २ मेळ बसविणें; एक मिलाफ करणें. ३ सख्य करून देणें; मैत्री करविणें. [जुगणें प्रयोजक]

जुगत—स्त्री. १ युक्ति; शक्कल; चातुर्य; हिकमत; व्यावहारिक हुषारी. २ जुगूल या बद्दलहि केव्हां केव्हां योजितात. ३ जुगूत पहा. [सं. युज्—युक्त; युक्ति. फा. जुगत] जुगताई—स्त्री. जुगत अर्थ १ पहा.

जुगंत—वि. एकत्र; मीलित. 'ऋषि झाले जुगंत ।' —वसा ४८. [जुगणें]

जुंगा—वि. (प्रां.) तरबेज; हुषार; चतुर; कुशल.

जुंगा—पु. झिंगा नांवाचा मासा. 'जेय सावजांचा घुघुवाटीं।' जुंगियांचां रुणझुनाटीं' —शिशु ३१८.

जुंगाड—न. १ (कों.) झाडें, झुडपें, वेली इत्यादींच्या पानां-फांद्यांची गुंतागुंत; जुंवाड; दाट विस्ताराचें झाड, झुडुप, जाळी. २ (ल.) अगडबंब माणूस, रेडा, साप, मासा इ०. [जुगणें]

जुगांत—न. प्रलय; घनघोर युद्ध. [सं. युग+अंत]

जुगार—पु. द्रव्यप्राप्तीच्या लोभानें किंवा नशिबाची परीक्षा पाहण्याकरितां कमेंगुकीच्या खेळांत पैसे लावून खेळणें; जुवा; द्यूत; शर्यत. [सं. द्यूतकार; प्रा. जूआर] जुगारी-ऱ्या—वि. जुगार खेळणारा; जुगारीचें व्यसन असलेला.

जुगुप्सा—स्त्री. निंदा; निर्भर्त्सना; दोष देणें, लावणें. [सं.] जुगुप्सित—वि. निंदिलेलें; दोष दिलेलें; तिरस्कृत. [सं.] ०दृष्टि—स्त्री. (नृत्य) डोळ्याचा मध्यभाग व पापण्या आकुंचित करणें. हा भाव जुगुप्साद्योतक आहे.

जुगूत—१ कल्पक युक्ति, योजना; खुबीदार कल्पना; दम; चूट. २ कळा; कौशल्य; हातोटी; कार्याची सुरेख व्यवस्था, लावणी. ३ काटकसरीनें प्रपंच चालविणें; निर्वाह करणें. 'शंभर रुपयांत कशी तरी संसारखर्चाची जुगूत करितों.' जुगत पहा. [सं. युक्ति; हिं. जुगत]

जुगूल—स्त्री. जुगल पहा.

जुंगो—वि. १ (गो.) वृद्ध. २ निष्णात. जुंगा पहा.

जुगोटा जोगी, जोगिड्या—पु. कावळ्याच्या रंगासारखा, पुरुषभर लांब व जाडा साप. हा निर्विष, मोर, ससा खाणारा आहे, चावत नाहीं. —वदलापूर ३४८. [सं. योगी]

जुग्म—न. युग. [सं. युग्म]

जु(जुं)ज-झ—नस्त्री. युद्ध; लढाई; झोंबी; भांडण; कज्जा. 'न होऔची जुंझ मांडण ।' —शिशु १२०. [सं. युद्ध; प्रा. जुंज]

जुंज-झ)णें, जुजणें—अक्रि. लढणें; भांडण करणें. जुजता—वि. १ भेटणारा; दोन विरुद्ध दिशांनीं समोरासमोरून येऊन एकमेकांस मिळणाऱ्या तुळ्या, काट्या, ज्याणे तिरकस ठेवलेल्या व एकमेकांचा एकमेकांना आधार आहे अशा. २ एकेका शेवटास वेगवेगळी कामास सुरवात होऊन मध्यावर एकमेकांस मिळणारें (काम, शेताची कापणी इ०). ३ कागदाच्या वरील व खालील बाजूकडून लिहिण्यास प्रारंभ करून मध्यें येऊन खेटणारें (लिखाण). [जुज, जुंझ]

जुजदान—न. जुगदान पहा. कापडाची पिशवी, बटवा (कागद, पानें, सोंवळ्याची चीजवस्तु इ० ठेवण्यासाठीं). 'जुजदान देखील आणिलें त्यांत दरबारखर्चाची यादी' —ख १०७१. [फा. जुझ्+दान]

जुजबी—वि १ किरकोळ; तात्पुरती; सरासरी निर्वाहापुरती; कमजोर बांधणीची (इमारत). २ लहान प्रमाणावर चालविलेला; तात्पुरता; किरकोळ; यथा कथंचित निर्वाहापुरता (व्यवहार, धंदा). ३ थोडा; हलका; कांहींसा; किंचित; क्षुद्र. 'यासि जुजबी पीक आलें.' —रा १८.३१. ४ कामचलाऊ; तात्पुरता; हंगामी. 'नंतर लॉर्ड्स सभेत कांहीं किरकोळ वाटाघाट होऊन त्या सभेनें आपल्या रचनेंत काहीं जुजबी फेरफार करण्याबद्दल ठराव केले.' —पार्लमेंट २४६. ५ आटोपशीर (संसार). —क्रिवि. वेतावातानें; हळू हळू; तुरळक. [अर. जुझ्वी]

जुजरशी-सी, जुजरुशी-सी—स्त्री. १ काळजी; चिंता; लक्षपूर्वक शुश्रूषा (प्राण्यांची, पदार्थांची). (क्रि० ठेवणें; राखणें; करणें; पाहणें). २ बारीक चौकशी. 'शहरचे दरवाजे तीन चार खुले; तेथें गाडदी ठेऊन.' येणाऱ्या जाणाऱ्याची जुजरसी बहुत आहे.' —रा ५.९९. ३ काळजीपूर्वक व्यवस्था, संपादणी (काम, धंदा यांची). [फा. जुस्तसी]

जु(जुं)जाटा—झुझाटा पहा.

जुंजा(झा)र—वि. युद्धकुशल; युद्धाची आवड असणारा; वीर; लढवय्या. 'आधीं जुंझार; तुवां होआवें । मग जुंझावया

शस्त्र घेयावें ।'—ज्ञा १८.१२८३. —न. लढाई; युद्ध. (क्रि० लागणें; होणें). [जुंज]

**जुजुत्सु**—पु. जपानमधील एका प्रसिद्ध खेळाचें नांव. या खेळांत शक्तीपेक्षां युक्तीचा जास्त उपयोग करून आपल्यापेक्षां अधिक भारी अशा गड्यास चीत करावयाचें असतें. [जपानी तुल० सं. युयुत्सु]

**जुज्वियात**—न. किरकोळ गोष्टी; तपशील 'आम्हाकडील जुज्वियातचें फडचे करून थावे.'—रा ५.११. जुजवी पहा. [अर. जुझ्वीयात्]

**जुंझा-वात-वायु-मारुत-पवन**—पु. (काव्य) झंझा-वात इ० पहा.

**जुटणें**—अक्रि. १ जोडलें जाणें; संयुक्त होणें; मिळणें. २ एकत्र जमणें; गोळा होणें; जमणें. ३ जुडणें याबद्दलहि कधीं कधीं योजितात. [सं. युज्-यूथ; म. जूट]

**जुटी**—स्त्री. १ जूट; ऐक्य; मिलाफ. २ टोळी; संघ. ३ गर्दी; जमाव; समाज. [जुटणें]

**जुट्टा**—पु. दहा विटां-कौलांचा समुदाय, ढीग. [जुटणें] 'एवढेशी पडवी शाकारायाला पांचशें जुट्टे कौलें लागलीं.'

**जुडगा-गें, जुडका-कें**—पुन. भारा; गट्टी; पेंढी; लहानसा गठ्ठा; जुडी (आगकाड्या, भाजी, उसाचीं कांडीं, बोरू, केस, इ०ची). [जुडणें]

**जुडवें**—क्रि. (गो.) आंगलट करणें; तुटून पडणें. जुडणें पहा.

**जुडणी**—स्त्री. १ जुळणी; सांधणी; जोडणी. २ समुदाय; जुडगा. [जुडणें]

**जुडणें**—अक्रि. जुळणें १ लागणें; प्रवृत्त होणें; जोरानें धावून येणें, घुसणें; जुळणें. 'जेवायाला सर्व जुडतात परंतु कामास कोणी जुडत नाहीं.' २ एकत्र जमणें, येणें. 'तो एकटा होता तोंपर्यंत मी त्याजबरोबर मांडलों मग ते जुडून येतांच पळालों.' ३ मिळणें; जमणें; जुळणें; एकमत होणें; विरोध न येणें (अनेक बातम्या, मजकूर यांचा). ४ भिडणें; विलगणें; खेटणें. 'मंथरा जुडे अंतरी उडे ।'—मध्व ४२. —सक्रि. १ व्यवस्थेशीर व क्रमानें एकत्र करणें, जुळणें; एकत्र रचणें; क्रमानें लावणें. २ लावणें; जडविणें; वर बसविणें; ठेवणें. [सं. युज्; प्रा. जुडिअ]

**जुडा**—पु. १ जुडगा; समुदाय (आगकाड्या, भाजी, पेन्सिली, अंबाडी यांचा). २ गांठ; जुडी; बुचडा; अंबाडा (केस, कांदे यांचा) [जुडणें] **जुडाई**—स्त्री. १ मिलाफ करणें; जोतणें; जोडणी. २ जोडलेपणा; संयुक्तता; जूट. ३ जुळविण्याची मजूरी. ४ (गवंडी) बांधकाम.

**जुडी**—स्त्री. लहान जुडा. जुडा पहा.

**जुडी**—स्त्री. १ सरकारी नोकरांना त्यांच्या नोकरीबद्दल बक्षीस दिलेली इनाम जमीन. २ या जमिनीवरील सरकारी सारा, पट्टी.

**जुडीव**—वि. व्यवस्थित रीतीनें जोडलेलें, ठेवलेलें, बसविलेलें. [जुडणें]

**जुतणें, जुंतणें**—सक्रि. (व.) जुंपणें; जोडणें. 'तरी संसार-पांतीं जुंतलिया । मंवताचि असावें ।'—ज्ञा ८.२४४. [सं. युत]

**जुतरी, जुत्री**—स्त्री. १ लहान ओढा, नाला, ओहोळ. २ कोरडा ओढा; ओढ्याचें कोरडें पात्र. (प्र.) छुतरी-त्री पहा.

**जुना, जुती, जुतें**—पुस्त्रीन. पायताण; जोडा; वहाण; चप्पल (एक अथवा जोड). **जुती-ते पैजार**—स्त्री. १ खेटराखेटरी; जोडा जोडी; वाहणांनीं एकमेकास मारणें. (क्रि० करणें; होणें; चालणें). मांडण. 'सख्या भावांत देखील जुतेपैजार होते.'—आगर ३.१८४.

**जुंती**—स्त्री. जुंपणी.

**जुत्पत्ती**—पु. (काव्य) रणकुशल योद्धा; मोठा बांका लढ-वय्या; शूरवीर; जेठी. 'तो अंगद दक्षिणेप्रती । सवें देवोनि जुत्पत्ती । रामें धाडिले सीताशुद्ध्यर्थीं ।'—मारा किष्किंधा १६.१५१ [सं. युद्धपति]

**जुदा**—वि. निराळा; वेगळा; भिन्न; अलग. [फा.] **जुदाई-गी**—स्त्री. निराळेपणा; वेगळीक; अंतर. 'पंडित प्रधान व नवाब निजाम यांचा तरिका एकआसीचा कदिमापासोन चालत आला, हल्लीं त्यासी जुदागी नाहीं.'—रा १०.१६५.

**जुनट, जुनवट**—वि. १ जीर्ण; प्राचीन; जुना. २ अनुभविक; जुन्यासारखा 'जुनटु जुंझारू हा येकु । नाहीं जयातें कलंकु ।' —गीता १.४३५. [सं. जीर्ण; प्रा. जुण्ण+वत्-वट प्रत्यय] **जुनवट**—स्त्री. नागवेली, वड इ० झाडाचीं पिकलेलीं पानें. **जुनवान**—वि. १ पिकलेलीं (पानें). २ जुनाट (झाड, वनस्पति).

**जुना**—वि. १ पुराणा; प्राचीन; पुरातन; अर्वाचीन काळचा नव्हे असा.' आतां जुनीं माणसें बहुधा राहिलीं नाहींत.' २ फार दिवस वापरलेली (वस्तु); झिजलेला; फाटलेला (जिन्नस). ३ समाप्त होऊन ज्यास बराच काळ झाला आहे असा (व्यापार इ०). 'तुझे पंक्तिचे जेवणारे जेवून उठून जुने झाले, तरी तुझें जेवण होतच आहे.' [सं. जीर्ण; प्रा. जुण्ण. गु. जुनू] **०खोड**—पु. दणकट; दिवट; टणक, सशक्त (म्हाताऱ्या माणसास लावतात) **जुनाट**—वि १ जुना; प्राचीन; फार दिवसांचा; जुन्या काळचा. 'आतांचे मनुष्यापेक्षां जुनाट मनुष्य प्रामाणिक.' २ पक्का; पक्व (बुद्धि, विचार, अनुभव, झाड). 'या झाडांतलें जुनाटलें झाड पाहून तोडा.' **०पाना**—वि. बराच जुना; जुनापुराणा; वापरलेला; फाटलेला (कपडा, मांडें, घर). ३ जुना अर्थ ३ पहा. **०पापी**—वि. धूर्त, शहाणा (म्हाताऱ्याबद्दल वापरतात). **०पुराणा**—वि. १

जुनवट; जीर्ण; थकलेला. २ वापरलेला; झिजलेला; जुनापाना. ३ वडील; ज्येष्ठ; फार दिवसांचा (माणूस). ४ बहुतकाळचा; जुना (कामदार, हुद्दा, धंदा, व्यापार). [जुना+हिं. पुराणा] ०जुना-वणें-अक्रि. १ जून होणें; पक्क होणें; पक्कें होणें; स्थापित होणें; वळावणें; दृढता पावणें (वस्तु, झाड, वृद्धि, अभ्यास, वातमी, रोग इ०). २ (वाईट अर्थानें) तारुण्यांतील जोर जाणें (बुद्धीचा); उतरत्या कळेस लागणें. जुनेरें, जुनेर-न. (कों.) जुनें वस्त्र. (विशेषतः बायकांचें जुनें लुगडें).

**जुन्नरहरहुन्नर**—पु. हिकमत; लुच्चेगिरी; युक्ति; करामत; लटपट; उलाढाल. (हा शब्द व्यापक अर्थानें वापरतात). 'जुन्नर हरहुन्नर करून मी पोट भरतों' [हुन्नर ची द्वि.; किंवा जुन्नर+हुन्नर]

**जुन्नरी**—वि. जुन्नर गांवासंबंधीं. म्ह० जुन्नरी हरहुन्नरी=जुन्नर शहरांतील लोकांची हुशारी व सोदेगिरी वर्णन करतांना वापरतात.

**जुप**—न. कोठार; भांडार. 'नातरि देव-राजधानींचीं जुपें। उघडलीं मज पांतां।' —ऋ २३.

**जु(जुं)पण-णी**—स्त्री. १ जुंपण्याची क्रिया. २ जुंपणी. ३ जुंपण्याचा सोइस्करपणा, योग्यता; संवगड्याशीं जुळतें असणें. 'ह्या बैलाची त्या बैलाची जुंपण आहे.' ४ (कु.) बैलास बांधण्याची दोरी. —न. (राजा.) गाडीची धुरी; इसाड व जूं याना बांधणारी दोरी. २ जाड, मजबूत पदरांची-दुपेडी तिपेडी दोरी. ३ (विणकाम) मागाच्या दुसऱ्या टोकाजवळचें सूत ताणणारें धनुष्याकृति लाकूड; ह्या लाकडानें व गुलड्यानें हें सूत ताणलें जातें. गुलडा पहा. ०जु(जुं)पणें-उक्रि. १ जोडणें. २ (ल.) गुंतविणें; कामास लावणें, लागणें. ३ प्रारंभ करणें; व्यवस्था लावून देणें (काम, उद्योग, इ० ची). ४ प्रवृत्त होणें (युद्ध, वाद इ०स); सुरू होणें. 'त्याची बोलतां बोलतां अकस्मात लढाई जुंपली.' [सं. युज्; प्रा. जुप्प] —न. १ जुंपण अर्थ ३ पहा. २ (विणकाम) कापड विणून झाल्यावर उरणारीं एक ताण्याचीं शेवटें दुसऱ्या कापड विणावयाच्या ताण्यास जोडण्याचें साधन. ३ (ल.) उत्पत्ति; रचना. 'जै पहिलें सृष्टीचें जुंपणें।' —ज्ञा १४.५७. ४ बैलाच्या गळ्यांतील दोरी; जोखडाचा पट्टा; दोरी; जुवणी, जुंवाली पहा. [सं. युज्; प्रा. जुप्प]

**जुपन**—न. (व.) जुंपण पहा. आऊताच्या जुंपण्याच्या वेरडी, चऱ्हाट, वारती, कासरा मिळून.

**जुंफण-णी-णें**—जुंपण-णी-णें पहा.

**जुफो**—पु. रानगांजा. —मुंव्या ११०.

**जुबा**—पु. पायघोळ झगा (सर्वांत वर घालण्याचा); झब्बा. 'जुबा मोठ्या पट्टीचे मश्रूचा' —ऐटि ३.५०. [फा.]

**जुंबाड-डा-डें. जुंबडा-डें, जुंभाड**—न. १ वेणी किंवा शेंडी यांचा डोक्यावर बांधलेला बुचडा, गांठ. २ समुदाय; झुबका; जुडगा (काथ्या, वेत, बोरू, मुळ्या, केस, मोत्यांचे सर इ० चा). —ज्ञा ११.३६३. 'तुझिया भुजांचें जुंबाड। हें मी करीन शत-खंड।' —कथा २.१३.१४५. ३ सापाचें वेटोळें. 'हातें रगडितां सर्पतोंडें। सुटली सर्पांचीं जुम्बाडें।' —मुआदि २९.१०६. ४ दाट पानांचा वृक्ष, झुडुप; जाळी; झाडांच्या फांद्यांची, पानांची गुंता-गुंत; दाट झाडी. 'नाना वृक्षांचें जुंबाड।' —दा १०.९.२. ५ (विशेषतः जुंबाड), माणसांची टोळी, समुदाय. 'माणसांच्या जुंबाड्यांचीं जुंबाडें धावलीं.' जुंगाड पहा. [सं. युग्म; प्रा. जुम्म; ? तुल० इं. जंबल]

**जुब्द(बद)तुल-आमासील(एक्रान)वल**—थोरांत व समवयस्कांत श्रेष्ठ. 'जुबदतुल अमासील वल एकरान दत्ताजी देशमुख.' —रा २०.२१४. [अर. झुब्द=सार, नवनीत; फा.]

**जुमडा**—पु. (व.) बुचका. जुंबाड पहा.

**जुमला, जुम्ला**—पु. १ एकूण जमा, बेरीज, आकार. 'नाकिर्दी असेल जुम्ला पैकीं। तें किर्दी करावी निकी।' —मेस्तक (लेखकाधिकार) ११५. २ समुदाय. ३ सव्वाशें घोडेस्वारांची पलटण; शंभर-दीडशें शिपायांचें पायदळ. [अर. जुम्ला] **जुमलेदार**—पु. १ जुमल्यावरचा अधिकारी; शताधिप. —राव्यको ६.१. २ जमाबंदीखात्यांतील मुख्य हिशेबनीस.

**जुम(म्म)स**—१ भय; धास्ती; दरारा. 'येकायेकी जुमस खाणार नाहींत.' —पेद ४.५. २ कच; फारकत. जुमान पहा.

**जुमान, जूम, जुमास, जुमस**—पुस्त्री. १ जागा सोडणें; सरकणें; वदलणें; हार खाणें; हटणें (नेहमीं निषेधार्थी उपयोग). (क्रि० खाणें; पावणें). 'पाऊस जूम खात नाहीं किंवा खाऊं देत नाहीं.' 'हा सावकार, हें दुखणें, हा हींवताप मला जुमान खाऊं देत नाहीं.' २ धाक; आदरयुक्त भीति; दरारा; (व्यक्ति, वस्तु यांसंबंधीं फार भयप्रद किंवा थोर अशी कल्पना). (क्रि० खाणें; पावणें; पडणें; असणें). 'तूं डोळे वटारले म्हणून तो का तुला जुमान खातो आहे.' [फा. जुंबिश्=गति व फा. गुमान=कल्पना, विचार. या दोन शब्दांपासून वरील अर्थाचे शब्द बनले आहेत] **जुमानणें**—सक्रि. १ किंमत मानणें; मान देणें; महत्त्वाचें, भारदस्त किंवा भयंकर आहे असें समजणें; भय वाळगणें; पर्वा करणें (निषेधार्थी उपयोग). 'जो सरकारला जुमानत नाहीं तो कां खोताला जुमानतो?' २ कसाला लावणें; अजमावणें. 'गोटी जुमानून पहा.' ३ अनुल्लंघनीय, दुर्निवंद्य आहे असें मानणें. ४ गाठणें. [फा. गुमान]

**जुमारात**—स्त्री. गुरुवार. [अर. हिं. जुमेरात]

**जुयटें**—न. (कों.) नदींतील, खाडींतील बेट; नदीच्या पात्रांतील उघडा पडलेला लहानसा भाग. [सं. द्वीप. जुवें पहा. ट= अल्पत्वदर्शक]

**जुरई**—वि. घोड्याचा एक रंग. —अश्वप १.२८.

**जुरत**—स्त्री. धाडस; ताकद; मर्दुमकी; विशाद; शौर्य (निषेधार्थी प्रयोग). 'जुरत कोणाची पाहील मजकडे नजर करून वाकडी.' –पला ६. 'मुंबईवाले यांची काय जुरत कीं कलकत्तेकर ठरावितील त्यास तफावत करितील.' –ख ७.३५६९. [अर. जुर्अत्] ०दार, जुरद्दार, जुरती–वि. धाडशी; शूर; धीट; हिंमतदार. [फा.] ०मेहनत–स्त्री. धैर्याची कोशीस. 'पूर्वीपासोन जो कोणी जुरत मेहनत करीत आहे त्यास मुल्खास व खजान्यास व फौजेस कमी नाहीं.' –दिमरा १.३४.

**जुरदा**—वि. (माण.) उत्तम.

**जुरा**—पु. ससाणा. [अर. जुर्रा]

**जुरा, जुराबावरा**—वि. कुलैबाज; अकडबाज; रंगेल; नटवा. 'सवाई यशवंतराव जुरा।' –ऐपो ३६१.

**जुर्बा(र्मा)ना**—पु. दंड; शिक्षा. [अर जुर्म=गुन्हा; अर. मूळ. जरीमान. फा. जुर्माना]

**जुलपगार**—स्त्री. मिरवणुकींत ताबुताच्या बरोबर तरवार आणि भाला नेतात तो. [अर. जुलफकार=भोंक पाडणें, अलि याच्या तरवारीचें नांव]

**जुलमाना**—पु. दंड. [अर. जर्माना अप.]

**जुलाब**—पु. १ ढाळ होण्याचें औषध; ढाळक; रेचक. २ त्या औषधानें झालेला ढाळ, रेच. [अर. जुल्लाब्]

**जुलूप**—न. केसांचें झुलूप; काकपक्ष. [फा. झुल्फ]

**जुलूम**—पु. १ जबरदस्ती; जबरी; बलात्कार; परपीडा; अन्याय; अन्यायाचा दाव; प्रतिबंध. २ जोरानें कृत्य; दीर्घ प्रयत्न; अतिशय श्रम. एखाद्या गोष्टींत बेसुमारपणा या अर्थानें उपयोग होतो. अतिशयपणा; जाजती; कमाल. 'आज पावसानें जुलूम केला.' 'पोरानें रडण्याचा जुलूम केला.' ३ अतिशयवैपुल्य किंवा अवाढव्य आकारमान पाहून झालेली आश्चर्यचकित मनोवृत्ति दर्शविण्यासाठीं योजितात. [अर. झुल्म्] (समासांत किंवा सामान्य रूपांत जुलम असें रूप येतें) सामाशब्द– **जुलमाचा रामराम**–पु. (आपल्याशीं नीट न वागणाऱ्या अधिकाऱ्याला तो जुलूम करील या भीतीनें, केलेला रामराम). निरुपायानें नाखुषीनें पत्करलेली गोष्ट; सम्यपणें पण कडक हुकूम करून केवळ करावयालाच पाहिजे नाहीं तर शिक्षा होईल अशा धाकामुळें केलेलें काम. सक्तीनें करून घेतलेलें काम, नोकरी इ०. 'आज या घराला रामराम ठोकण्यापेक्षां घटकाभर जुलुमाचा रामराम पत्करला.' –भा ९०. **जुलमाजुलमीं, जुलमानें, जुलमाजुलमानें, जुलमावर**–क्रिवि. १ जबरीनें; बळजोरीनें. २ अतिशय श्रमानें, कष्टानें; जीव तोडून; होईल तितका प्रयत्न करून; युक्तिप्रयुक्तीनें [जुलूम द्वि.] **जुलमी**–वि. जबरदस्ती करणारा; कठोर; प्रजापीडक; अन्यायी. [अर. झुल्मी] **जुलूमजबरी**–स्त्री. बलात्कार; जुलूम. ०दस्ती–जास्त–जास्ती–स्त्री. १ जुलूम. –राजवाडे २२.१२०. २ जुलमाचा, जबरदस्तीचा व्यवहार किंवा आचरण; करडा अंमल; सक्ती, जबरदस्त उपाय. [अर. झुल्म्+फा. दस्त; फा. जिआदती] ०पादशाही–स्त्री. अतिशय जबरदस्ती; बलात्कार; बळजबरी; कडकपणा; कार्यातिरेक; अमर्याद कृत्य (एखाद्या कृत्याचा बेसुमारपणा दर्शविण्यासाठीं योजतात). [अर. झुल्म्+फा. पादशाही] ०बाजार–पु. ठराविक दिवसाहून अन्य दिवशीं भरवावयास सांगितलेला बाजार.

**जुलूष-स**—पु. १ राज्यारोहण. २ समारंभ; थाट; डामडौल; भपका; वैभव. 'तिकडून दीडप्रहर रात्रीस मोठे जुलुसानें फिरंगियांसहवर्तमान शहरांत आले.' –रा १.२७. जलूष पहा. ३ मिरवणूक. 'आज मुसलमानाचा जुलूस निघणार आहे.' –वि. वजनदार. [अर. जुलूस्]

**जुलै**—पु. इंग्रजी वर्षाचा सातवा महिना. [इं.]

**जुल्कद्र**—वि. प्रतिष्ठित. 'जुल्कद्र कृष्णराव नारायण.' –रा १९.१०५. [अर. झुल्+कद्र]

**जुल्हाई, जुल्ही**—पु. मुसलमानी कोष्टी; विणकर. [फा. जौलाह्; हिं. जुलाह्]

**जुंव**—न. जोखड. जूं पहा.

**जुवडी**—स्त्री. (खा.) जोडजूं; जोडणी. जुवाड–डी पहा.

**जुवणी**—स्त्री. १ कोळप्याची जोडी. २ (राजा.) जुपणी, जोतें. (बैल इ० कांच्या मानेस अडकावयाचें)

**जुंवळ**—न. जुळें; जुळीं मुळें; एका गर्भापासून उत्पन्न झालेले दोन प्राणी. [सं. युगल; प्रा. जुगल, जुवल]

**जुंवळा**—वि. १ जुळा; जावळा; जुळ्यापैकीं एक. २ दुहेरी; जोडीनें वाढणारीं (फळें). [जुवळ]

**जुंवळी**—स्त्री. १ जोडपें; जोडा; जोडी युग्म. २ जुळी. [जुवळ]

**जुवा**—पु. सांधा; जोड; जवा; एकमेकाशीं बरोबर मिळणें; जोडलें जाणें. जवा पहा. 'तीं (कौले) एकमेकांत जुवा होऊन बसतील अशीं असावीं.' –मॅरट ८२. [सं. युज्]

**जु(जु)वा, जुवें**—पुन. (कों.) नदींतील बेट. उदा० कुंभार जुवें गोंवें. जूं पहा. [सं. द्वीप]

**जुवा, जुवार**—पु. १ फांशाचा खेळ; द्यूत; जुगार. २ जुगारी. 'तें जिणें कीं जुवाराचें। ठिटेघर।' –ज्ञा १८.६७३. [सं. द्यूत]

**जुवाड, जुवाडी**—स्त्री. लहान जोखड; नांगराच्या चाहुरीच्या वगैरे पुढील बैलांच्या मानेवरील जूं. [सं. युज्; प्रा. जुअ]

**जुवा(मा)मर्दी**—स्त्री. जवांमर्दी; शौर्य. जवानमर्दी पहा.

**जुवारी**—वि. जुगारी. 'पात्रें भाट का नागारी। सामान्य स्त्रिया का जुवारी।' –ज्ञा १७.२९६. [सं. द्यूत; प्रा. जूअ. जूआरि=द्यूतकार]

**जुवारी**—स्त्री. जोंधळा; जवारी ( धान्य ). (जुवारी, बाजरी हे शब्द पुणें प्रांतांत आणि कोंकणी मंडळींत प्रचारांत आहेत परंतु देशावर त्यांना जोंधळा, सजगुरा म्हणतात. [प्रा. दे. जुआरी; हिं ]

**जुंवाली**—स्त्री. ( कों. ) वैलाला जुंपण्याची दोरी; जुवगी पहा. [ जूं+आळी ]

**जुवीज**—पु. ( गो. ) न्यायाधीश. 'आपल्या वडिलांच्या ओळखीच्या एका जुवीजाला या मिठागरांतील शेवटयांची कशी चटक लागली होती ... '—सह्याद्री १०४. [ पोर्तु.; इं. जज्ज ]

**जुवेबाज**—वि. फांशांनीं द्यूत खेळणारा; जुगारी. [ जुवा ]

**जुवेबाजी**—स्त्री. द्यूत; फांशाचा खेळ; जुगार खेळण्याचा नाद.

**जुव्वा, जुव्वेबाज, जुव्वेबाजी**—जुवा इ० पहा.

**जुष्टी**—स्त्री.आनंद.' विश्रे घ्यावी सांठवून। ही एक तुह्मी जुष्टी।'—टिळककविता पृ. १८३. [ सं. जुष्=संतोषविणें ]

**जुस्त**—वि. ( कु. ) योग्य; बरोबर. [सं. युज्—युक्त; तुल०इं. जस्ट; फ्रें. जुस्त ]

**जुळणी**—स्त्री. १ परस्परांचा संयोग; जुळण्याचा व्यापार; मेळानें किंवा व्यवस्थेशीर, क्रमवार जुळणें; एकत्रपणा; रचना; योग्य आणि नियमित एकत्रीकरण; जुळणें पहा. २ मेळ; तुलना; समता; जम; जवा. 'त्या पदाची आणि अभंगाची जुळणी चांगली होती.' 'आमचें जुळणीस कोणी मिळत नाहीं.' [ जुळणें ]

**जुळणें**—उक्रि. १ नियमितपणें एकावर एक ठेवणें (घडी,वस्तु); बाजूला जोडणें (कापड मोठें करण्यासाठीं त्यास तुकडा); एकापुढें एक लांबवर जोडणें किंवा ठेवणें. 'ही कळाशी सारखी जुळत नाहीं.' २ (शब्दशः आणि ल० ) मेळांत एकत्र ठेवणें; व्यवस्थित जुळविणें ( यंत्राचे भाग, कवितांचे चरण, धंद्याचीं खातीं, पुस्तकें, कागद, पानें, ठसे इ०). 'कागद पसरले आहेत ते नीट जुळून ठेव.' मेळ बसविणें; एक जुळणी करणें; एकत्र आणणें, ठेवणें ( अनेक हिशेब, मजकूर, नानाविध स्वभाव ). 'तुम्ही गोष्ट बोलतां पण हिचा पूर्वापर संबंध जुळत नाहीं.' [ सं. युज्—युगलित; प्रा. जुगलिय ]

**जुळलेला**—वि. १ एकत्र केलेला; संयुक्त. २ (वांई) सर्वच्या-सर्व किंवा आठ दांत उगवलेला (बैल). 'हा बैल जुळलेला आहे.' =याला सर्व दांत आले आहेत.

**जुळव**—पु. भारा; जुडी. —वदलापूर ६५. [ जुळणें ]

**जुळविणें**—सक्रि. एकत्र करणें; मेळ घालणें. [जुळणें प्रयोजक]

**जुळा**—वि. १ जावळा; जुवळा; आवळ्याजावळ्यापैकीं एक. २ दुहेरी; आवळाजावळा; एकमेकास चिकटून उत्पन्न झालेलीं; जोडीनें एकत्र वाढणारीं ( दोन फळें ). 'जुळा आंबा, केळें.' [ सं. युगल ]

**जुळाजु(च)ळ, जुळवाजुळव**—स्त्री. १ व्यवस्थित मांडणी; नीटनेटकी व्यवस्था; ( अनेक भाग, व्यक्ति इ० ची ); जुळणी पहा. २ अनेक ठिकाणांहून आणून एक करणें, मांडणें (वस्तु) तयारी. [ जुळणें ]

**जुळारी**—पु. टाईप जोडणारा; जोडारी; ( इं. ) कंपाझिटर. [ जुळणें ]

**जुळी**—स्त्री. १ गड्डा; ढीग; गड्डी; जुडी; युग्म; जोड (विड्याचीं पानें, पत्ते, कागद इ० एकाच जातीच्या आणि एकाच आकाराच्या वस्तु). २ दोन बांगड्यांचा दागिना; दोन रत्नें किंवा सोनेरी मणी असलेले दोन सर. ३ एकत्र वळविलेली दोन वातींची जोडी. ४ ( सामा. ) दुहेरी; जोडवस्तु; जुवळी पहा. [ जुळणें ] ०दूड—स्त्री.काचेच्या मण्यांच्या किंवा हिरव्या पोतीच्या दोन पदरांत सोन्याचे दोन मणी घातलेला लहान मुलीच्या गळ्यांतील दागिना.

**जुळें**—न. १ जोड मुलें; आवळींजावळीं मुलें; जुवळ पहा. २ बांगड्यांचा जोड किंवा बांगड्यांचें जुळें; जुळी पहा. ३ जोडी; युक्कल; जुग याअर्थी—अंब्याचें—केळ्याचें—पेरूचें—फळाचें—जुळें; सापाचें जुळें=सापाचें मैथुन. ४ नवराबायको; पुरुषस्त्री; मिथुन, [ सं. युगल ]

**जू**—स्त्री.ऊ ( प्राणी ). —वदलापूर १२८. [ सं. यूका;प्रा. जूआ ]

**जूं**—न. १ बैलाच्या मानेवरचें लांकूड; जोखड. जुंव पहा. २ ( ल. ) ओझें; बोजा ( जबाबदारीचा, धंद्याचा, काळजीचा; इ० ) जबाबदारी. [ सं. युज्; प्रा. जूअ ]

**जूं**—न. जुगार; द्यूत. 'छळितया विंदाना—। माझीं जूं तें मी विचक्षणा।' —ज्ञा १०.२८४. [ सं. द्यूत; प्रा. जूअ ]

**जूं**—न. ( कों. ) नदींतील बेट; जुवा पहा. [ सं. द्वीप ]

**जूग**—न. १ मंडळी; टोळी; जूट. 'त्या पोरांचें जूग फोडल्यावांचून सभेंतील गडबड मोडणार नाहीं.' २ मंडळ; कट; समिती; संघ. ३ ( सोंगट्यांचा खेळ ) दोन किंवा अधिक सोंगटया एका घरांत येणें. ४ युग; एक दीर्घ कालमान; जगाचें युग; हीं चार आहेत; युग पहा. [ सं.युग ]

**जूग**—न. (कु. नाविक) दोऱ्या (टांकणी, अलाज, खुराप) तयार करण्याकरितां केलेलें एक साधन. [ सं. युग ]

**जूज**—वि. थोडें; किरकोळ; क्षुद्र. 'जूज कामाकरितां आपआपल्यांत नाखुशी राखणें ठीक नाही.' —रा १९.१०. [ अर. जुझ्‍+अ ]

**जूट**—पुस्त्रीन. १ जूग; तट; मंडळी; जुळलेली मंडळी. २ एकोपा; मैत्री; सलगी; ऐकमत्य. ३ समाज; तांडा; संघ; समुदाय; कंपू. ४ जंगजूट; जंगजोड पहा. [ सं. यूथ; प्रा. जूह किंवा सं. युक्त; प्रा. जुत ] ०भाऊ—पु. इनामदार इ० वर्गांतील परस्पर पुरुष; एकत्र कुटुंबांतील व्यक्ति.

**जूडा**—पु. ( ना. ) अंबाडा; बुचडा ( केसांचा ). [ जुडा ]

**जूद**—क्रिवि. लौकर; त्वरेनें; जलद. 'जूद चेनापट्टण तालुक्यांत जागें होय तें करावें.' —रा १९.७३. [ फा. ज़ूद ] ०तर—वि.

विशेष लौकर. 'जूदतर खर्चाची मदत इम्दाद पोक्ता ऐवज देऊन रवाना करून पाठवावें.' –पया ३८७. [झूद्‌तर्]

**जून**—पु. इंग्रजी वर्षाचा सहावा महिना. [इं.]

**जून**—वि. १ कोंवळेपणा गेलेला; निबर; राठ; पक्का झाल्या-मुळें कठिण झालेली (वनस्पति; फळें इ०). २ (लं.) दृढ; परि-पक्व; घट्ट (चांगल्या व वाईट अर्थी–समज, समजूत, बुद्धि). [जुना]

**जूफ**—न. अनेक खेळणारानीं चक्र्यावर उभें राहून प्रत्येकानें एकएक असे गलींत पैसे फेकावयाचे ज्याचा गलींत पैसा पडेल त्यानें गलीच्या बाहेर पडलेल्या (इतरांनीं सांगितलेल्या) पैशावर नेमका पैसा फेकून मारावयाचा व फेकलेले सर्व पैसे जिंकावयाचे अशा खेळांतील एक संज्ञा; याच्या उलट ताग.

**जूम**—पु. १ जुमान पहा. २ (कों.) गलवताकरितां काथ्याचे दोर वळण्याचें एक साधन; जूग.

**जूय**—स्त्री. (गो.) जुईचा वेल व फूल.

**जूरी**—स्त्री. पंच. [इं.]

**जूसर**—न. (कुलावा कों.) जोखड. –मसाप २.३.२५२.

**जूळ**—न. जुळें; दुहेरी वस्तु; जुळें पहा. –स्त्री. (प्रां.) एकत्र बांधणें; जुंपणें (दोन बैल इ०). (क्रि० घालणें). [सं. युगल]

**जृंभण, जृंभा**—नस्त्री. जांभई, जांभळी. (क्रि० घेणें). [सं.]

**जृंभणें**—अक्रि. (काव्य.) १ जांभई देणें. २ स्वस्थता पावणें. 'जी! जी! याहुनि लाभ काय? म्हणुनी भूपाळची जृंभला।' –आसी ५७. [सं. जृंभण]

**जृंभावात**—पु. ज्यामध्यें फार जांभया येतात असा वातरोग. [सं.]

**जे**—उभ. २ कीं; (हा शब्द पुढील विधानाचा दर्शक आहे). कारण कीं. 'जे सानुकूळ श्रीगुरु।' –ज्ञा १.७५. 'त्या पत्रांत मजकूर असा जे.' २ ज्यामुळें. 'कैसें वो तुमचें करण। जे पुढिलां एओ पाहे मरण।' –शिशु ८२०. [सं. यत्; प्रा. ज]

**जे**—अ. (अशिष्ट) सन्मानदर्शक उल्लेखाचा शब्द. जय शब्दाचा अपभ्रंश. 'जे देव! जे देव! जय मंगलमूर्ती.' [सं. जय]

**जे**—सना. (काव्य.) जी या स्त्रीलिंगी शब्दाऐवजीं. 'जे मातें वच्छानंदनी।' –ऋ १. 'चित्रें गदा महोग्रा गरगर फिरवूनि सोडिली जे गा।' –मोकर्ण ९.२६ –अ. १ पादपूरणार्थक अव्यय. २ अवधारणासूचक अव्यय; जेहेत्ते. [प्रा.]

**जें**—सना. कोणतें; संबंधी सर्वनाम तें याचें प्रतिस्वरूपी जो या पुल्लिंगाचें नपुंसकलिंगी रूप.

**जेआं**—सना. ज्या. 'पदे ठेवी जेआं वरियां।' –ऋ २२. [सं. यत्] ०**चेनि**–ज्यांच्या. 'जेआचेनि चरणे पुनैतु।' –ऋ १८.

**जेउता–ती–तें**—वि. जेथें; जिकडे. 'मग जेउती वास पाहिजे।' –ज्ञा ४.१९१. याचे उलट तेउता–ती–तें. २ जितकें; जेवढें. [सं. यावद्; प्रा. जेत्तिअ]

**जेका**—उभ. (काव्य.) कीं; (पुढील वाक्याचा दर्शक) का पहा. 'जेका लंका वसली नवती पै।' [जे+का–एकाच अर्थी]

**जेंगट**—न. १ झेंगट; तास वाजविण्याचें धातूचें घड्याळ; हातघड्याळ (कांशाचें). 'तंव जेंगट पीटीनिलें। मध्यरात्रीचें।' –शिशु १६९. २ भिक्षेकऱ्यांची वाजविण्याची थाळी; तास; जेंगट पहा. 'माथां सेंदुर दांत खाती। जेंगट हातीं सटवीचे।' –तुगा ४१६. ३ एक वाद्य. (विशेषतः देवळांतील). 'जेंगट मृदांग टाळ।' –दा २.७.२४. [ध्व.]

**जेगा**—न. डोईवरील (पागोट्याला बांधण्याचा) एक मर्दानी अलंकार. 'जेगा व शिरपेंच दिला' –ख ८.४०००. [फा. जीघा]

**जेगोपाळ**—उद्गा. संबोधन. जय गोपाळ! नमस्कार या अर्थी मारवाडी, वाणी, भाटे इत्यादिकांत रूढ.

**जेजाणें**—न. युद्ध; लढाई. झुंझणें पहा.

**जेजाल**—स्त्री. फिरवितां येण्यासारखी लांब नळीची बंदूक. 'रोखिले अघाडी जेजाला।' –ऐपो ११८. 'जेजाल जंबुरे बाण-करी बळवळ।' –राला १०१. [हिं. जंजाल] **जेजालन्दाज, जेजाल-बरदार**–पु. जेजाल उडविणारा, डागणारा. गोलंदाज. [हिं.]

**जेजावंती, जेजेवंती**—स्त्री. (प्र.) जयजयवंती. एक रागिणी

**जेंजाळ**—पु. त्रास; जंजाळ पहा.

**जेजे**—स्त्री. त्रास; श्रम; उपद्रव; यातायात; कंटाळवाणी गोष्ट. (क्रि० करणें; देणें; पडणें; पावणें; सोसणें).

**जेजेकार**—जयजयकार पहा.

**जेजेवंती**—स्त्री. एक फुलवेल.

**जेठ**—पु. (खा.) वडील दीर. १ (कुण.) ज्येष्ठ महिना. [सं. ज्येष्ठ; प्रा. जेट्ठ; सिं. जेठु]

**जेठ**—क्रिवि. (खा.) जेथें. 'दूर जागा पाहिला तुह्य वारा नाहीं जेठ।' –होला ५३. [सं. यत्र]

**जेठ, जेठ्या**—वि. वडील; ज्येष्ठ. –वदलापूर २९. [सं. ज्येष्ठ]

**जेठणें**—उक्रि. घट्ट, ताणून बांधणें; आवळणें. **जेटून बांधणें-धरणें**–जेठणें याचा रूढ प्रयोग.

**जेठवड, जेठोडी**—पु. ज्येष्ठ महिना. [सं. ज्येष्ठवत्]

**जेठा**—पु. गुडघे उभे करून बसल्यावर कमर व गुडघे यांच्या भोंवतीं वस्त्र गुंडाळून बांधतात तो प्रकार. (क्रि० मारून बसणें). 'जेठा घालून सभे बैसे।' –मुक्तेश्वर, मूर्खांचीं लक्षणें ५७. ०**मारून बसणें**–१ जेठा पहा. २ (ल.) उद्योग नसणें; आळशी बनणें.

**जेठा**—पु. कुसुंब्याचा काढलेला पहिला आणि गहिरा रंग. [सं. ज्येष्ठ; हिं. जेठा] ०**माल**–(व.) पहिल्या प्रतीचा, उत्तम माल.

**जेठाणी**—स्त्री. (खा. गु.) थोरली जाऊ. [सं. ज्येष्ठ; प्रा. जेट्ठ. स्त्री.]

जेठी—पु. १ मल्ल; पहिलवान; कुस्तीगीर. 'कोटि जेठी लागले। उचलितां भागले। त्रिंबकासी।' —मध्व ३७. २ ज्येष्ठ, श्रेष्ठ; वीर. 'मनोवेगीं पांडव जेठी।' —मुसभा ११.६९. [सं. ज्येष्ठ, म. जेठ]

जेठोडीं, जेठाडें—न. ज्येष्ठांत पडणारा पाऊस. [ज्येष्ठवड]

जेड—पु. (वे.) कोष्टी. [का. जाड]

जेडलां—क्रिवि. (चि.) जेव्हां. [सं. यावत्; प्रा. जेत्तिल]

जेडवळ, जेढोळ—क्रिवि. १ जोंपर्यंत; जेथपर्यंत; जितका-वेळपर्यंत. २ इतका वेळ, उशीरां. याच्या उलट तेढवळ. [जेवढा+वेळ]

जेणें—न. जिणें पहा.

जेणें—अ. ज्यायोगें; ज्यामुळें. 'जेणें सदकीर्ति वाढे।' —दा १.९.२. [सं. यत्; प्रा. ज; म. जे+एणें-एणेंकरून] ०करिं, करून—ज्यायोगें, मुळें. 'जेणेकरिं मि संसार तरे।' -पंच १.२७.

जेतव्य—वि. जिंकण्यास योग्य असा. [सं.]

जेता—वि. सर्वदा जिंकणारा; अक्षय विजयी; जयशाली. 'थोर आल्हाद जेत्यांचा।' —एरुस्व १२.८१. [सं. जेतृ]

जेताश्री—पु. (संगीत) एक राग. या रागांत षड्ज, कोमल ऋषभ, तीव्र गांधार, तीव्र मध्यम, पंचम, कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. आरोहांत ऋषभ व धैवत वर्ज्य. जाती औडुव-संपूर्ण, वादी गांधार, संवादी निषाद; गायनवेळ सायंकाळ. [सं.]

जेतुका-ला-लें—विक्रिवि. (काव्य.) जितका; जेवढा (परिमाणवाचक.) २ जितका (संख्यावाचक). 'असनिधानि जे जेतुलेनि क्षाळावे ते तेतुलेनि क्षाळी।' —चक्रधर सिद्धांतसूत्रें २६.८. [सं. यावत्; प्रा. (अप.) जेत्तुल]

जेतुलालें—वि. जितकें; जेवढें म्हणून. 'देखें जेतुलालें कर्म निपजे। तेतुलें आदिपुरुषीं जरी अर्पिजे।' —ज्ञा ३.२७१.

जेतूर—क्रिवि. (कु.) ज्यांत.

जेतृत्व—न. जय; विजयीपणा; जिंकण्याचें सामर्थ्य. [सं.]

जेथ—क्रिवि. (काव्य.) जेथें; ज्या ठिकाणीं; ज्या जागेवर (संबंधदर्शक). [जेथें] जेथचा, जेथला, जेथील—वि. ज्या जागेचा (संबंधदर्शक). जेथपर्यंत-पावेतों-वर—क्रिवि. १ जितके; ज्या जागेपर्यंत. जो पर्यंत; ज्या वेळेपर्यंत. [जेथें]

जेथु(थो,न, जेथने—क्रिवि. ज्या जागेपासुन (संबंधदर्शक)

जेथें—क्रिवि. जिथें; ज्या ठिकाणीं (संबंधदर्शक) 'जेथें नाहीं उत्तम गुण। तें करंटपणाचें लक्षण।' —दा १९.३.२७. [सं. यत्र; प्रा. जत्थ] म्ह॰ जेथें खावें (खातो, खातोस इ॰) तेथें हगावें (हगतो, हगतोस इ॰)=ज्यानें उपकार केला त्याचें नुकसान करणें. ०कोठें—क्रिवि. जेथें जेथें; ज्या, कोणत्याहि ठिकाणीं. ०तेथें, जेथूनजेथून—क्रिवि. सर्वत्र; सर्व ठिकाणीं. 'निराश्रई पडे उघडा। जेथें तेथें।'

जेद्वा—विवि. (कों.) जेव्हां; जेधवां पहा. 'वांटणी जेदवां झाली तेदवां कोलो काय म्हणता' —लोक २.५७. [सं. यदा]

जेदीस-दुस—क्रिवि. (गो.) ज्या दिवशीं. [जे=जो+दीस=दिवस]

जेधवळ, जेधोळ—क्रिवि. जेढवळ; जेवढा वेळ. [सं. यावत्-काल]

जेधवां—क्रिवि. (काव्य.) जेव्हां; ज्या वेळेस. 'नातरी जेधवां जियें ठायीं।' —ज्ञा ९.३५४. [सं. यदा]

जेन—न. १ बुरणूस; लोंकरीस खळ इ॰ लावून केलेलें एक वस्त्र. २ (व.) निजावयाची गादी. ३ (ना.) लेप, रजई. [जीन] जेनाच्या पदरीं गांठ देणें-मारणें—अशक्य काम करण्याचा प्रयत्न करणें. ०बुद्धि—स्त्री. बुरणसबुद्धि; (ज्याप्रमाणें बुरणसाला सुईनें पाडलेलीं भोकें बुजून जातात, त्याप्रमाणें एखाद्याच्या बुद्धीवरील झालेले संस्कार तेव्हांच नाहींसे होतात; त्यावरून); जडबुद्धि, स्थूलमति. —वि. मूर्ख, जड.

जेपाळ—पु. जयपाळ. एक औषधी वनस्पति. याच्या बीस जमालगोटा म्हणतात; ही तीव्र रेचक असून विंचवाच्या विषावर उगाळून लावतात. कोंकणांत हीं झाडें होतात. [सं. जयपाल] म्ह॰ जेपाळाची मात्रा आणि वैकुंठीची यात्रा. जेपाळाचा ढाल—पु. १ मोठा रेच. २ (दंतकथेवरून व व्याजोक्तीनें) सर्वौषधी चूर्ण; त्रैलोक्य चिंतामणी; प्रत्येक रोगावरील औषध; बहात्तर रोगावर रामबाण.

जेफा—वि. (कु.) फाजील; जास्त. जाफा पहा. [जाफा]

जेब—पु. खिसा. 'बडोद्यावर जाणें दोन दिवस तहकूब करावें, तें आपलें जेबांत आहे.' —मदवा १.३०. [फा. जेब; का. जोब.]

जेब—वि. ठार. (क्रि. करणें). 'मग म:ाय्य एक शहरांतून धरून आणून तोफेवर जेब केले.' —भाव ४०. [फा. जर्ब].

जेब-व-जीनत—स्त्री. शोभा. 'त्यांचे येण्यांत रौनक अधिक होईल; जेब व जीनत येईल' —रा ७.१९४. [फा. झेबू=अलंकार; फा. झीब-व-झीनत्]

जेमते,(ते)म—क्रिवि. कसें तरी करून; पराकाष्ठेनें; मोठ्या कष्टानें. (यामध्यें केलेल्या कामांत अपूर्णता तरी असते किंवा पूर्णता असली तर करणाराला निदान फार श्रम पडलेले असतात). 'विद्यार्थीही .जेमतेम करून तेवढी यातायात, करतात.' —नि १७७. 'सकाळीं निघाला तर जेमतेम तीन कोस जाईल.' [हिं. गुज. जेमतेम=जसेंतसें]

जेमन—न. जेवण. 'नेणें तृप्तिस कामधेनु कवण्या पावेल कीं जेमनीं।' —मोकृष्ण २०.५८. [सं.]

**जेय**—वि. जिंकण्यासारखा; वश करून घेण्यासारखा; हस्तगत करण्यासारखा. [सं.]

**जेया**—सर्वनाम. (काव्य) ज्याला; जया पहा. 'देखत देखतां आत्मघातु। घडला जेया।' —ऋ ८.

**जेर**—वि. १ कमी प्रकारचा, योग्यतेचा; अशक्त; लेचापेचा. २ हतवीर्य; दमलेला; भागलेला; थकलेला; त्रस्त; हैराण (आजार, दारिद्र्य इ० नीं). (क्रि० होणें, आणणें). 'पडश्यानें त्याला भारी जेर केलें.' ३ चीत; पराभूत; निर्बल. 'त्याशत्रूखालीं तो जेर आहे.' ४ हस्तगत. 'तें स्थळ जेर करावें.'—सभासद ५६. [फा. झेर्] **जेरकडी**—स्त्री. लगामाची कडी. ०जप्त—वि. हस्तगत; स्वाधीन. 'पाण्यांत गड वसविले म्हणून ते दर्या जेजप्त आहे.'—चित्रगुप्त ८७. ०जबर-जबरी—वि. १डाव्या अंगाचा जबर व उजव्या अंगाचा जेर अशा संकेतानें खेळण्याचा गंजिफांचा एक खेळ. २ दुर्बल, सबल 'त्यास कळों न देतां विघाड करावा; मग जेर-जबर कोण किती तें पहावें' —गोखंचिशाव ८०. ०जबरी—स्त्री. (चुकीनें) जोरजबरी; जुलूम. ०दस्त—वि. १ जेर अर्थ १ पहा; दीन; गरजु; २ कमजोर; दुर्बल. 'तिकडून इराणचे शाहानें जेरदस्त केलें.' —इमं २६०. याच्या उलट जबरदस्त. ३ जेरजबर-री पहा. ४ काबीज; जेरजप्त. 'ममताई देशपांडीण इणें तमाम प्रगणा जेरदस्त केला.'—भजनीमारूड, अर्जदास्त. पृ. ७. [फा.] ०दस्ती—स्त्री. १ विपन्नावस्था; दुर्बलता. २ गंजिफांचे खेळांतील एक संज्ञा. [फा.] ०वार—वि. त्रस्त; हैराण. 'तेथें जाऊन व्यर्थ जेरवार व्हावें, वरकड अर्थ नाहीं.'—दिमरा १.२८७. [फा. झेर्वार]

**जेरबंद**—पु. घोड्याच्या पुढल्या पायांतून घेऊन तंगांतून काढून वर म्होरकीच्या कडीस बांधावयाचा चामडी पट्टा; हा सरोसरांत ओंवलेला असतो. या बंदाचा उपयोग जीन आंवळून धरण्याच्या व एखाद्यास मार देण्याच्या कामींहि होतो. 'प्राणी राजदंड पावत। जेरबंद चाबुक वेत।' —दा ३.७.६३. [फा.] म्ह० १ जें न निघे संबंधीं ते निघे जेरबंदीं; २ घोडा जेरबंदीं मनुष्य संबंधीं (ओळखावा-समजावा-जाणावा). (एखाद्यावर) ०उडविणें—जेरबंदानें मारणें. 'ती रांड सुरळीत बोलत नाहीं याजकरितां चार जेरबंद मारिले पाहिजेत.' —ख ७.३७५३. [फा. झेरबंद्]

**जेरबाकी**—स्त्री. न उकळलेली, वसूल केलेली बाकी.

**जेरी**—स्त्री. दुर्बलता; पडती; हैराणी. 'फिरंगी यांची जेरी, श्रीमंतांची जबरी असें सोमवारच वर्तमान आहे.' —रा ४.९८. [जेर]

**जेरी नारळ**—पु. एक प्रकारचा नारळ; जहरी नारळ पहा.

**जेल**—पु. तुरुंग; कारागार; बंदिशाळा; कैदखाना [इं.]

**जेलर**—पु. तुरुंगावरील मुख्य अधिकारी. [इं.]

**जेवटा**—पु. जेवण. 'मांडिला गोपाळीं जेवटा। ग्रास घेती मटमटां।' —कथा ४.५.४. [सं. जेमन]

**जेवडें**—न. म्हसरें; टोणगें. —शर. [जिवडा]

**जेवढा**—वि. १ जितका मोठा; जितका. २ जितका (संख्यावाचक); याच्या उलट तेवढा. ३ जो; कोणता (पुष्कळांपैकीं); प्रत्येक; जो कोणी. 'या मुलांमध्यें जेवढा पहावा तेवढा शाहणा.' एवढा पहा. [सं. यावत्; प्रा. जेवड]

**जेवण**—न. १ भोजन; खाणें; अन्न भक्षण करण्याचा व्यापार. (क्रि० जेवणें; करणें). २ जेवणाचे पदार्थ; वाढलेलें अन्न. ३ आहार; खाण्याचें प्रमाण. [सं. जेमन. पं. जेंउणा] ०कार—पु. (कु.) श्राद्धाच्या दिवशीं पितरांच्या नांवें जेवावयास बोलाविलेला मनुष्य (हा शब्द ब्राह्मणेतरांत रूढ आहे). ०खाण, जेवणें खाणें—न. १ अन्न; खाद्य; खाण्याचे पदार्थ. २ (सामा.) भोजन; खाणें. 'त्याच्या घरीं जेवण्याखाण्याची सोई नाहीं.' ३ खाण्यापिण्याचा व्यापार. 'आमचें जेवणखाण आटपेतों अजून चार घटका लागतील.' ०घर—न. १ (कों.) घरांतील भोजनाची जागा; स्वयंपाकघर. 'ती जेवणघरांत गेली' —बाळ. २ हॉटेल; खाणावळ. सन १८५३ सालीं मुंबईस हिंदूंच्या फराळाच्या दुकानांस जेवणघर म्हणत असत. ०रात्र—स्त्री. (व.) जेवणाची वेळ होण्याइतकी रात्र; सुमारें ८।९ वाजण्याची वेळ. जेवणवेळ पहा. ०वत—न. जेवण्याच्या उपयोगाचें पान (केळ वगैरेचें). 'केळीची डांग मोठी असली तर चांगलीं पांच जेवणवतें होतात.' [जेवण+पत्र] ०वार—पु. ज्या दिवशीं उपवास करावयाचा नसतो असा दिवस, तिथि. [जेवण+वार] ०वेळ—स्त्री. भोजनकाल. थोरली जेवण वेळ=रात्रीं ९ वाजतां. धाकली जेवण वेळ=सकाळीं ७ वाजतां.

**जेवणाईत**—पु. १ जेवणारा माणूस २ पंगतीस घेतलेला आश्रित.

**जेवणावळ**—स्त्री. १ मेजवानी; भोजनसमारंभ. (क्रि० करणें). २ जेवण्याबद्दलचा खर्च. ३ (मुंबईस, जुन्या काळीं) जेवणघर; खाणावळ; हॉटेल. [जेवणें]

**जेवणा, जेवणिआ**—वि. (खा. व.) उजवा (हात). 'तो ओळगिजे जेवणिजे भुज।' —शिशु ३६०. [जेवण करण्याचा हात म्हणून उजवा]

**जेवणी**—स्त्री. १ धान्य मळणारे मजुर, नोकर यांच्या मजुरीबद्दल दिलेलें धान्य; शिधा. 'गावात कार्ये प्रयोजन जाहाल्यास नारळ पानविडा जेवणी घ्यावी' —मसाप २.१७११. २ तोंड; मुख; जिवणी. 'जेवणी लहान.'—मराठी ६ वें, पुस्तक पृ. ३०४. (आवृ २) जिवणी पहा. [जेवणें]

**जेवणें**—अक्रि. १ खाणें; भोजन करणें. कधीं कधीं या क्रियापदाला कर्म असतें तथापि त्याचा संबंध कर्त्याशींच असतो. उ० 'मी भात जेवलों, भाकरी जेवलों.' २ (ल.) फळ चाखणें; भोगणें (एखाद्या बऱ्यावाईट कृत्याचें); अनुभवणें; परिणाम भोगणें. 'पूर्वी दुष्कर्मे केलीं त्यांचें फळ आतां जेवतों.' ३ लांच घेणें.—न.

(राजा.) देवळांतील जेवणावळ. [सं. जेमन; पो.जि. जलार; फ्रेंजि. जमार; गु. जमन; पं. जेउणा; हिं. थेवना] (वाप्र.) **जेविता ठाव टाकणें**–पुढचें ताट ढकलून देणें; पानावरून उठणें. 'जैसें लक्षभोजन होता पाही। तयामाजी अंत्यज जाई। मग ब्राह्मण उठती लवलाही। जेविता ठाव टाकूनि।' **जेवूं घालणें**–१ खावयास देणें; पोषण करणें. २ वाढणें; अन्न पुढें ठेवणें. **जेवून सेवा गोड**– जेवण झाल्यानंतर मग नौकरी वगैरे बरी वाटते. (**दोहोंकडून**) **जेवणें**–एखाद्या कामांत दोन्ही पक्षांकडून पैसा घेणें किंवा एका पक्षाकडून पैसे (फी) घेऊन दुसऱ्या पक्षाकडून लांच घेणें (वकिलांसंबंधीं योजतात). म्ह० १ जेवीन तर दुधाशीं (तुपाशीं) नाहीं तर उपाशीं=मी म्हणेन तसें नाहीं तर मुळीच नाही. २ रांधावें तसें जेवावें, करावें तसें पावावें. सामाशब्द–**दुसऱ्याच्या तोंडानें जेवणारा**–वि. १ दुसऱ्याचें बोलणें ऐकून घेऊन तेंच पुन्हां बोलणारा. २ स्वतःच्या मतानें कांहीं न करणारा; दुसऱ्याच्या तंत्रानें वागणारा. **जेवण्या**–पु. (कों.) गलबतावरील जेवण करणारा. **जेवतागण**–वि. १ केवळ जेवण्याच्या कामाचा (माणूस). २ (ल.) विन कामाचा पण खादाड (माणूस); फुकटखाऊ; भोजनभाऊ. 'तो काडीमात्र उपयोगी नव्हे, आपला जेवतागण आहे.' [जेवणें+गण] **जेव्या**–वि. जेवणाचे वेळीं हजर असणारा; भोजनभाऊ. जेवतागण पहा. [जेवणें]

**जेवा**—पु. १ जेवण; खाणें; भोजन. 'आजचा जेवा तर बाहेर पडला उद्याची बात उद्या.' २ जेवण्याचा कोरडा शिधा, सामुग्री (धान्य, पीठ इ०). पूर्वी हलक्या सरकारी नोकरांना गांवकऱ्याकडून असा सिधा मिळे. 'सरकारचा शिपाई आला तो जेवा घेऊन गेला.' ३ अन्नखर्च; भोजन; जेवणखर्च (चाकरांचा). 'नाहीं वेठी जेवा सारा।'–तुगा ३६०. ०**पाडणें–साधणें–काढणें**– जबरीनें जेवण मिळविणें. [जेवणें]

**जेवीं**—क्रिवि. (काव्य.) जसें; ज्याप्रमाणें; ज्या रीतीनें. 'कृतकृत्य होय तवयुत जेंवि पिता अर्पितां वरीं दुहिता.'–मोकर्ण ७. ३३. [सं. यथा] ०**ते(विं)वीं**–क्रिवि. जसें असेल तसें; चांगलें किंवा वाईट; कसेंवसें; हरप्रकारें. 'कल्याणार्थ मुनेनें सासूनें जेविं तेविं सोसावें।'–मोअनुशासन ७.१८. [सं. यथातथा]

**जेव्हढा**—वि. (प्र.) जेवढा पहा.

**जेव्हां**—क्रिवि. १ ज्या वेळेस; ज्या समईं; जधीं. २ ज्या अर्थीं; जर; ज्या कारणास्तव; असें पहातां. 'आम्हाला जेव्हां तो मारणार तेव्हां आम्हास जाता नये.' [सं. यदा; प्रा. जाहे] ०**कधीं**–क्रिवि. कधींकाळीं; केव्हांं तरी; एखाद्या समयीं; जेव्हां-तेव्हां. (असल्याच प्रकारचें दुसरें रूप केव्हां कधीं. परंतु एव्हां-कधीं, तेव्हांकधीं अशीं रूपें होत नाहींत). ०**तेव्हां**–क्रिवि. सदोदित; नेहमीं; प्रत्येक वेळेस; सतत. 'जेव्हांतेव्हां नको येऊं एकवेळ केव्हां तो ये.'

**जेष्ठ, जेष्ठमध, जेष्ठवड**—ज्येष्ठ इ० पहा.

**जेसणा**—वि. जसा; जेवढा; जितका. याच्या उलट तेसणा. 'जो तूं जेसणा जैसा। तो तूं तेसणा तैसा'–गीता १.३६ [सं. यादृश. जैसेनि?]

**जेह**—स्त्री. जई पहा. **जेंहीं**–ज्यांनीं. 'जेंहीं शोधून पहिला।'–दा १.९.१२.

**जेहन–नशी(सीं)न**—वि. श्रुत; माहूम. 'अक्षरशः मजकूर नवाब सम्सामुद्दौला बहादूर यांसी पत्रें वाचून दाखवून जहननसीन केला.'–रा १.११४. [फा. झिहन्–नशीन्]

**जेह(हे)पटी**—स्त्री. मोकळे केस; वेणीची वट; झिपरी; झेपटी, झिपटी पहा.

**जेहेत्ते**—वाप्र. जे आहे ते (पुराणिक, हरिदास यांच्या तोंडी अवधारणाबोधक प्रयोग); जे पहा.

**जै**—स्त्री. भिंत व छप्पर यांमधील जागा; (कांहीं पदार्थ ठेवण्यासाठीं) भिंतीच्या शेवटावरील जागा; वळचण. जई पहा.

**जै**—स्त्री. (क.) निजणें; झोंपणें (मुलांत रूढ). जोजो गाई पहा. 'गंगू, जै करूंया, चल.'

**जै. जैं, जैअ**—उभ. (काव्य.) जर; ज्यापक्षीं.–क्रिवि. १ जेव्हां; ज्यावेळेस. याच्या उलट तैं, तैं. 'जैं जसोदां भेडाविला।'–दाव ५२. 'जैं कहीं दैवें। अनुभविलें फावे।'–ज्ञा ६.३१७. २ (गो.) जेथें; जेथून.

**जैकार**—पु. जयजयकार. 'हैकार थैकार जैकार। तळप चवरें चमत्कार।'–माराकिष्किंधा ९.४४. [सं. जय+कृ]

**जैत, जैत्य, जैत्र**—पु. जय. 'तैसें हृदय जिंकतां ग्रहें। पडिले जैताचिये कुटे।' –अमृ ७.१५४. 'रुद्रसुतावांचोनि जैत। येन आम्हां।'–कथा २.३.११९. 'एका जैत्य एका हारी।'–एरुस्व १३.६४. [सं. जेतृत्व] ०**वादी**–वि. विजयी. 'रणीं जैतवादी जाला। यादव नरेंद्र।'–शिशु १०८४.

**जैन**—पु. १ भारतांतील एक प्राचीन धर्म; याचा संस्थापक महावीर. २ जिनमतानुयायी; जैन धर्माचा माणूस. हे वेदप्रामाण्य मानीत नाहींत; यांच्यांत अहिंसा फार कडक प्रकारें पाळतात.

**जैनचैन, जैनमैन, जैनसैन**—विक्रिवि. जईनचईन पहा.

**जैपाळ**—पु. जेपाळ पहा.

**जैफ, जयफ, जईफ**—वि. (व.) म्हातारा; वुड्ढा; अशक्त. 'फकीर जैफ झाला.' [अर. झईफ्] **जैफी, जयफी**–स्त्री. म्हातारपण. 'जयफी नवाबाची.'–रा ५.८०. [फा. झईफी]

**जैमिनी कानडा**—पु. (संगीत) एक राग; यांत षड्‌ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत,

कोमल निपाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण–संपूर्ण, वादी ऋषभ, संवादी पंचम, गानसमय मध्यरात्र.

**जैयत**—वि. जय्यत. १ तयार; सज्ज; सिद्ध. २ हत्यारबंद; कधीं कधीं जैयत तयार–असेंहि म्हणतात.

**जैत्य**—वि. जिंकण्यास योग्य; जिंकण्यासारखा; वश होण्यासारखा. [सं.]

**जैल**—पु. मायना; सदर. [अर. झील्]

**जैसा–सी–सें**—वि. (काव्य.) ज्या प्रकारचा. जसा–सी–सें पहा. [सं. यादृश; प्रा. जइस]

**जैसीताराम, जैसीराम, जैसीरामबाबाजी**—जयसीताराम, जयश्रीराम, जयसीताराम बाबाजी, हे शब्द वैराग्यांना नमस्कार करितांना योजतात. [हिं.]

**जो**—सना. पुल्लिंगी संबंधी सर्वनाम; तो या शब्दाचा पूर्वगामी शब्द. [सं. यत्; प्रा. ज] **जो उठला तो, जो पहावा तो**–प्रत्येक माणूस; प्रत्येकजण.

**जो, जों**—अ. जंव; ज्या वेळेस; जेव्हां; हें अव्यय कोणत्याहि कृत्याचा जलद परिणाम, चापल्य, त्वरा दाखवितें. या अव्ययाचीं जो या सर्वनामाप्रमाणेंच जी आणि जे अशींहि रूपें होतात. उदा॰ 'जो टोला मारला तों लागलेच दोन तुकडे केले.' 'जी धाव मारली तों तेथें पोंचलों.'

**जों**—क्रिवि. १ जोंपर्यंत; ज्या काळापर्यंत; जेथपर्यंत. २ पावेतों; पर्यंत. ३ ज्या काळीं, अवचीत; ज्या क्षणीं. [सं. यावत्]

**जोइ(ई)स**—न. १ जोतिःशास्त्र. २ भाकित; भविष्य. ३ गणित. [सं. ज्योतिष; प्रा. जोइस] **जोइसी**–पु. जोशी. [सं. ज्योतिषी, ज्यो–ज्यौतिषिक; प्रा. जोइसिअ]

**जोक(ख)ड**—न. १ जुखड; जूं; बैलाच्या मानेवरील दोन लांकडांपैकीं एक; शिळवट; जोतें. २ (कों.) (उंसाचा चरक) चरकाचा आडवा दांडा; याच्या एका टोकाला पाटीवर नवऱ्याचें डोकें व दुसऱ्या टोंकाला शेलें असतें किंवा तें ओढकाठीला जोडलेलें असतें. ३ (ल.) काळजीचें ओझें. ४ (ल.) अधेलें, अजगर वगैरे जातीचा प्रचंड साप. [सं. युग, योक्त्र]

**जोकाड**—न. (कु.) जोकड पहा.

**जोकी**—(कों.) माशांची एक जात; हे दिवाळीच्या सुमारास पकडतात.

**जोक्तर**—स्त्री. वेश्याव्यवसाय करणारी घेरडीण. –गुजा ९.

**जोख**—स्त्री. जळू (प्राणी). [सं. जलौका; हिं. जोक]

**जोख**—न. १ भार; वजन. 'सहस्रखंडिकाप्रमाणें जोख।' –मु १२.१९१. २ मेज; तुला; तुलना; जोखणें (क्रि॰ करणें). ३ (राजा.) माप; निश्चित आकार; भार. 'आला जोख उणा म्हणोनि वरता नंदीग्राही ठेविला।' –निमा १.४३. ४ प्रमाण; मान. 'तूं आपल्या पायाचें जोख दे म्हणजे जुतें करून आणील.' [सं. जुष्] **जोखणी**– वि. १ जोखणारा. 'वैश्य तुला धरि वाणी। सत्य वाचा सत्य जोखणी।' –एभा १२.८९. २ मापन; तुला. **जोखणें**—उक्रि. १ माप, वजन करणें. २ (ल.) अजमास करणें; अजमास काढणें; परीक्षा पहाणें; (पदार्थांतील) तत्त्वांचा तर्कानें जाणणें; तुलना करणें. –अक्रि. फायदा होणें; मिळणें; पदरांत पडणें. 'तुला या कज्ज्यांत भांडून काय जोखतें?' [हिं. जोखना] ॰**माप**–न. वजनाचें प्रमाण; वजन केल्यानंतरचें माप. **जोखी**–वि. १ वजनी; वजनाचें (लांबीच्या किंवा कैली मापाच्या नव्हे–माप). २वजन केलेलें, ठरविलेलें. **जोखीव**–वि. वजन केलेलें; वजनानें ठरविलेलें. 'हें तूप जोखीव शेरभर आहे कीं मापी आहे.' [जोखणें]

**जोख(खी)म, जोखींव**—नस्त्री. १ धास्ती; भय; संकट. २ धोका; धोक्याचें काम; जिवावरचें काम; अचाट किंवा साहसाचें काम; परिणामाची चिंता. ३ धोक्यांत घातलेली वस्तु; धोका येईल असें द्रव्य, माल. 'हे हजार रुपये न्या म्हणतां पण वाटेनें आम्ही दुसऱ्याचें जोखीम नेत नाहीं.' ४ (क.) कोणत्याहि कामामध्यें आलेला तोटा, कमतरता (पैशाची इ॰). ५ जबाबदारी; हमी. [हिं. जोखिम] ॰**उठविणें**–अंगावर धोक्याचें काम घेणें; साहस करणें. **जोखमी**–वि धोका असणारें; संकटाचें.

**जोखा**—स्त्री. बाई; स्त्री. [सं. योषा]

**जोखाई**—स्त्री एक क्षुद्र देवी. 'नव्हे जाखाई जोखाई।' –तुगा ७९१.

**जोखी**—स्त्री. (राजा.) सणकाडी.

**जोखीण**—स्त्री. जळवा लावण्याचा धंदा करणारी स्त्री. [जोख=जळू]

**जोग**—पु. १संन्यास; संसारत्याग; कुटुंबपरित्यागपूर्वक वैराग्य; (क्रि॰ घेणें). 'एका पोटासाठीं जोग।' –तुगा ३४१६. २ हठयोग; योगाभ्यास; योग; चित्तवृत्तिनिरोध; समाधि. (क्रि॰ घेणें). 'हरी येथेंचि जोग आचरावा।' –नव१७.१३२. [सं.योग] ॰**भरणें**–१ मुरलीची पाटी अन्नानें भरणें (हा पूजेचा एक प्रकार आहे). २ जोगिणीची दीक्षा घेणें; जोगीण बनविणें. **जोगडा**–पु. (निंदाव्यंजक) वैरागी; गोसावडा; जोगी; योगी. 'जावोनी धरितांच ते म्हणतसे सोडी मला जोगड्या।' –उमाविलास ९. **जोगड्याचें भात**–पुन. एका जातीचें भात. **जोगणी**–स्त्री. भिक्षापात्र; तुंबा. **जोगणीमागणी**–स्त्रीअव. १ ज्येष्ठी अमावास्येच्या दिवशीं शिवेवर जाऊन जो विधि करावयाचा असतो त्यासंबंधी दोन देवता. वाराबलुत्यांपैकीं दोघांस त्या दिवशीं या संज्ञा लावतात. २ संतिणी; जोगणी. नवरात्रामध्यें या भिक्षा मागण्यास येतात. **जोगण्या बांधणें**–(व.) मंत्रसामर्थ्यानें भीति घालविणें. 'वाघ दिसला नि तो न्याला, म्हणून त्याच्या जोगण्या बांधतात.'

**जोगण्या लावणें**–(व.) भीति, दहशत बसणें. 'वाघाच्या जोगण्या लागल्या त्याला.' **जोगती**–पु. १ हिंदु जातीचा हिजडा. २ कर्नाटकांतील यल्लम्मा देवीस वाहिलेल्या व्यभिचारोत्पन्न महारांच्या पोटीं ज्याचा जन्म झाला आहे असा.' –अप्रष्ट ३४.

**जोगडा**—स्त्री. ज्वारीची एक जात. –शे ९.११७.

**जोगता, जोगा**—वि. १ (कांहीं एका क्रियेविषयीं) योग्य. हा शब्द अशा अर्थानें सुटा येत नाहीं, धातूंच्या आया, आवया प्रत्ययांत रूपास जोडून याचा प्रयोग होतो. उदा० 'तो पुरुष धायाजोगता आहे.' 'तो गांव पहावयाजोगता आहे.' २ (विवक्षित पदार्थास) अनुरूप; साजेसा. 'पायाजोगता जोडा.' 'अंगाजोगता अंगरखा.' [सं. योग्य; प्रा. जोग्ग]

**जोगतिणी–तीण**—स्त्री. १ जोगवा मागणारी स्त्री. २ योगेश्वरी (यल्लमा) देवीची किंवा कर्नाटकांतील समजुतीप्रमाणें परशुराममाता रेणुका हिची भक्तीण. ३ मंत्रतंत्र जाणणारी भिकारीण, संतीण. 'एका जोगतिणीच्या सांगण्यावरून तिन्हीसांजा गांवविहिरीपाशीं रमाकाकूनीं गुलालानें माखलेला भात... नेऊन टाकविला.'

**जोगम्मा**—स्त्री. गवाळी आणि घाणेरडी स्त्री, मुलगी; गोसाव्यासारखे केस सुटलेली आणि अंगास राख फासलेली पोरगी; मामलभटीण; हिडधी. [जोगी+अम्मा]

**जोगलणें**—उक्रि. (राजा.) मदत करणें; सांभाळणें; हात देणें; आधार देणें (आजारी किंवा अशक्त माणसास). [सं. योग=मदत+लावणें]

**जोगली**—स्त्री. (कर्ना.) मातीचा ल्हानसा परळ, थाळी (जेवण्याची). ठाणें जिल्ह्यांत जोगल्या असें पुल्लिंगी रूप आढळतें. –बदलापूर ६५. [जोगणें]

**जोग(गा)वण–वणी–वणूक**—स्त्री. १ निर्वाह; पोषण, गुजारा. 'प्रतिश्रेष्ठें अनुसरोनी। बाहीर करि जोगावणी।' –रास २.६०९. २ गमणें; आळस; दीर्घसूत्रीपणा; रेंगाळणें; सुस्तपणा. ३ ढकलपट्टी; चालढकल. ४ (क.) काळजीचें संरक्षण; निगा. 'त्यांच्या जोगवणीस कसलीहि उपमा साजत नाहीं.' –नि ५६. ५ निर्वाहापुरते जिन्नस. ६ (गो.) जोगवण=शेतांतील एक दैवकृत्य. [जोग+वण प्रत्यय]

**जोग(गा)वणें**—अक्रि. १ काम करतांना गमणें; आळसानें काम करणें; दीर्घसूत्रीपणा करणें; रेंगाळणें. २ (ल.) चांगल्याप्रकारें चालणें; त्रास न होतां सुखमपणें निर्वाह होणें. 'रानांत गवत झाल्यापासून गायी जोगावून येऊं लागल्या.' ३ चालढकलीनें, युक्तीप्रयुक्तीनें, खुट्ट रुट्ट चालणें; कसा तरी वेतासवात होणें (संसार, प्रपंच). 'आमचा संसार २ हजार रुपयांत जोगावतो.' ४ भरभराट होणें; चांगलें चालणें; फोफावणें; पुष्ट होणें (प्राणी, वनस्पति). 'जोगावलों पोटीं खर। पाठी भार वरि नाहीं।' –तुगा २३५४. ५ पुरेसें होणें; काम भागणें. 'तांदूळ उद्याचे दिवशीं जोगा वेल.' ६ तृप्त असणें. 'आलोचूं जो नेणे। अनुभवचि जोगावणें।' –ज्ञा १३.३६३. [योग]

**जोगवा, जोगेश्वरी**—पु. देवीच्या नांवानें पांच घरें मागितलेली भीक; देवीचे उपासक, पीडितजन 'जोगवा' म्हणून अशी भिक्षा मागतात. म्ह० देगेवाई जोगवा म्हटल्यानें कोणीहि देत नाहीं. (क्रि० मागणें). **जोगवेकर–करी–करीण**–पुस्त्री. जोगवा मागणारा–री.

**जोग(गा)विणें**—सक्रि. १ काळजी घेणें; चांगलें पोषण करणें; वाढवणें (विशेषतः प्राणी). २ गरीबीनें पोसणें, वागविणें; मध्यमरीतीनें पोषण करणें; मीटभाकरी देणें; कसें तरी गुजराण करणें. ३ (ल.) संपादणा करणें; कसेंबसें उरकणें; पार पाडणें. 'पूजितीं दैवतें जोगावी।' –ज्ञा १३.७९५. 'ऐसा एकलाचि आघवें। जोगावी जो।' –ज्ञा १३.८२०. या क्रियापदाचे सकर्मक व अकर्मक हे अर्थ एकमेकांविरुद्ध आहेत; परंतु पहिला अर्थ अधिक प्रचारांतील आहे. [सं. योग; प्रा. जोग]

**जोगा–गें**—वि. योग्य; सारखा; जोगता पहा. 'हा प्रसंगु असे तुजचि जोगा।' –ज्ञा १५.६७. [सं. योग्य; प्रा. जोग्ग; पं. जोग, जोग्गा; सिं. जोगु; हिं. गु. जोग]

**जोगिया**—पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, कोमल ऋषभ, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, तीव्र निषाद हे स्वर लागतात. आरोहांत गांधार व निषाद वर्ज्य, अवरोहांत गांधार वर्ज्य; वादी षड्ज, संवादी मध्यम. गानसमय प्रातःकाळ.

**जोगी**—स्त्री. एक रागिणी; असावरीची एक जात.

**जोगी**—पु. १ गोसावी; वैरागी; संन्यासी. 'जग जोगी जग जोगी। जागेजागे बोलती।' –तुगा ३२६. २ एक प्रकारचा साप, याच्या अंगावर मर्कट पट्टे असून हा फार विषारी असतो. ३ (कु.) दुध्या भोपळा. [सं. योगी; प्रा. जोगी] म्ह० १ जोग्यानें जोडलें आणि कुत्र्यानें खाल्लें. २ नवा जोगी आणि गांडभर जटा=थोडें काम करून फार गर्विष्ठ बनणारा. **जोगिडा**–पु. खसखशीचा रोगट व पिवळा दिसणारा रोपटा. –कृषि ३०४.

**जोगीण**—स्त्री. १ जोग्याची बायको. २ देवीची भक्तीण; जोगी झालेली स्त्री. ३ नाचणी धान्याची एक जात.

**जोगें**—न. एक जातीचें भात. जोगड्याचें भात.

**जोगेटा**—पु. (कों.) (निंदेनें) १ जोगी; वैरागी. २ जोगी नांवाचा साप. [सं. योगी]

**जोगेश्वर**—पु. (ल.) बैल. –मनको

**जोग्या**—पु. कुस्तींतील एक पेंच; काखेखालीं हात घालून वर उचलावयाचें व पुन्हां खालीं दाबावयाचें. (क्रि० भरणें).

**जो(जों)जार**—पु. १ कुटुंबादिरूप मोठा संसारखटला, मंडळी, पसारा, व्याप (मोठा त्रासदायक व पोसण्यास कठिण). 'जोंजार प्रसवलासि वहुवसु।' –ऋ ३२. 'नसोनि कांहीं जोजार। संन्यासाश्रम शुद्ध सार।' –निमा १.१६७. २ (ल.) बोजा; त्रास; जंजाळ; भार; कष्ट; ओझें. 'तरी जन्मौनि जोजारु साहिजे।'–ज्ञा ४.३४. कर्जाचा–कुटुंबाचा–घेण्यादेण्याचा इ० जोजार. (व.) जोजवार. ३ कटकट; त्रास; कष्ट; खटपट. 'कासया करिसी जोजार।' –दा ३.१०.४८. म्ह० ज्याचा भार त्याला जोजार. **जोजारणें, जोजावणें**–अक्रि. १ मोठें कुटुंब, खटला असणें; त्याच्या जवाबदारीखालीं वांकून जाणें. २ त्रासणें; कष्टणें. 'प्रलयकालीं जोजावलासि।'–कथा ७.७.१४६.

**जोजारी**—वि. कुटुंबभारानें त्रासलेला; मोठें कुटुंब असलेला.

**जोजो**—उद्गा. १ लहान मुलांस निजवितांना म्हणावयाचा शब्द. अंगाई. 'जो जो जो जो रे कुळभुषणा, दशरथ नंदना, बाळा जो जो रे।' –स्त्री. लहान मुलांची निद्रा; गाई. (क्रि० करणें.). निजावयास जाणें, निजणें, झोपीं जाणें (लहान मुलें.). [ध्व.] ०करणें–(बालभाषा) निजणें; झोंपणें.

**जोट–ठ**—पु. भरभरीत व जाडें सुती कापड; पांचरावयाची खादीची पासोडी; सुती शेला; शेल्यासारखें वस्त्र. 'एकवर्णी तंतू नानावर्णी पट। कोण्ही जोट शेले पगड्या।' –मध्व ५४१. [सं. जटा; हिं. जूट]

**जोट–ठ**—पु. (मावळ) मळईची जमीन. [हिं. जोत]

**जोटा**—पु. पोत्यांत माल भरून तोंड बंद केल्यावर त्याच्या वर उलट बाजूनें दुसरें पोतें घालून तें शिवून तयार केलेली वंगी, पार्सल. [जोट; इं. जूट!]

**जोटी–ठी. जोटीव, जोठीव**—वि. जोठाच्या कापडाचें केलेलें (पंचा, आंगरखा इ०).

**जोठ**—पु. खांब आणि तुळई यांच्यामध्यें मजबुतीसाठीं घातलेला लांकडी तुकडा. [जोड]

**जोड**—पुस्त्री. १ दुकल; जोडी; जोडा; युग्म (एका जातीच्या दोन, दोन, एकाचवेळीं चालणाऱ्या, असणाऱ्या वस्तू). 'पाटल्या जोड, कांकणें जोड, इ०' २ जोडी; संघ; संच; ताफा (सोंगट्या खेळणारांचा, पुजापात्रांचा, खेळणारांचा, बैलांचा, वाजविणारांची); डाव (गंजिफाचा); संच (कपडे, धोतर व अंगवस्त्र यांचा). सामान्यतः सेट. ३ ठिगळ; गावडी; सांचा लावलेला तुकडा; संयोग (वस्त्र, लांकूड, धातू वगैरेस) ४ सूर लावण्यासाठीं सा, रि, ग, म, प, ध, नी हे सूर खालीं–वर करणें; आलाप घेणें. ५ (–स्त्री.) (अक्षरशः व ल०) सांठा; संचय; संग्रह मिळविलेलें द्रव्य. 'आपल्या साऱ्या हयातीची जोड आपण भोळसरपणानें घालवून बसलों.' ६ मिळकत; लाभ; किफायत. 'जोड जोडिली मनुष्यदेहा ऐसी।' –तुगा ७१२. 'व्यर्थ भांडतां त्यांत जोड काय!' ७ जोडलेला या अर्थी हा शब्द फळांच्या नांवांच्या मागें जोडतात. जसें– जोड–आंबा–पेरू–केळ इ०. ८ दुहेरी या अर्थानें जोड शब्दाचे समास होतात. जसें– जोड–कडी–कांठ–खांब–तुळई–पदर–भिंत इ० ' ९ गुंतवण; सांधा; संबंध; सांगड; गुंतवणूक (पक्ष्यांची, माणसांची); जोडपणा; सांखळी. (क्रि० घालणें). १० विण्याच्या मधल्या दोन तारा; सतारीच्या मधल्या दोन (ज्या षड्ज स्वरांत मिळविलेल्या असतात त्या) तारा. ११ मैत्री; सलगी; जिव्हाळा. १२ बरोबरी; साम्य; साथ. 'धर्मासि म्हणे बागा साधो जोडा नसेचि या दिवसा।'–मोविराट ७.१६. 'गुंगा व गामा यांची जोड अगदीं अप्रतिम होती.' १३ (बांधकाम) पुस्ती; नवीन गोष्टींची किंवा कांहीं कामांची वाढ. १४ (ओतकाम) दोन पिशव्यांचा दोन हातांनीं फुंकला जाणारा भाता. १५ (कुस्ती) एक डाव. जोडीदाराचा एक हात त्याच्या दोन्ही पायांतून धरून आपला दुसरा हात जोडीदाराच्या मानेवर ठेवून जोडीदाराची मान खालीं दाबून पायांतून जोडीदाराचा धरलेला हात वर उचलून त्याला चीत करणें [सं. युज्–योजय्; प्रा. जोड; सं. जुड्=बांधणें] (वाप्र.) ०करणें–सांधणें; मिळविणें. 'पुण्याची करावया जोड; जीव हा सज्जला'–विक ६९. (पायाची). ०करणें–कृपा संपादणें. 'मी आपले पायाची जोड केली आहे.' ०देणें–लाभ, फायदा देणें. 'संतपदाची जोड। दे रे हरी।' –अमृत १०८. ३४. ०नसणें–बरोबरी न होणें; उपमा न मिळणें. सामाशब्द– ०अक्षर–न. (जोडाक्षर) जोडलेलें अक्षर. उदा० क्क, म्ह, स्त इ०. ०करीण–वि. जोडीची वस्तु. 'अटकेची जोडकरीण तोफ फत्तेलष्कर होती.' –भाव ४०. **जोडका**–वि. (जोडणारा) मिळविणारा; संपादन करणारा; कमावता; मिळविता. 'जोडका पुत्र देखोनी गुणी। जनक जैसा सुखावे।' –मुआदि ३०.२२४. 'कांतिला पति तोचि प्रीय हृदयीं जो कां असे जोडका'–सदाशिव कविकृत. उमाविलास ५. **जोडका–जोडता–पूत–राम–रावजी**–पु. १ कुटुंबांतील पैसा कमाविणारा मुलगा. २ जातींतील कमावता पुरुष (अक्षरशः व निंदार्थी) ३ (मराठी राज्यांत) लोकांच्या विरुद्ध बातमी मिळविण्यासाठीं व त्यांवरून दंड करून पैसा जमविण्यासाठीं प्रसंग आणून देणारा, सरकारनें ठेवलेला नीच माणूस; लोकांची अर्डीपिर्डी सरकारास कळविणारा पाजी माणूस. ०काम–न. १ निरनिराळे तयार केलेले भाग, जमविलेलें सामान जोडून केलेलें काम. २ जोडधंदा; मुख्य कामाखेरीज दुसरें काम. ०कार–वि. (गो.) जोडका. ०गहूं–पु. खपल्या गहूं. ०गिरी–गीर–वि. १ तुकडा जोडलेला; तुकडा जोडून केलेला. 'या गाड्याचा आंस जोडगिरी आहे.' २ दुहेरी; दोन वस्तू ज्यांत आहे असा; जोडाचा (खांब, किल्ल्याच्या भिंती, कौलांचे थर).

' घरास जोडगिरी खांब दिले असतां चांगली वळकटी येते.' —स्त्री. १ साथ; मदत (गवई, हरिदास यांस) 'हा पोऱ्या त्या हरिदासाचे मागें उभा राहून जोडगिरी चांगली करितो.' २ दुहेरीपणा; दोन पदार्थांचें एकत्रीकरण. ३ जोडलेली स्थिति; तुकड्यांची वनावणी. ०गोळी—स्त्री. १ दोन गोळ्यांचा बार. २ एका बंदुकींत एका वेळीं दोन गोळ्या. ३ (ल.) दोहींकडून खटपट. ४ (ल.) जोडी; युग्म. 'नवरदेवांची जोडगोळी' ०चौकट—स्त्री. दुहेरी चौकट; याचा सांचा (विशेषतः दाराचा), दोन लांकडें वाह्यांनां जोडून केलेला असतो. जोडजूं—(पुणें) शेलाटी; (नगर) शिळवट, जडी; (सातारा) शेवळ, शिवळ; (खानदेश) जोडगी जुवडी. जोडणी—स्त्री. जोड; सांधा जोडणें; (जोडणें क्रियापदाचें धातुसाधित). जोडणें—सक्रि. १ सांधणें; जुडविणें; शेवटास संयोग करणें; एकत्र करणें (दोन तुकडे). २ मिळविणें, अधिक लावणें; जोड देणें (लांबविण्यासाठीं); एकावर एक किंवा एकापुढें एक ठेवणें (दुसरा थर, अस्तर, लांबीचा तुकडा). 'सखलातीस आंतून पासोडी जोडली तेव्हां थंडी राहिली.' ३ जवळजवळ, लांबीच्या पुढें, बाजूस शेजारीं ठेवणें. 'दोनी काठ्या जोडून पहा म्हणजे कोणती लांब तें कळेल. ४ जुंपणें; मानेवर जूं ठेवणें किंवा खोगीर घालणें (गुरें, घोडे यांच्या). ५ (ल.) जागेवर गुंतविणें; कामाला लावणें, चिकटविणें. 'पोराला त्या चाकरीवर जोडून द्या.' ६ जमविणें; गोळाकरणें; सांचविणें. 'संसारसंबंधें परमार्थ जोडे। ऐसें केवीं घडे जाणते हो।' ७ पूर्ण करणें; तडीस नेणें; घडवून आणणें. 'माझें एवढें लग्न जोडून द्या.' ८ मिळविणें; संपादणें; स्वतःसाठीं कायम करणें, दृढ करणें (कृपा, स्नेह, मैत्री, आश्रय, धंदा इ०). 'आम्हीं जें जें जोडावें। तें समस्तीं इहीं भोगावें।' —ज्ञा १.२१७. ९ युक्ति काढणें; तजवीज करणें; उपाय करणें. —अक्रि. १ ताब्यांत येणें; मिळणें. 'कीं रोग्यास रसायण निर्मळ। अकस्मात जोडलें।' २ (क्व.) भरभराट होणें; भरमसाट मिळणें; लगा साधणें. [सं. जुड्=बांधणें] म्ह० अघव्याचा जोडला आणि पिढीचा मोडला. जोडता—वि. मिळविता; संपादन करणारा. जोडका पहा. ०दंड—पु.(व्यायाम) कसरत करण्यासाठीं दोन आडवीं लांकडें बसविलेली योजना. (इं.) पॅरलल बार. ०नळी—स्त्री. दुहेरी नळी (बंदुकीची). ०नाल—पु. तालीमखान्यांतील एक वस्तु. जोडप—न. (राजा.) जोड; सांधा; जोडणें; जुडविणें. ०पट्टी—स्त्री. (लोखंडी पाणरहाट) पोहोरे एकमेकांशीं अडकवून माळ करण्यासाठीं प्रत्येक पोहऱ्यास दोन बाजूंस बसविलेले लोखंडी कांबेचे तुकडे. ०पाडें—क्रिवि. द्वंद्वानें; भेदवुद्धीनें. 'विधिनिषेध जोडपाडें। जेथ विशेष कर्म वाढे।' —एमा ७६७. ०पाहरा—पु. दोन शिपायांचा पाहरा; जोडीचा पाहरा. जोडपी—वि. जोडीदार; सोबती; बरोबरीचा; जोडीचा; जुळणारा; (सजीव, निर्जीव वस्तूं मध्यें). 'तुला कोण पाहिजे तो जोडपी पाहा.' —स्त्री. (क्व.) १ जुळणी; मेळ; एकत्र जोडणें. २ जुळण्यास योग्य असणें; बरोबरी. जोडपें—न. (कों.) नवरावायकोची जोडी. 'अडचणीमुळें विवाहसंबंधानें बद्ध अशीं स्त्रीपुरुषांची विसंगत जोडपीं दृष्टीस पडतात.' —टि ४.२. २ जुळें; एकदम जन्मलेला मुलगा व मुलगी. ०फळ—न. (काव्य) जुळें फळ; दुहेरी फळ. ०फळाचा सांधा—पु. १ (ल.) सततचा संयोग किंवा संबंध; नजीकचा एकत्र भाव (चांगलें वाईट, सुखदुःख इ०). २ निकटची मैत्री; दाट स्नेह. 'जैसा जोडफळांचा सांधा। तैसा सुखदुःखाचा बांधा।' ०बंद—पु. एकास एक चिकटवून लांबविलेला कागद

जोडवें—पु. आंगठ्याजवळच्या किंवा मधल्या (पायाच्या किंवा हाताच्या) बोटांत घालावयाचें एक जाड व मोठें वळें (चांदीचें किंवा सोन्याचें). 'जोडवी अनवट मासोळ्या।'—स्त्रीगीत ६५.

जोडा—पु. १ एकाच जातीच्या पदार्थांची जोडी, या पैकीं दोन पदार्थ प्रायः एकत्र असतात (पायांतले जोडे, एक ताण्याचीं दोन धोतरें इ०); विवाहित स्त्रीपुरुषांची जोडी. 'हा जन्माचा जोडा आहे.' —मोर १९. सजीव प्राण्याचें (नरमादीचें) जोडपें. 'हा पक्षियांचा जोडा।' —कथा १ ३.८५. जानव्यांचा जोड (पांच जानवीं); दोन सोबती. 'रामावसवंत कबीर खेळिया। जोडा बरवा मिळाला रे।' —तुगा २४३ २ पायांतील जोड्यांपैकीं एक; पायपोस; कोणत्याहि जोडीपैकीं एक वस्तु; सोवती; भिडू. ३ जोडीदार; बरोबरीचा किंवा जोडीचा मनुष्य, वस्तु किंवा उदाहरण. ४ बरोबरी; उपमा (क्रि० नसणें). 'त्याच्या पापासी नाहीं जोडा।' ५ (कुण. ठाणें) भरणीश्राद्धांत आपल्या जातीचें घालावयाचें मेहूण. ६ (ना.) भराडी गौरीचे वेळीं मुली परड्यांवर फुलांच्या पाकळ्यांची जी चित्रविचित्र आकृति काढतात ती. [जोड] (वाप्र.) (कोणांचा) जोडा कोणाचे पायांत नसणें—जोडा पायांत नसणें—वंडाळी, घोंटाळा, अव्यवस्था असणें. ०बांधणें—शिवणें—पायातील जोड्याची जोडी तयार करणें. ०फाडणें—झिजविणें—(ल.) एखाद्याच्या भेटीसाठीं अनेक फेऱ्या किंवा खेटे घालणें. ०टांचणें—(चांभारी) रेशीम भरण्यासाठीं तजास आरीनें भोंक पाडणें. ०मारणें, जोडेपूजा करणें—खरडपट्टी काढणें; पादपूजा करणें. [जोड] जोडाई—स्त्री. जोडणावळ; निरनिराळ्या वस्तू किंवा तुकडे एकत्र जोडण्याची मजुरी. [हिं.] जोडाजोडी—स्त्री. १ जुळवाजुळव. 'करूं जोडा जोडी अक्षरांची।' —तुगा ९३६. २ परस्परांना जोडे मारणें; मोठें भांडण; मारामारी. जोडाक्षर—न. जोडअक्षर पहा. संयुक्त वर्ण; दोन किंवा अधिक व्यंजनांस पुढें एखादें अक्षर जोडिल्यानें अथवा दोन किंवा दोहोंपेक्षां अधिक व्यंजनें एकत्र जोडून मग

त्यांस स्वराचा योग केल्यानें जोडाक्षरें होतात. -मराठी भाषेचें व्याकरण पृ. ११.

**जोडी**—स्त्री. १ जोडा; जोडपें; युग्म (एका जातीचें); जुळें. 'ही मोत्यांची जोडी पाणीदार आहे.' २ संच; जोड (हरिदास, पुराणिक इ०चा-एक मुख्य व दुसरे मदतनीस यांसह). ३ बरोबरी; साम्य; तुल्यगुणत्व. 'यांनी त्याची जोडी बनली.' ४ (काव्य.) ठेवा; सांठा; राशी; लाभ. 'देवी म्हणे रहा क्षण करिसी निरर्थी काय जोडि खळा।' -मोसभा ५.११७. 'गुण गाईन आवडी। हेचि माझी सर्व जोडी।' -तुगा ११६३. ५ सरकारी सारा, पट्टी. जुडी पहा. ६ एका वेळीं फिरविण्याचे दोन मुद्गल. ७ प्रारब्ध; नशीब. 'तुझें कर्म असे सहज। आपली जोडी भोगावी।' -गुच २०.२१. ८ प्राप्ति; संग्रह. 'मानसा करि तयाचिच जोडी।' -सारुह ४.१०४. **जोडीचा**-वि. जोडीसंबंधी; बरोबरीचा. **जोडीव**-वि. तुकडे जोडून केलेलें; ज्याला तुकडा जोडला आहे असें; जोडलेलें; एकत्र केलेलें; ठिगळ लावलेलें. [जोड]

**जोडें**—न. १ विवाहित जोडपें; जोडा (स्त्रीपुरुषांचा, नरमादीचा). २ (कों.) नारळांची जोडी. ३ (राजा.) हाता-पायांतील जोडवें; वळें.

**जोडेजोडे**—क्रिवि. (खा.) बरोबर; एकमेकांच्या संगतीनें. -भाप्रै ७.१-८. [जोड द्वि.]

**जोत**—न. (कों.) १ जुंपलेल्या बैलांची जोडी (क्रि० बांधणें; लावणें; लागणें). २ बैलांच्या जोडीनें ओढलेला नांगर. 'जोत चाललें-धरलें-पडलें-सुटलें.' (खा.) ३ जुंपणी. ४ (कु.) दोन होड्यांनीं समुद्रांत जाऊन मासे मारतात तें जाळें. ५ (हिं.) नांगरणी; लावणी. ६ (व. खा.) बैलाच्या गळयास जूं अडकविण्याचा पट्टा. [सं. युत; फ्रेंजि. जुतो; सं. योक्त्र; प्रा. जोत्त; हिं. जोत; म. जोतें] म्ह० पुढील जोत तसें मागील जोत. ०करी-वि. (गो.) शेत नांगरणारा. जौंतकरी पहा. **जोतणें**-(व. खा.) (बैल) जुंवास जुंपणें. [सिं. जोटणु] ०पात-न. नांगर, बैल वगैरे शेतकीस लागणारें सामान.

**जोत**—पु. घुमट वाद्यावर म्हणावयाचें एक गीत. 'एक जोत गाण्यास त्यानें आरंभ केला.' -सह्याद्रि ६८.

**जोत**—स्त्री. १ ज्वाळा. २ तेज; उजेड; चकचकीतपणा; शोभा; चकचकी. 'जोत जरिपटक्याची' -ऐपो १९१. ३ तेज; पाणी; झकाकी (रत्नांची). ४ सफाई; चकाकी (वस्त्राची). ५ पाणी (शस्त्र किंवा हत्याराचें). ६ जोर; जोम; सत्त्व; तेज; बळ; जोरकसपणा (पाऊस, ऊन, पीक, पदार्थ, मनुष्य, प्राणी, धंदा, व्यापार इ० चा). ७ प्रख्यात माणूस किंवा कडक देवस्थान; जागती ज्योत. 'हा साधु किंवा हें देवस्थान मोठी जोत आहे.' ८ वस्त्रांतील जळजळ. (क्रि० लागणें). [सं. ज्योति] ०धरणें-तेज; शोभा, जोर, सौंदर्य संपादन करणें किंवा येणें. ०कार-वि. (गो.) देवाजवळील दिवे लावणारा. ०दार-वि. १ तेजस्वी; चकचकीत; लखलखणारा; प्रकाशमान. २ (ल.) शहाणा; धूर्त, समर्थ; हुषार; बुद्धिवान; प्रतिभाशाली.

**जोताड**—स्त्री. (ना.) ज्योत. [जोत] ०लावणें-(ना.) आगलावेपणा करणें.

**जोतिबा, जोतिर्लिंग**—न. महादेव; महादेवाचें लिंग, पिंडी; शंकराचें देवस्थान. [सं. ज्योतिर्लिंग]

**जोतीवंत**—वि. जोतदार पहा. [सं. जोत-ती+वंत प्रत्यय]

**जोतें**—न. चिरेबंदी कडा, कांठ; हिच्यायोगें घराची गच्ची किंवा ओटा सुरक्षित राहतो; चौथरा; गच्ची; उंच केलेली जागा. चिऱ्यांनीं बांधलेला ओटा; इमारत बांधण्यापूर्वीचें चिरेबंदी काम. 'गरुडपाचूंचीं जोतीं।' -ह ३४.१३५. [सं. युक्त; प्रा. जुत्त?]

**जोतें**—न. १ जिनें बैलाचा गळा जोखडाशीं बांधला जातो ती दोरी किंवा पट्टा. २ जूं; शेलें [वै. सं. योक्त्र; प्रा. जोत्त; का. जत्तगी; हिं. जोत]

**जोतेकार**—पु. (गो.) चांभार; जुतें करणारा. [हिं. जूता=जोडा+कार]

**जो तो**—सना. १ जो कोणी; प्रत्येकजण; प्रत्येक मनुष्य; हरएक व्यक्ति. 'जो तो चेष्टवी मुला।' -मारावाल ९.७४. २ कोणी; कोणी एक; कोणी तरी. 'जो तो म्हणे हा प्रचंडवीर। सांगती रावणासी बडिवार।' -रावि ११.११४. [जो+तो]

**जोत्या**—वि. नांगऱ्या; नांगरणारा माणूस; जोत धरणारा गडी; शेतकरी; २ (ल.) गांवढळ; नांगऱ्या. ३ (ल.) मंदबुद्धि; ढ; अक्षरशत्रु. [जोत; हिं. जोतिआ]

**जोंधळा**—पु. एक धान्याचें रोप व त्याचा दाणा; ज्वारी (धान्य) किंवा त्याचें ताट. याच्या जातीः-उतावळी, निवळा, शाळू, रातडी, पिवळा जोंधळा, खुंडी, काळबोंडी, दूधमोगरा, याशिवाय केळी, अरगडी, डुकरी, वेंदरी, गडगूप इ० हलक्या जाती आहेत. जोंधळयाच्या भाजून लाह्या करतात व कुजवून दारू काढतात. पिठाची भाकरी होते. [सं. यावनाल; प्रा. जोण्णलिआ; का. जुनळ; तेलगु. जोन्न; हिं. जोन्हरी] जोंधळी पोत-स्त्री. जोंधळयासारखे बारीक सोन्याचे मणी असलेली व ४।५ पदरांची, मधोमध जाळीचा मणी किंवा वेलपान असलेली पोत. **जोंधळे उचलणें**-शपथ घेणें. (शपथेचा एक प्रकार).

**जोधा**—पु. योद्धा. -वि. १ मजबूत; धष्टपुष्ट; राकट; पहिलवानासारखा. 'ऐसा कवणु तो जोधांचा मेळावा।' -शिशु ९४४. २ (व.) उंचापुरा; लड्ड व ठोकळ हातापायांचा. [सं. युध्]

**जोप-पें**—न. वांसरूं; जावपें पहा. (गाईचें, म्हशीचें).

**जोपणें**—उक्रि. पोसणें; रक्षण करणें; सांभाळणें; खाऊंपिऊं घालणें. [ सं. गुप्=रक्षण करणें ]

**जोंपर्यंत-पावेतों**—क्रिवि जंव; जावत्कालपर्यंत; ज्यावेळेपर्यंत; पर्यंत. [ सं. यावत् ]

**जोपा,जोपन**—स्त्री. काळजी; निगा; संगोपन; संरक्षण; जोपासना. 'जो पाहे सदसद्विचार हृदयीं जोपा जनाची करी।'-र ४. [ सं. गुप् ]

**जोपाणें**—अक्रि. वाढणें. 'मग ते अंकुर जोपातां गुणीं पावले परिपुष्टता।'—गीता १३.१७८.

**जोपारणें**—अक्रि. जापारणें; उलट जबाब देणें; बेपर्वाई दाखविणें; उद्धट होणें जापारणें पहा. 'वर मलाच उलट अस काय करतां हो म्हणून जोपारावं?'—फाटक, नाटयछटा १. —सक्रि. झिटकारणें; तुच्छ मानणें; तिरस्कारबुद्धीनें नाकारणें.

**जोपाव(स)णें**—उक्रि. (कों.) काळजी घेणें; निगा राखणें; संगोपन करणें; बरदास्त ठेवणें (वांसरांसंबंधीं गाईला लावतात व मनुष्यें, प्राणी वस्तु यासंबंधीं मनुष्यांना लावतात). [ सं. गुप् ]

**जोपाशीर**—ल; जोपा; **जोपासना-सणी**—स्त्री. (कों राजा.) निगा; बरदास्त; काळजी; लक्षपूर्वक पालनपोषण किंवा सांभाळ, संगोपन करणें. [ सं. गुप् ]

**जोंबडा**—पु. (राजा.) १ झुमडा; गवताचा भारा, गड्डा; लाटा. २ (विशेषतः) शेतांत टाकलेला किंवा फळझाडावर बांधलेला विडा; सरकारद्वाहीचें असें कांहीं चिन्ह; यावरून शेत कापणें किंवा झाडावरचीं फळें तोडणें यास सरकारी मनाई आहे असें समजण्याची खूण 'या आंब्यास द्वाहीचा जोंवडा बांधला आहे, आंबे पाडूं नका.' ३ (ल.) सैल बांधलेली शेंडी [झुंबाड]

**जोवन**—पु. १ (स्त्रीचा) स्तन; कुच; थान. 'तंग चोळी छातीवर जोवन कोवळे रसरसले।'—होला ८९. २ तारुण्य; ज्वानी. [ सं. यौवन; प्रा. जोव्वन; हिं जोवन ]

**जांबाड**—न. झोंवट, झोंवाड पहा.

**जोवाळणी**—स्त्री. जोपासना; जोपाशीर, जोपा पहा. [ जोवाळणें ]

**जोंवा(मा)ळणें**—उक्रि. १ (कों) जोपावणें पहा. उत्तम रीतीनें राखणें, जपणें. 'एवढे दिवस दागिना जोंवाळून ठेविला होता म्हणून प्रसंगीं उपयोगी पडला' २ नेहमीं गोंजारणें; लाड करणें (लहान मूल इ० ना). 'ममतेनें पोरास घरीं जोंवाळून ठेविला तर विद्या कशी येईल.' नेहमीं कुरवाळणें; लडिवाळपणें वागविणें किंवा सांभाळणें; पाठीवरून हात फिरविणें (आवडता प्राणी, वस्तु यांच्या).

**जोमदंड**—वि. १ शक्तिमान; जोरदार; बळकट. २ जवानमर्द; धिप्पाड; दांडगा; गलेलठ्ठ.

**जोम**—पुन. १ घट्टमुठपणा; दाढर्य; घट्टपणा; शरीराच्या बांध्याचा व चेहऱ्याचा तजेला, भरदारपणा २ शरीरांतील बल; जोर; शक्ति; बळकटी (बांध्याच्या घट्टमुठपणामुळें). ३ जोर; दम; अवसान [ सं. यौवन; प्रा. जोव्वण ] **जोमांत असणें**-१ (माण.) झोकांत किंवा थाटांत असणें २ जोरांत असणें; उत्साहयुक्त असणें. **०दार**—वि. १ घट्टमुठ; दृढ; आवळी. २ शक्तिमान; बळकट; जोरदार. ३ दमदार; अवसानयुक्त.

**जोयशी**—पु. (कु.) ज्योतिषी; जोशी. [ सं. ज्योतिषी ]

**जोर**—पुन. १ जोम; शक्ति; ताकद; बळकटी. २ स्थैर्य; दाढर्य; गंभीरपणा; दमदारपणा; सहनशक्ति (सजीव प्राणी, वस्तु यांची). ३ वेग; शक्ति; आघात; झपाटा; गतीचा वेग (वारा, बंदुकीची गोळी यांचा). ४ जुलूम; जबरदस्ती; अन्याय. ५ दाब; ताण; नेट; वजनाचा भार. 'सगळे भोई सारखे असले तर बरं, नाहीं तर टेंगणा असतो त्याचे खांद्यावर भारी जोर येतो.' ६ जोष; पूर्ण वेग; भर (रोग, पाऊस, थंडी यांचा). ७ तालमींतील एक व्यायामविशेष; दंड. (क्रि० काढणें). ८ (नाविक) पूर; समुद्राची भरती (विशेषतः पौर्णिमा-अमावास्येच्या दिवशींची); भांग; उधाण. ९ (यंत्रशास्त्र) प्रेरकशक्ति. १० महत्त्व; भर. या गोष्टीवर गव्हर्नरसाहेबांनीं बराच जोर दिला होता.'—केले १.१९९. [ फा. झोर्; अर. जौर् ] (वाप्र.) **०करणें-लावणें-जोरास येणें**= जबरदस्तीनें वागणें; अडथळा करणें; शक्तीची, बलात्काराची गरज उत्पन्न करणें; तडीस नेण्यास; उरकण्यास कठिण करणें, जाणें. 'आज पावेतों रुपये देतों देतों म्हणत होता पण अतां जोरास आला त्यापेक्षां उपास घातले पाहिजेत.' **०देणें**-१ पुष्टी; मदत, आधार देणें. २ महत्त्व देणें; विशेष उल्लेख, निर्देश करणें. **म्ह०** जोर थोडा, आणि घुस्सा बडा. —भाव २४. सामाशब्द—

**जोराचा**—वि.नेटाचा; अति मोठा. **०कस-दार-वान**-वि.१ दंड काढणारा. २ पहिलवान; ताकदवान; बळकट; सशक्त. **०गत**—स्त्री. (राजा.) उधाण; उसाण; भांग; समुद्राची भरती (अमावास्या व पौर्णिमेची). 'पुनवेच्या व जोरगतीच्या दिवशीं भरतीच्या वेळीं मानसेचीं दारें बंद केल्यावरसुद्धां काय विषाद होती.'—सह्याद्री ९४. **०जवरी**—स्त्री. जुलूम; जबरदस्ती. **०तलप-ब**—स्त्री. १ (कायदा) हजर राहण्यासाठीं जोराचें बोलावणें. २ अन्यायपूर्वक हरण; बलत्कारानें हरण; बलात्कार. 'जोरतलबेनें ऐवज शिंदे यांनीं आणिला म्हणून वार्ता आहे.'—ख ९.४९८४. 'माझे मनांत आलें तर येईन, तुमचे जोरतलपेनं मिणार नाहीं.' **०तलपी-बी**—स्त्री. जुलूम; जबरदस्ती.—वि. १ जुलमाचें; जबरीचें; जोराचें; बलात्काराची (हुंडेरी, पैसा उकळणें यासंबंधीं मागणी). 'त्यापेक्षां अंमल जोरतलबीचा सुरू करावा.'—मराचिथोशा ७७. २ मग्रूर; अरेराव. 'कोठें जोरतलवा महाल असतील, हरामखोरांस तंबी पोहोंचावून

पैसा वसूल करून देणें.' -मदवा १.११८. -पेद ६.१४९. [फा] ०तलवीटीग-सर-स्त्री. पत्त्यांच्या खेळांतील एक संज्ञा. ०बळ-न. शारीरिक बल; पाशवी शक्ति; आडदांडपणा; दांडगाईचा जोर, बळ; शुद्ध दांडगाई; जुलूम. [फा. झोर्+सं. बल] ०पट्टी-स्त्री. दोन थरास जोडणारी पट्टी 'जरूर पडल्यास वरवंडया जोरपट्टीनें जोडाव्या' -मॅरट१३. ०बेजोर-बेजोर-क्रिवि. जोरावारीनें; जबरदस्तीनें. 'इंग्रज घाट चढोन येऊन जोरबेजोर होसकऱ्याचें ठाणें घेतलें.' -ख ९.४४५४. 'प्रधानाच्या फौजेनें बदामीचा किल्ला जोरबेजोर फत्ते केला.' -ख ८.४०९०.

जोर-पु. (गो.) ज्वर; ताप. [सं. ज्वर]

जोरा-पु. १ अधिकार; सत्ता; जोम; सत्ता. 'सावकाराचा जोरा कीं सरकाराचा जोरा.' २ जुलूम; जबरदस्ती; अन्यायाचा दंड, शिक्षा. ३ शह; जोर. 'स्वामीचे पुण्यप्रतापें अवदालीस जोरा पोंचवून तंबी करतील.' -इमं २६०. [फा. झोर्]

जोरावणें-अक्रि. १ (अक्षरशः व ल०) बळावणें; समर्थ, शक्तिमान, पराक्रमी, तेजस्वी होणें. २ जुलमी होणें; माजणें. 'जोरावले वनकरी थडकांस देती.' -अर्वाचीन (खरे) ४५६. ३ जोराचा होणें. (वारा, पाऊस, मनोविकार, रोग). 'झरझर चला, पाऊस जोरावल्यावर मजल आटोपणार नाहीं' ४ जोरानें वाढणें; फोफावणें; 'पाणी मिळूं लागतांच झाड जोरावलें.' ०वर-वार-वि.१जोरदार; बलवान; समर्थ. 'मालोजी जोरावर।' -मब्व ३१४. २ जुलमी; जबरीचा; जबरदस्त. ०वरी-वारी, जारावा-स्त्रीपु. १ बळजवरी; जुलूम; जबरदस्ती. 'आपणावरी जोरावरी करिताती.' -रा २०. ४५. २ पाठपुरावा; पाठबळ; मदत. [फा. झोरावर्]

जोरी-स्त्री. ज्वारी; जोंधळा पहा. [प्रा. जोवारी; म. ज्वारी; हिं. जोरी]

जोरी-स्त्री. जुलूम; जबरदस्ती; पुंडावा. 'किलेकरी जोरी करितील...' -राज १६.३४. बळजोरी शब्दांत हा शब्द येतो. -वि. (बुद्धिबळांचा खेळ) पाठिंबा किंवा जोर दिलेलें, देणारें (प्यादें) या डावांत एका बाजूनें दुसऱ्याचें जोरांत असलेलें मोहरें मारावयाचें नसतें. [फा. झोरी=बल]

जोरी-स्त्री. (गो.) तापाची सांथ. [सं. ज्वर]

जोरू-स्त्री. स्त्री; पत्नी; वायको. [जोड; हिं. जोरू] म्ह० (व.) जोरू सात, पैसा गांठ=नेहमीं पैसा गांठीला लावावा व वायको बरोबर असावी.

जोर्णे-(गो.) पाऊस पडतेवेळीं पेरण्याची शेती. जार्णे पहा.

जोल-स्त्री. (प्रा.) जमणें; साजणें; शोभणें; जुळणें. जोलीचा-वि. मिलाफी; जुळणारा; योग्य असणारा; शोभणारा.

जोल्ल-न. (वें.) लाळेचा ओघळ. [का. जोल्लु=लाळ]

जोव-स्त्री. (राजा.) वीज [सं. जव; गु; दें. प्रा. जोई=वीज]

जोवणें-अक्रि. (राजा.) वीज चमकणें. [जोव; सं. द्योतन]

जोवणी-स्त्री (राजा.) जोखडाची खिवळ, खुंटी, खीळ [जूं+अडवणी ?]

जोवणें-अक्रि. (राजा.) दाटी जमणें, होणें; घोंगावणें (माशा, मुंग्या इ०). [सं. योजन; प्रा. जोअण=जोडणें]

जोंवर-वरी, जोंवरीं-क्रिवि. १ जोंपर्यंत; ज्यावेळेपर्यंत. २ यावत्काल; जितका वेळपर्यंत. [सं. यावत्]

जोवाल-स्त्री. (राजा.) जमीन भाजणें, रव्हाळे तोडणें इ० शेतीचें सर्व काम करण्यासाठीं अनेक शेतकऱ्यांचा जमलेला समूह; अनेक शेतकऱ्यांनीं एकवट काम करणें; डाळें. साप पहा. [जोवणें=एत्रक जमणें]

जोव्हारी- पु. जोहरी पहा.

जोश-ष-स-पु. जोम; जोर; आवेश; वेग. [फा. जोश्]

जोशी-शी-पु. १ पंचांग, कुंडल्या समजून गांवांत सांगणारा; ज्योतिषी; भविष्य वर्तविणारा; भिक्षुकी, जोसकी करणारा ब्राह्मण (विशेषतः धंदेवाईक); ग्रामजोशी. पूर्वी ही वृत्ति असे व जोशाला गांवांत वलुतें देण्याचीहि वहिवाट असे. २ एक कुणब्यांतील जात; कुडबुडे जोशी (कुणब्यांतील); हे सहदेवी मताचे मुहूर्त, ज्योतिष जाणतात. ३ बगळ्याच्या जातींतील एक पक्षी; कुकुडकुंभा. [सं. ज्योतिषी; प्रा. जोइस, जोइसिअ]

जोसकी, जोसपणा, जोसपण-स्त्रीपुन. गांवजोशाची वृत्ति, धंदा, वतन. जोसगंड-पु. जोशास निंदार्थी म्हणतात.

जोहनळा-पु. (महानु.) जोंधळा पहा. 'शिशुपाल सैन्याचे जोहनळे। पीटू करैणु एकें वेळें। उखळीं वसुंधरेचां।' -शिशु ९१४. [सं. यावनाल; देप्रा. जोण्हलिया; हिं. जोन्हरी]

जोहर-पुन. १ अग्नि. 'जोहरीं रक्षील सर्पातें।' -मुआदि ९.७१. २ (ल.) संकट. 'मला सत्य घालील कीं जोहरीं तो।' -किसु ८८. ३ लाक्षागृह. -ज्ञा ११.६०. 'येहीं लाक्षाजोहर रचिलें।' -गीता १.२३६१. [फा. जोहर=अग्निदिव्य. किंवा जहर ?]

जोह(हा-हो)री-पु. १ सराफ; जव्हेरी; जवाहिऱ्या; रत्नपरीक्षक; 'जैसा रत्नामाजी जोहारी। रत्न पारखी आपुलें।' -मुआदि ४१.१०१. २ जुना जरतार विकत घेणारा; जरीपुरानावाला; ३ आरसा, फण्या, चरकी भांडीं इ० जिन्नस विकण्यासाठीं दारोदार फिरणारा; अशी जात -शास्त्रीको. ४ (व.) मणी, पोंवळी विकणारी एक जात. [अर. जौहरी].

जोहळा, जोहया, जोहा, जोह्मा-पु. (ना) जोंधळा पहा.

जोहा(ह)र-न. १ जवाहिर; रत्नें इ० 'आंगावर जोहार फार खुलले। वनीं जणू पळस तरु फुलले।' -होला १३५. २ जवाहिऱ्याचा धंदा; सराफी. [अर. जौहर]

**जोहार**—पु. नोकर लोक राजाला वंदन करितांना हा शब्द हे वीरा या अर्थी म्हणतात. 'रायासि जोहार करुनि उचित स्थानिं बैसविला '–पंच १.१६. 'प्रजा येउनी राजसभे। जोहार करुनी राहिले उभे।' –मुहरिश्चंद्राख्यान ६६ (नवनीत पृ. १८६.) महार, चांभार वगैरे आपसांत किंवा वरिष्ठांना नमस्कार करितांना हा शब्द योजतात. 'जोहार जी मायबाप जोहार।' –तुगा ३३६. [सं जयहर, योद्धार; प्रा. जोहर] **जोहारणें**–अक्रि. वंदन करणें. 'मग जाऊनि वंदीजन। जोहारिला नृपनंदन '–कथा ६.१५.२२. [फा. जोहर]

**जोहार**—पु. १ निकराच्या वेळीं आपल्या बायका–मुलांचा नाश करण्याचें हिंदु वीरांचें कृत्य. रजपूत लोकांत बायका अभिप्रवेश करीत. २ अभिसात होणें. 'ऋषि जोहार जालें ' –भाए १०१. [फा. जोहर=अभिदिव्य]

**जोळ**—स्त्री. (गो.) जळू (प्राणी). [जळू].

**जोळक**—न. (कु.) माडाची वाग

**जोळी**—स्त्री. १ (गो.) आंतडें. २ (ठाणें) नांगराला बैल जोडण्याची दोरी.–वदलापूर २८७.

**जोळोंच, जळोंच**—पु. (गो.) जळण; सर्पण [सं. ज्वल्].

**जोळ्ळ**—वि. (वि.) फोल (भाताचें). [का. जोळ्ळु=फोलपणा, अर्थहीनता].

**जोक्षीकन्**—क्रिवि (खा.) फुरसुतीनें.

**जौं**—क्रिवि. जंव; जोंपर्यंत. [सं. यावत्]

**जौजा**—स्त्री. पत्नी; स्त्री; जवजे पहा. 'राधा जौजे माधव'= माधवाची पत्नी राधा.' [अर. झौजा=बायको]

**जौंजार**—पु. त्रास; कंटाळा; जोंजार पहा.

**जौनपुरी**—पु. (संगीत) एक राग. यांत षड्ज, तीव्र ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. आरोहांत गांधार वर्ज्य. जाति षाडव-संपूर्ण. वादी धैवत, संवादी गांधार, गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर. [जौनपूर गांव]

**जौस, जौसगी**—वि. (नंदभाषा) उत्तम; चांगलें; जोश–ष पहा. 'जौस लुगड्यांना किंमत फार पडते.'

**जौहर**—पु. बायकामुलांना जाळून मारण्याची रजपुतांतील एक चाल; जोहार पहा.

**जौळ**—न १ (कों.) अभ्र; अभ्राच्छादित आकाश. २ (राजा.) सपाटयाचें वादळ; जोराचा वारा. याचा वेग दर ताशीं ५० मैल असतो. [फा. जौलान्=फिरता ?]

**जौळी**—वि. १ वादळी; तुफानी (हवा, वारा). २ वादळाचा परिणाम न होणारें; त्याला टक्कर देण्यासाठीं तयार केलेलें (तारूं).

**जौळ**—न. (महानु.) समूह. 'आनंदरसाचें जौळ।' –भाए ६६१ [सं.जाल]

**ज्यहान, ज्यहानपन्हा**—जहान इ० पहा.

**ज्यहागिरदार, ज्यहागीर, ज्यहांबाज, ज्यहांबाद, ज्यहांमर्द**—जाहगिरदार, जाहगीर, जहांमर्द इ० पहा.

**ज्या**—स्त्री. १ धनुष्याची दोरी. २ पृथ्वी. ३ जीवा, एक ज्या; वर्तुळाच्या परिघांतील कोणतेहि दोन बिंदूंस सांधणारी सरळ रेषा. [सं.]

**ज्याचा**—जो संबंधी सर्वनामाचें षष्ठीचें पुल्लिंगी एकवचनी रूप. ०तो–एकएकटा; प्रत्येक माणूस; स्वतंत्र. 'ज्याचा तो पडला शहाणा, मग दुसऱ्यांनीं काय शिकवावें ?' ०त्याला–सर्वांना प्रत्येकाला. 'ज्याची त्याला काळजी पाहिजे, दुसरा किती पाहील?' **ज्याचें नांव तें**–अगदीं; मुळींच; बिलकूल. 'तिला लग्नाबद्दल मीं पुष्कळ गळ घालून पाहिली ... ... पण ज्याचें नांव तें, हिचें एकच उत्तर.' –मूक. **ज्यांत त्यांत**–प्रत्येक कामांत, प्रकरणांत. 'ज्यांत त्यांत तोंड घालणें बरें नाहीं.' म्ह० ज्याचें करावें बरें तो म्हणतो माझेंच खरें=उपकारकर्त्यानें सांगितलेली आपल्या हिताची गोष्ट न ऐकणें.

**ज्यादम**—न. (गो.) जाजम.

**ज्यादा, ज्यादुगिरी, ज्यादू, ज्याफा, ज्यास्त**—जादा, जादुगिरी इ० पहा.

**ज्यान, ज्यानजवान, ज्यानज्यानी ज्यानीजवानी**—जवान इ० पहा.

**ज्यान फाइदा**—पु. तोटा; नफा. [फा. झियान्=तोटा+ फायदा]

**ज्यापक्षीं, ज्यापेक्षां**—क्रिवि. कारणासाठीं; कारण कीं; अशा करितां. याच्या उलट त्यापक्षीं; त्यापेक्षां.

**ज्याफत**—स्त्री. मेजवानी; जाफत पहा. 'रसिडेंटासही त्यांनीं आपले येथें ज्याफतीस आणिलें होते.' –तीप्र ८३. [अर. झियाफत्]

**ज्याफल**—न. (गणित) ज्यापासूनचें अंकरूप फल; वर्तुलचापाचें माप; धनुफल. [सं.]

**ज्याबी(बु)द**—वि. सुरक्षित; धाबूत; नादुरुस्त नसलेलें. [अर. झाबीत]

**ज्याम**—वि. (गो.) दुर्बल; अशक्त.

**ज्यामिति**—स्त्री. (भूमिति) भूपरिमाण; भूमापन; भूमिति; पृथ्वीचें क्षेत्रफळ. [सं. ज्या=पृथ्वी+मिति=मोजणें]

**ज्यार**—वि. बिमार; हैराण; बेजार. जार पहा. 'भाल्याच्या अणीनें इंग्रज ज्यार केले.' –होपो १३. [फा. झार]

**ज्यारत**—स्त्री. पवित्र स्थानास भेट; यात्रा. जारत पहा. 'पिराची ज्यारत करून ...' –दिमरा १.२४७. [फा. झियारत्]

ज्यारी—वि. चालू. जारी पहा.

ज्यालें—न. जीवित; जन्म. जालें, जिआलें पहा. 'धिग्य धिग्य माझें ज्यालें।'—गीता १.२२६४. ०पण—न. जन्म; आयुष्य.

ज्याह(हा)गिरदार, ज्याहागीर, ज्याहांबाज—जाहगिरदार इ० पहा.

ज्याहां—क्रिवि. (राजा.) जेथें.

ज्युदी—स्त्री. (गो.) अंगरखा.

ज्युबिली—स्त्री. महोत्सव; आनंदोत्सव; एखाद्या गोष्टीस, संस्थेस अगर व्यक्तीस २५, ५०, ६० अगर अधिक वर्षे झालीं म्हणजे करावयाचा उत्सव. [इं.]

ज्युस्ताज्युस्त—वि. (गो.) नीटनेटका; ठाकठीक. [पोर्तु. फ्रें. ज्युस्त. इं. जस्ट]

ज्यूरी—स्त्री. पंच; पंचायत. जूरी पहा [इं.]

ज्येष्ठ—पु. हिंदू वर्षातील तिसरा महिना. —वि. १ सर्वांत वयानें मोठा; वडील; (भावंडांमध्यें) वयानें थोर. २ उत्तम; उत्कृष्ट; श्रेष्ठ. [सं.] ज्येष्ठलय—पु. (ताल.) विलंबित लय पहा. ०वारसाचा कायदा—ज्येष्ठांश पहा. (इं.) प्रायमॉजेनीचर लॉ. ०मंगल—न. विवाह किंवा उपनयन संस्कार. [सं.] ०मध, ज्येष्ठीमध—पुस्त्री. एक औषधी वनस्पतीचें मूळ; हा गोड असतो. याचा अर्क खोकल्यावर देतात. ०वड—स्त्री. ज्येष्ठाचा काल; सबंध ज्येष्ठ महिना (आठवडा पंधरवडा यासारखा बनलेला शब्द).

ज्येष्ठा—स्त्री. सत्तावीस नक्षत्रांपैकीं अठरावें नक्षत्र. [सं.] ०कनिष्ठा—स्त्री. १ समुद्रमंथनांतून निघालेल्या दोन बहिणींपैकीं वडील (ज्येष्ठा) ती लक्ष्मी आणि धाकटी (कनिष्ठा) ती अलक्ष्मी होय; कांहींच्या मतें फक्त लक्ष्मीच समुद्रमंथनांतून निघाली. त्या वेळीं तिला ज्येष्ठा म्हणत व तिचें विष्णूशीं लग्न लागल्यावर तिलाच कनिष्ठा म्हणूं लागले. २ वरील बहिणींच्या पूजेचा दिवस; भाद्रपद शुद्धांत ज्येष्ठा नक्षत्र ज्या दिवशीं येतें तो दिवस. [सं.] ०गोर-गौर-गौरी—स्त्री. एक देवता; भाद्रपदांतील ज्येष्ठा नक्षत्रीं हिची पूजा करितात. ज्येष्ठांश—पु. लहान भावापेक्षां सर्वांत वडील भावास वडिलार्जित मिळकतीचा सर्वांत जास्त हिस्सा मिळावयाचा हक्क; सांप्रत सगळ्याच भावांना समसमान हिस्सा मिळतो. ज्येष्ठासन—न. लहान साडूनें मोठ्या साडूस लग्नांत द्यावयाचा मानपान किंवा लहान मुलीच्या लग्नप्रसंगीं मोठ्या जावयास सासऱ्याकडून जो मानपान द्यावयाचा तो; ज्येष्ठ जांवयाची पूजा. [सं.]

ज्येष्ठी—वि. ज्येष्ठ महिन्यांतील (पौर्णिमा.) [सं.]

ज्यैष्ठ्य—न. १ वडिलपणा; वडीलकी. २ श्रेष्ठत्व; वर्चस्व. [सं.]

ज्योतिष—न. १ ज्योतिःशास्त्र; ग्रहांची गति जाणण्याची विद्या; सामुद्रिक व ग्रहज्योतिष. २ ज्योतिषाचा उद्योग व धंदा; जोशीपणाची वृत्ति; जोसकी. [सं.] ०चक्र—न. नक्षत्रगोल. [सं.]

ज्योतिषी—पु. १ ज्योतिःशास्त्रज्ञ; खगोलविद्यावेत्ता. २ फलज्योतिष सांगणारा; जोशी; गणक. 'पढोनि मुहूर्तचिंतामण। जाला ज्योतिषी ब्राह्मण।'—मध्व ४३२. [सं.]

ज्योतिष्टोम—पु. १ ज्यांत सोळा ऋत्विज लागतात असा एक यज्ञविशेष, अग्निष्टोम. २ (निंदार्थी) मोठा डौल; जंगी तयारी असणारें काम. [सं. ज्योतिस्+स्तोम]

ज्योतिष्मान्—वि. तेजस्वी; तेजःपुंज; चकचकीत; सुंदर; प्रकाशमान. [सं.]

ज्यो(ति)ती-त—न. १ जोत पहा. उजेड; तेज; चकाकी; प्रभा; प्रकाश. २ वात. ३ (काव्य) रूप. 'तुका म्हणे होती। तुझी माझी एक ज्योति।'—तुगा ३७७२. ४ पाणी; तेज (रत्नाचें). 'तैसीच हिरियाची ज्योती।'—यथा २.६४०. [सं. ज्योतिस्] ०रूप-स्वरूप—न. प्रत्यक्ष प्रकाश; स्वयंसिद्ध प्रकाश. परमेश्वरास हा शब्द लावितात. ज्योतिर्लोक—पु. आकाशांतील नक्षत्रलोक. [सं.] ज्योतिर्लिं(लिं)ग—पु. शिवाचें लिंग; हीं १२ आहेत. बारा ज्योतिर्लिंग पहा. 'सत्य ज्योतिर्लिंगें बारा। प्रातःकाळीं स्मरण करा।' भूपाळी ज्योतिर्लिंगाची पृ. १०. ज्योतिर्विद्या—स्त्री. ज्योतिःशास्त्र. ज्योतिःशास्त्र—न. सूर्यचंद्र, ग्रहतारे इ० आकाशांत संचार करणारे दिव्य पदार्थ अथवा ज्योती, यांच्या वास्तविक व भासमान स्थिती व गती, त्यांचीं वास्तविक स्वरूपें, आकार व घटना इ० गोष्टींविषयीं अवलोकन व अनुमान यांवरून होणारें ज्ञान हा ज्याच्या विवेचनाचा विषय असें शास्त्र; खगोलशास्त्र; फलज्योतिषशास्त्र. [सं.]

ज्योत्स्ना—स्त्री. चांदणें; चंद्रप्रकाश; कौमुदी. [सं.]

ज्वर—पु. ताप. पुढें दिलेल्या शब्दांसंबंधानें वैद्यांमध्यें फार मतभेद असल्यानें ते येथें सार्थ दिले आहेत. ज्वराचे प्रकार—ऐकाहिक ज्वर—१ रोजच्या रोज येणारा ताप. २ एकामागोमाग चढउतार होणारा ताप. द्व्याहिक ज्वर=१ दोन दिवसांच्या अंतरानें येणारा ताप. २ रोज दोनदां भरणारा ताप. ३ फक्त मध्यें एकच दिवस न येणारा ताप. त्र्याहिक ज्वर=१ तिसरे दिवशीं येणारा (मध्यें दोन दिवस अगदीं न येणारा) ताप. २ प्रत्येक तिसऱ्या दिवशीं येणारा. ३ तीन दिवस सतत येणारा. चातुर्थिक ज्वर=चवथ्या दिवशीं येणारा ताप. आतां माधवनिदानाच्या मतें—ऐकाहिक—चढउताराचा ताप. द्व्याहिक—एक दिवसाआड येणारा ताप. त्र्याहिक—दोन दोन दिवस सोडून येणारा ताप. चातुर्थिक—चवथ्या दिवशीं येणारा (याबद्दल मात्र सर्वांचें एकमत आहे). मात्र सतत-

ज्वर व संततज्वर यांमध्यें भेद आहे. सततज्वर=चढउतार होणारा ताप. संततज्वर=एकसारखा सतत येणारा. अन्येद्युः=रोज भरणारा ताप; ऐकाहिक ज्वर. [सं.] सामाशब्द–०पाच(चा)वा–पु. १ ताप निघाल्यावर लगेच हिंडाफिरावयास लागल्यावर पुन्हां उलटलेला ताप. पाचावा पहा. २ दृष्टीनें उलटलेला ताप. ०विपाक–पु. तापाचा भर; ऐन जोरांत असलेला ताप. विपाक पहा. [सं.] ०सृष्टि–स्त्री. तापाच्या गुंगीमुळें पडणारें स्वप्न, होणारा भास. [सं.] **ज्वरांकुश**–पु. तापावरील एक औषध. [सं.] **ज्वरातिसार**–पु. तापाबरोबरचा अतिसार; हगवण. [सं.] **ज्वरांश**–पु. तापाची कसर; कणकण; तापाचीं लक्षणें. [सं.] **ज्वरित, ज्वरी**–वि. ताप आलेला. [सं.]

**ज्वलज्जहाल**—वि. जहालापेक्षां जास्त; सरकारविरोधी; कडक जहाल; क्रां. (इं.) रॅडिकल. –सुदे. [सं.]

**ज्वलन**—न. १ पट; जळणें; दहन. २ विस्तव; अग्नि. ३ जळण; लाकूडफांटा. [सं.]

**ज्वलित**—वि. १ जळत असलेलें. २ जळलेलें; दग्ध झालेलें. [सं.]

**ज्वल्प**—वि. १ त्वेष; संताप; क्रोध; राग. २ दुर्गंधि; घाण. ३ भीति; धाक; भयाची प्रबळ भावना [जळप]

**ज्वात**—न. (कु.) औत; जोत पहा.

**ज्वान, ज्वानकट्टा, ज्वानपट्ठा, ज्वानमर्द, ज्वानमर्दी, ज्वामर्दी, ज्वा(नि)नी, ज्वानीदिवानी**—जवान इ० पहा. 'अंगीं तारुण्याचा बहर ज्वानिचा कहर, मारिते लहर, मदन तल्वार।' –राला ११३. [फा. जुवान्–नी; सं. यौवन]

**ज्वामर्द, ज्वामर्दी**—जवानमर्द–मर्दी पहा.

**ज्वार, ज्वारी**—स्त्री. जोंधळा पहा. [प्रा. जोवारि] ०भडकणें–(व.) ज्वारी वाळणें.

**ज्वाला, ज्वाळ–ळा**—स्त्री.ज्योत; जाळ; अग्निशिखा; जळत असणारा विस्तव. [सं.] ०ग्राही–वि. जळणारें; जळण्याला योग्य; जलद पेट घेणारें [सं.] ०पटल–न. ज्वालांचा समुदाय; आगीचा डोंब; आगीचा झोत [सं.] ०माळी–पु. अग्नि. [सं.] ०मुखी–पु. पृथ्वीच्या पोटांतील उष्णतेमुळें वायु व तप्तरस ज्या पर्वताच्या तोंडावाटे बाहेर पडतात तो पर्वत. –स्त्री. एक देवी. हिच्या मुखांतून ज्वाला निघत असते.

---

# झ

**झ**—वर्णमालेंतील नववें व्यंजन. याचे ज या वर्णाप्रमाणें दोन उच्चार आहेत. एक तालव्य. उदा० झिंगणें, झंकार व दुसरा दंततालव्य. उदा० झटणें, झगा इ०. अक्षरविकासः–या अक्षराचीं जैन व दक्षिणी अशीं दोन वळणें आहेत. प्रस्तुत वळण दक्षिणी आहे. या वर्णाची पहिली अवस्था अशोकाच्या गिरनार शिलालेखांत, दुसरी पुळुमायी याच्या लेखांत, तिसरी राजाशिवगणाच्या कोटा लेखांत (सन ७३८) व चौथी अवस्था इ. सन ११ व्या शतकांतील एका हस्तलिखित पुस्तकांत सांपडते. पांचव्या अवस्थेंतील झ चवथीपासून तयार झालेला दिसतो.

**झऊल**—वि. (ना.) (अशिष्ट). लफंगा; थापेबाज. ०पणा–पु. (ना.) थापेबाजी; लफंगेपणा.

**झक**—स्त्री. १ (ह्या शब्दाचा निराळ्या अर्थीं उपयोग होतो. पण मूळचा अर्थ सं. झष=मासा यावरून निघाला असावा). मासा. २ (ल.) वाईट गोष्ट; निंद्यकर्म. [सं. झष=मासा; हिं. झक=मूर्खपणा; पागलपणा; सं. झष्=मारणें, दुखविणें; अर. झक्=फसविणें] (वाप्र.) ०मारणें–(अशिष्ट) १ ढोवळ चूक करणें; मूर्खाप्रमाणें वागणें. २ निंद्यकर्म, व्यभिचार इ० करणें; लोकसंप्रदायाविरुद्ध वागणें. 'तो आईबापांचें ऐकत नाहीं, झक मारतो.' ३ करूं नये ती गोष्ट केली असें कबूल करणें किंवा कबूल करून तिच्याबद्दलचा दोष आपल्या पदरांत घेणें. 'मी तुझ्या कारभारांत पडलों, झक मारली.' (एखादी गोष्ट) झक मारीत–झक(क)त करणें–जाणें–देणें–येणें–इच्छा नसतांहि नाईलाज म्हणून करणें–जाणें इ० आपसुख, चुंबीत करणें इ० 'या भरवसेनें दवडिलें लुब्धा। येईल झकमारु म्हणोनि।' –दावि ४४०. झकत पहा. **झकमारीत राहणें**–भीक मागणें; नाइलाज म्हणून हात चोळीत बसणें; बोंबलत राहणें. 'मागें दौलत किल्ले स्वामींचे स्वामी घेतील. कर्जदार झक मारीत राहतील.' –ख १.१७७. [तुल० अर. झकात्=भिक्षा] **झक मारून झुणका खाणें**–(क.) झकमारणें; मूर्खपणा करणें; झकचे आणखीहि ग्राम्य अर्थ आहेत.

**झक**—स्त्री. झांक; चमक; दिपविणारा प्रकाश. 'झक पडे नयनीं। जाय निघोनि।' –दावि १७८. –वि. झक; भपकेदार; चकचकीत; झगझगीत; लख्ख. 'झळकत झक झळ घनदामिनी।' –दावि ४९६. [ध्वनिसादृश्यावरून अनुकरणवाचक शब्द; सं. चकास्, चक; हिं. झक=साफ, चकचकीत, चमक, झांक] ०कणकन–कर–दिनीं–दिशीं–क्रिवि. एकदम चमकून; तेज पाडून; झकाकत; लकाकत.

**झककणें**—अक्रि झळकणें; झकाकणें; चकाकणें. 'शेषफणांची आकृती। हिरेजडीत झककती।' –ह ३४.११८. [झक द्वि.]

**झकझक-झकी**—स्त्री. चकाकी; तेज; चमक; लकलकी; झळक (अग्नि, तारे, वगैरेची).—वि. लखलखीत; चकचकीत; प्रकाशमान; झळकणारें. [झक द्वि.] **झकझक-झकां**-क्रिवि. लखलख करीत; चकचकत; झळकत. **झकझकणें**—अक्रि. चकाकणें; झगझगणें; लखाखणें; लखलखणें; चमकणें. [झकझक] **झकझकाट**—पु. लखलखाट; चकचकीतपणा; चकचकाट; अतिशय प्रकाश. **झकझकीत**—वि. चकाकणारें; तेजस्वी; झळकणारें; लखलखणारें; चकचकीत. [झकझक]

**झकटणें**—अक्रि. (काव्य.) १ घसटणें; (जातांना, येतांना) घासून जाणें; चाटून जाणें; घसवटून जाणें. २ झगडणें; भांडणें; कलह करणें. झगडणें पहा. [देप्रा. झगड=कलह]

**झकणें**—अक्रि. १ विस्मित होणें; मोहून जाणें; घोंटाळणें; फसणें; दिपून जाणें; थक्क होणें; चकणें. 'येती ना द्विज केवळान्वय झके कृष्णापुढें द्वारके।'—आसु १८. २ मोहून, भुरळून, हुरळून, गोंधळून जाणें; चुकणें; भटकणें; मार्ग सोडून जाणें; वहकणें; चकणें; फसणें. 'देखोदेखी गुरु करिती। शिष्य शिणती। गुरुची परिक्षा नेणती। झकोनि जाती।'—दावि १३५. [सं. स्थगू?]

**झक(क्क)त**—क्रिवि. अवश्य; निरुपायास्तव; झकमारीत; चुंबीत; आपोआप. हा शब्द सर्व क्रियापदांचा गुण दाखवितो आणि पुरुष व वस्तु यांस लागतो. झक पहा. [झक; सं. घक्ति-धिगर्थेघक्ति-झक्ति-झकत. —रा माअ १८३४.] **म्ह॰** नाक दावलें म्हणजे झकत तोंड उघडेल.

**झकपक, झकमग, झगमग**—स्त्री. १ चकाकी; झळकी; चमक. २ साफसुफी; चकचकीतपणा. ३ नीटनेटकेपणा; टापटीप. —वि. साफसूफ; चकचकीत; लख्ख. [झक द्वि.; सिं. झिगिमिगि]

**झकमक**—स्त्री. चकमक; भांडण; खटका; खडाजंगी. (क्रि॰ झडणें). 'झकमक सुरू झाली कीं अशा धातभ्या निघायच्याच.'—सुयप्र २३५. [चकमक]

**झकवण-वणी, झकवणूक**—स्त्री. १ फसवणूक; ठकवणूक; भुलथाप. २ फसले गेल्याची स्थिति, प्रसंग. [झकविणें]

**झकव(वि)णें**—उक्रि. १ दिपविणें; मोहून टाकणें. २ (ल.) चकविणें; भुलविणें; नादी लावून झुलविणें; फसविणें. 'साचचि तुटलेआ कणवा। तुम्ही लटकें न झकवा।'—ऋ १०२. 'तयापरी पैं देवा। मज झकों न येसी मावा।'—ज्ञा १.२३२. [झकणें प्रयोजक]

**झकवाद**—पु. १ शुष्क वाद; वितंडवाद. २ लपंडाव; फसवेगिरीचें भाषण; ठकवाद. ३ मिथ्यावाद; अहितकारी भाषण, उपदेश. 'आणीक कोणाचे झकवादीं। वावरों नेदीं मानसा।'—मुसभा १२.३४. 'म्हणोनिया स्त्रियेचे बुद्धी। जो नर लागे झकवादीं। तो नासेल अथवा त्रिशुद्धि। पडेल पतनीं।'—कथा ५.८.४७. [झकणें=फसणें+वाद]

**झकाकणें**—अक्रि. अतिशय झकझकणें; चकाकणें; लखलखणें; लकाकणें; झळकणें. 'सतेजीक तेज झकाकी लखाखी।'—राक १.९०. [झकझकणें; सं. चकास्]

**झकाकी**—स्त्री. चकाकी; चकचकाट; झगझगाट; तेजस्विता; तकाकी. [झकझकी]

**झकाकीत-कत**—वि. १ चकचकीत; तेजःपुंज; सतेज. २ सफाईदार; तजेलदार.

**झकाझक-झकां**—क्रिवि. १ धडाधड; खळखळ; खडोखडीं; झडझडां (पैसा येणें-जाणें). २ एकदम व एकसारखें; गप्पदिशीं 'झकाझक डोळे झांकतात.. झोंप येते.' [ध्व. अनुकरण]

**झकाझकी**—स्त्री. झकाकी; भपका; पोकळ डौल. 'झकाझकी झकों नका। ठकाठकी ठकों नका।'—दावि २०८. [झक=प्रकाश द्वि.]

**झकाझकी**—स्त्री. भांडण; झगडा. झकमक पहा.

**झकाझोक**—स्त्री. ऐट; नखरा; डौल; थाटमाट; नटनथटन डौलानें जाणें. (क्रि॰ लावणें; मांडणें, करणें; बनून चालणें). [झक+झोक]

**झकार**—स्त्री. (ना.) उष्ण हवेची लपेट.

**झंकार**—पु. झणझण, घणघण असा आवाज; झणत्कार; छुन्, छुन् आवाज (घंटेचा, किंवा नाचणाराच्या पायांतील घुंगरांचा, वाद्यांचा इ॰). 'जेसें निरंजनीं उठे झंकारा।'—दावि ६८. [सं. ध्व.]

**झकारपटी**—स्त्री. (गो.) खरडपट्टी; खडसावणी; खरपूस समाचार.

**झकास-शा**—वि. १ चांगला; उत्कृष्ट; भारू. २ (कु.) ऐटबाज; डौलदार. ३ चकचकीत. [सं. [illegible]]

**झक्क**—वि. १ चक्क; लख्ख; [illegible] चांगलें दिसणारें. २ झकास पहा.

**झक्क**—पु. (माण.) मासा. (क्रि॰ मारणें). [सं. झष]

**झक्क-कण-कन-कर-दिनीं-दिशीं**—क्रिवि. झकमध्यें पहा.

**झक्कड**—स्त्री. झगडा; झकमक. —वि. स्वच्छंदी; हेकेखोर; हट्टी; दुराग्रही. [हिं.]

**झक्की**—वि. (व. ना.) लहरी; छांदिष्ट [हिं; तुल॰ सिं. झकी=वडवडया]

**झक्कू**—पु. १ (विटीदांडूचा खेळ) एक संज्ञा; गुण (मार्क) मोजण्याचा परिमाणवाचक शब्द; एक संबंध डाव; गेम; वकट, लेंड इ॰ जिंकल्यावर डाव लागू होऊन एक झक्कू होतो. २ (कर.) उतारीच्या रंगाचें पान नसल्यास दुसऱ्या रंगाचें पान टाकून

भारी पानवाल्याला डावांतील सर्व पानें घ्यावयास लावण्याची क्रिया; झक्कू या अर्थी चुकीचा प्रयोग. 'दुर्री टाक म्हणजे झक्कूची व्याद टळेल.' ३ (अश्लील) मैथुन; स्त्रीसंग; संभोग.

**झगझग, झगझगणें, झगझगाट, झगझगीत, झगझगी**—झकझक इ० पहा.

**झंगट**—न. एक वाद्य; तास. जेंगट पहा. 'तूं प्रथम झंगट वाजीव.' —वाय १.२. [ध्व]

**झंगट**—न. लचांड; मानगड; झेंगट पहा.

**झगटणें**—उक्रि. १ जोरानें पकडणें; धरणें; कवटाळणें. २ जोरानें पुसणें, घासणें. ३ झाडणें; झटकणें 'हस्तीं झगटी कवरीभार।' —नव २०.१८. —अक्रि. १ जोरानें झोंबणें; चिकटणें दावणें; खेटणें; भिडणें; विलगणें. 'ब्रह्मविद्ये झगटैली। परा वाचरैली।' —ऋ ५९४. २ झगडणें; भांडणें; (एकाद्यावर) चालून जाणें; जोरानें हल्ला करणें; तुटून पडणें; भिडणें; वाद करणें; अदळणें पहा. 'मेरु मांदर झगटले। तैसे रथ अतिरथ दगटले।' —एरुस्व ११.२४. ३ जडणें; वेधणें. 'माझ्या स्वरूपीं झगटलें मन।' —एभा १४.१६२. [ध्व. हिं. झगडा, झगडणें पहा]

**झंगड**—स्त्री. १ तास; वाद्य. जेंगट पहा. २ वाद्यांचा गजर, कडकडाट. (क्रि० उठणें; लागणें); गोंगाटानें युक्त असें भांडण, वादविवाद; कल्लोळ; गोंगाट; खडाजंगी. (क्रि० लावणें; मांडणें; चालणें). ३ (व्यापक) (मेजवानींतील पदार्थ, गाणें, वजावणें, नाचणें इ० कांची) विपुलता; चंगळ; लयलूट. —क्रिवि. जोरानें; मोठ्या आवाजानें; कलकलाटानें; दणदणाटानें (तंतुवाद्यें इ० वाजणें). 'झंगट झंगट नौवत वाजे। तें एथेच साजे।' [ध्व]

**झगडणें**—अक्रि. १ भांडणें; तंटा करणें; वादविवाद करणें; हुज्जत घालणें; लढणें. २ विलगणें; झोंबणें; झगडणें. [दे. प्रा. झगड=भांडण; का. जगळ; हिं. झगडना; सिं. झगिडो]

**झगडा-ड**—पुस्त्री. १ तंटा; भांडण; कलह. २ कज्जा; मुकद्दमा; खटला. ३ लढाई; युद्ध. 'तो दुःशासन राया सहदेवा वधुंसीं करी झगडा।' —मोकर्ण ९.६. ४ (नाटक) दोन पात्रांचा संगीत वादविवाद, संवाद, छक्कड. 'अग न्या पुष्कळ संगीत झगडे ...संगीत छक्कडी पाहिल्या आहेत.' —संगीतघोटाळा ५.५ (ल.) एकरूपता; मिश्रण. 'राजहंसापुढें। चांचूचें आगरडे। तोडी जेवीं झगडें। क्षीर नीराचे।' —ज्ञा १४.२०७. [ध्व. देप्रा. झगड; का. जगळ; हिं. झगडा; गु. झघडो; सिं. झगिडो]

**झगडाऊ-ळू**—वि. भांडखोर; भांडकुदळ; कलहप्रिय; तंटेखोर; ०झगड—स्त्री. १ भांडाभांडी (सामुदायिक, सार्वत्रिक); जोराचें भांडण, कज्जा. २ मुकद्दमा; खटला. ०रगडा—पु. खडाजंगी; धडकाधडकी; गलबल्यानें युक्त असें मोठें भांडण. [झगडणें+रगडणें]

**झगडी**—विस्त्री. भांडखोर; तंटेखोर; भांडकुदळ. 'वासनाबायको शेजारीण। झगडी कुटील मोठी दारुण।' —भज २१.

**झगडेकार**—वि.(गो.) भांडणारा; तंटेखोर; कलहप्रिय. [झगडा+करणें]

**झगमग**—स्त्री. १ चकाकी; लकाकी; झकमग पहा. 'दीपाचिया झगमगा। जाळील हें पतंगा।' —ज्ञा १३.७४०. —वि. लखलखीत; चकचकीत. —शर. [झक द्वि.]

**झगमगणें, झगमगी, झगमगीत, झगागणें, झगागी, झगागीत**—झकझकणें इ० पहा.

**झगमगणें**—अक्रि. झळकणें. 'केशर कस्तुरी भाळीं झगमगिताहे।' —सप्र ४.१७.

**झगमगी**—स्त्री. चकाकी; तेज. 'देखोनि दीपरूप झगमगी। उपभोगबुद्धी पतंगीं।' —एभा ८.८९

**झगमगीत**—वि. तेजस्वी; तेजःपुंज. 'त्रयोदश वर्षे रजनींत। झगमगीत होते पैं।' —पांप्र ३६.३३.

**झगरे-री**—नस्त्री. १ पेटविलेल्या गोवऱ्यांचा, रखरखीत निखाऱ्यांचा ढीग (स्वयंपाकासाठीं, शेकण्यासाठीं); २ (चि.) थोडासा विस्तव असलेली तप्त राख. ३ (सामा.) शेकोटी; आगटी. 'शेतांतून शेतकरी लोक शीतनिवारणार्थ मोठमोठ्या झगऱ्या पेटवून समोंवतीं वसले होते.' —मौनयोवना, आवृ २. पृ. २१५. [ध्व. झग=अभिप्रकाश धग=विस्तव]

**झगलें**—न. लहान मुलांचा झगा; झबलें. [झगा. अल्प. हिं. झंगुली]

**झगा**—पु. १ पायघोळ आंगरखा. 'पाळी येकला त्रिजगा। अंगीं पिवळा झगा।' —मध्व ३५. २ मागें गुंड्या असलेला व कमरेजवळ चुण्या असलेला मुलींचा गळ्यापासून पायांपर्यंतचा परकर. राजव्यवहारकोशांत याला प्रतिशब्द कंचुकी असा दिला आहे. —राव्यको २.२५. [अर. जुब्बा; फा. जुबा; तुल० सं. झग्= झांकणें]

**झगागी**—स्त्री. झगी; झकाकी पहा.

**झगाझगी**—स्त्री. (माण.) झोलाझोली; टोलवाटोलवी.

**झगार**—न. १ पावसाची अंधारी; मळभ; आभाळ; मेघांचें अवडंबर. (क्रि० येणें; उठणें; निघणें; घालणें). २ अभ्रपटल; ढगांचा समुदाय; मोठा ढग. ३ पावसाची सर. (क्रि० पडणें)

**झगी**—स्त्री. चकाकी; तेज; झांक; झकाकी. 'जेवीं कां शिंपीचे अंगीं। जडली रुपेपणाची झगी।' —एभा २२.२३९. [झक-ग]

**झंजर**—पु. (गो.) धुंगूर. [ध्व; सं. झर्झर; प्रा. झज्झर= वाद्यविशेष]

**झंजळणें**—अक्रि. (व.) रागावणें; संतापणें. [सं. प्रा झंझा]

**झंजा(झा)पवन–मारुत–वात–वायु–समीर**—पु. पर्जन्ययुक्त वादळ; सोसाट्याचा वारा; वादळ; वावटळ; अतिशय जोराचा, गर्जना करणारा वारा; तुफान. 'जैसा प्रकटतां झंझामारुत। जलद्जाल वितुळे.' —ह १.२०. 'शिरला कौरवकटकीं जैसा झंझासमीर तरुनिकरीं।' —मोभीष्म ७.१६. [सं. झंझा=वाऱ्याचा, पावसाचा आवाज; वादळ+मारुत=वारा]

**झंझट**—न. (ना.) झंगट; लचांड; शुक्लकाष्ठ; व्याद. [जेंगट पहा]

**झझणा**—पु. (व.) पंखा; विंझणा. [सं. वीजन; म. विंझणा]

**झट**—न. लचांड; लोढणें; लिगाड; खेंकटें; झेंगट; उपाधि; पायगोंवा (मनुष्य, प्रसंग, स्थिति याकडे उपयोग). इतर अर्थी लचांड पहा. 'मच्छनाथ म्हणे आलें होतें झट। परसरामभट दवावीलें।' —मच्छ ७६. —स्त्री. १ आघात; धक्का; धुसणी; ठोका; हिसका; प्रहार. (क्रि० लागणें). 'आदळतां मोहाचीं झटें। ज्याचा बोध कदा न पालटे।' —एभा २५.३३२. २ (व.) ठेंच; ठोकर [सं. झट्=संघातें] ०घेणें–(व.) वाल्टे रचणें; विनाकारण आरोप करणें. ०लावणें–(व.) कंटाळा येईपर्यंत गप्पा मारणें.

**झट, झटसा**—क्रिवि. लौकर; त्वरेनें; जलदीनें; झटकन; चुटकीसरशीं. 'तेव्हां भीम उठोनी गेला बाहेर तूर्ण झटसा रे।' —कीर्तन १.१८. [सं. झटिति; हिं. गु. झट; ध्व.] ०कन–कर–दिनीं–दिशीं–क्रिवि. लौकर; जलदीनें; त्वरेनें; चटकन; लगबग. **झटझट, झटझटा, झटाझट-टां, झटाटां**–क्रिवि. झटकन पहा. चपलतेनें; एका क्षणांत; झटक्यासरशीं; लौकर लौकर; पटपट. 'चला झटझटा वोसंडुनि वाट। पंढरी मूळ पीठ दूरी आहे।' —व ४५८. 'तो शंतशः पट झटपट फेडुनि भागे सभेंत वेडावे।' —मोसभा ५.८९. [ध्व. झट् द्वि.]

**झटक**—स्त्री. १ चटदिशीं जाऊन परत येणें; फेरफटका; फेरा; ये जा. (क्रि० मारणें). २ झटका; झटकारा; फटकारा; तडाखा. (क्रि० मारणें). 'हांसे देखोनि मातें झटक उठवितां काय सांगूं कपाळा।' —आक २९. [ध्व. झट्]

**झटकणें**—अक्रि. १ सटकणें; झडाडणें; झटकन् निसटणें; २ (एखाद्यापासून) विभक्त होणें; निराळें राहणें; संबंध तोडून वागणें; तुटक वागणें (या अर्थी हें क्रियापद सामान्यतः फटकणें या क्रियापदाला जोडून येतें. उदा० झटकून फटकून; राहणें, असणें). [झटक]

**झटकणें, झटकाविणें**—उक्रि. १ झाडणें (वस्त्र). २ वस्त्रानें झाडून टाकणें; फटकारा मारून, हिसडा देऊन झाडणें. ३ (धान्य, अग्नि इ० वर) वारा घालणें; फोल, कोंडा, इ० निघे असें करणें; पाखडणें. ४ पंखा इ० नें वारा घालून अग्नि प्रज्वलित करणें. ५ हिसडणें; हिसडा देणें; झटका देणें; झाडणें (हात पाय इ०). 'कटीस लटके हलके झटके विजयी भवानी तलवार।' —हिरकणी, स्वातंत्र्य शार्दूल. [झटक; हिं. झटकना; गु. झटकवुं]

**झटका, झटकारा**—पु. १ (काठी इ० कांचा) तडाखा; फटकारा; रट्टा; आघात. २ हिसका; हिसडा (हातानें, पायानें मारलेला). 'हातानें मारिन झटका।' —संग्रामगीतें ४७. ३ (वेदनेचा, दुःखाचा) आवेग; कळ; लहर; आंचका; तिडीक; चमक; करक. ४ (वाऱ्याचा) वेग; झपाटा; सपाटा; सोंसाटा. ५ (राग, वारा, संताप इ० कांचा). फणकारा; झणकारा. ६ झपाटा (भूत, पिशाच्च इ० कांचा). ७ झोंका; पाय मागेंपुढें होणें (नृत्यांतील). ८ (हाताचा, शरीराचा) हेलकावा; हेलावा; झोंक; झोल. ९ (शस्त्राचा) झपाटा; फटकारा; फेर; मंडळ. १० वस्त्राच्या शेवटाचा फटका; फटकारा. (क्रि० मारणें; देणें; बसणें). ११ (धान्य इ० सुपांत घालून किंवा पंख्यानें) फटकण्याची क्रिया; झडपण; पाखडणें. (क्रि० देणें). १२ (एखादा पदार्थ दुसऱ्यावर आदळल्यानें लागलेला) धक्का; दुसणी; आघात; (पडतांना लागलेला) ठोका; मार. (क्रि० लागणें). १३ (उन्हाची) झळ; तिरीप. १४ (रोग, जरीमरी, सांथ इ० कांचा) घाला; सपाटा; धाड (तापाचा पित्तविकार). १५ (पिकांवर पडणारा) तांबेरा, मेकाडा. १६ (व्यापारांतील) तोटा; धक्का; ठोकर. (क्रि० लागणें; बसणें; मारणें). वरील सर्व अर्थी 'झटकारा' शब्दापेक्षां झटका याचाच जास्त उपयोग रूढ आहे. [ध्व. झट; हिं. झटका] सामाशब्द– ०फटका–पु. १ सर्व अर्थी झटका पहा. २ (पावसाची) जोराची झड; झडी; वादळी पाऊस. ३ जोराचा सपाटा; दाब; जोर; झोल, तडाखा. ४ तगादा; नेट; लकडा (एखाद्या कामाचा, धंद्याचा). [झटका+फटका] **झटकारणें**–उक्रि. १ झटकणें; झाडणें. २ हिसडणें; ओढणें. ३ झिडकारणें; तिरस्कारणें; धिक्कारणें. [झटकारा] **झटक्यापटक्यांत**–क्रिवि. एका झटक्यांत; क्षणार्धांत; झट्दिशीं; झटक्यासरशीं. [झटक+पटक] **झटक्यासरशीं–सरसा**–क्रिवि. १ फटक्यासरशीं; फटकारा लागतांच; तडाखा बसतांच. २ एका हिसक्यासरशीं; एकदम ओढतांच. ३ एका उडीसरशीं, उसळीसरशी–सरसा. ४ जोरानें; चपलतेनें; झटकन. ५ (रागाच्या संतापाच्या) फणक्यानें; फणकाऱ्यानें; झणकाऱ्यानें. ६ एका आंचक्यांत; एकदम; एकाएकीं (प्राण जाणें, मरून पडणें).

**झटका**—पु. (तंजा, म्हैसूर) एका घोड्याची छकडेवजा गाडी. ही उंचीला कमी असून बरीच लांब असते.

**झटकाविणें**—उक्रि. झटकणें पहा. 'तें आपलें ऊर पाण्यांत बुडवून तीं भिजलेलीं पिसें धुळीवर झटकावतें.' —मराठी ६ वें पुस्तक (पृ. २५.) ६. आ २.

**झटझोंबट**—न. (व्यापक.) १ तंटेबखेडे; भांडाभांडी; भांडणतंटे. २ अडचणी; विघ्नें; खेंकटीं; लचांडें; पेंच; पंचाइती. [झट+झोंबट]

**झटणें**—अक्रि. १ (एखाद्या गोष्टीविषयीं) नेटाचा प्रयत्न करणें; आटोकाट यत्न करणें; मनापासून श्रम घेणें; 'धराया रायाचे भट झटत येतांचि जवळी।' –मोकृष्ण ६२.३४. २ (लढाईंत, भांडणांत एखाद्याच्या अंगाशीं) भिडणें; झोंबणें; लगट करणें; तुद्दल पडणें. 'तो गज गदाप्रहारें धृष्टद्युम्नें झटोनि लोळविला।' –मोशल्य ३.३७. [सं. झट्=गुंतागुंत होणें]

**झटपट**—स्त्री. १ त्वरा; घाई; जलदी; चपळाई; चलाखी (कामाची). (क्रि० घेणें; खाणें; धरणें; करणें). 'असें आळसावर करूं नको, थोडी झटपट घर.' २ झटापट; चकमक; खडाजंगी; हमरीतुमरी. (क्रि० उडणें; होणें). 'स्पर्धा खटपट आणी चटपट। तऱ्हे झटपट आणी वटवट।' –दा २.३.७. –क्रिवि. त्वपकर; झटदिशीं; चटकन; तडकाफडकी; लौकर; [ध्व. देप्रा. झडप्पड=त्वरकर]. **झटपट्या**—वि. चलाख; चपळ; झपाट्यानें काम करणारा. [झटपट]

**झटा**—पु. झटापट; झुंज झट पहा. 'वोलके पहिलवान कळकटे। तयासीच घ्यावे झटे।' –दा १९.९.१९. [सं. झट्=संघातें]

**झटाडणें**—अक्रि. लागणें; चिकटणें. 'लोखंड परिसा झटाटलें जेव्हां।' –व ४४६. [झटा पहा]

**झटापट-पटी**—स्त्री. १ भांडण; कलह; रागाचा वादविवाद; झटपट. (क्रि० उडणें; झडणें; लागणें; होणें; लावणें; करणें). २ घोंटाळा; घाई; गोंधळ; धावदौड; धांदल. ३ स्पर्धा; अहमहमिका. [ध्व. सं. झट्+पट्]

**झटाळ**—न. झट; झेंगट; लचांड. झट पहा. [झट]

**झटा(ट्या)ळ-ळी**—वि. नाना तऱ्हेच्या युक्त्या, हिकमती, कल्पना लढविणारा; युक्तीबाज; मसलत्या. २ कर्जबाजारीपणामुळें अनेक लचांडें मागें असलेला; पेचांत सांपडलेला. ३ झोंट; झोंड; निर्लज्ज; अप्रामाणिक. ४ (व) गळपट; चिकट; चिवट. 'ही आसामी झटाळ आहे.' [झट+आळ प्रत्यय] **म्ह०** झटाळ शेट आणि फटकाळ नगरी=मनुष्य किंवा स्थळ यांची दुर्व्यसनता दाखवितांना योजतात. **झटा(ट्या)ळी**—स्त्री. झटाळ माणसाची वृत्ति, धंदा; झटाळपणा.

**झटें**—न. १ ढोसणी; ओढाताण; झोंबी; झुंज; झट पहा. 'वसवीतीं कपाटें। डोंगरां देइजेति झटें।' –ऋ ७९. 'अहो तान्हयाचे लागतां झटें। तेणें अधिकचि पान्हा फुटे।' –ज्ञा ९.१८. २ (ल.) ऐक्य; एकरूपता. 'तंव महाभूतांची जवनिक फिटे। मग दोहींसि होय झटें।' –ज्ञा ६.३०६. [झट]

**झटेपटे, झट्टेपट्टे**—न. अव. अटापीट; उरस्फोड; दगदग; अटाआट; यातायात. (क्रि० खाणें; घेणें; सांपडणें). [झटापट]

**झटेल-ली**—वि. वात्रटपणाच्या, खोडकरपणाच्या गोष्टी करण्यांत पटाईत; पूर्ण हिकमती; त्रासदायक; उत्पाती. झटाळ, झटधाळ पहा. [झट]

**झट्टी**—स्त्री.(गो.) १ नाटकाची तालीम. २ परवचा; उजळणी.

**झड**—स्त्री. १ पावसाची एकसारखी वृष्टि; झिंबड; पर्जन्याचा संतत वर्षाव; त्यावरून २ (ल.) एखाद्या वस्तूचा सारखा वर्षाव. (क्रि० लागणें; बसणें). 'भीमावरि न गणुनि शरवृष्टीची झड करी करी लगट।' –मोद्रोण २.४६. ३ जोराच्या पावसाचे उडणारे तुषार; वावझड; शिंट. ४ (ल.) पावसाचे तुषार आंत येऊं नयेत म्हणून दार, खिडकी, पागोळ्या इ० कांवर बसविलेलें झडप, तट्टया, पाखाटी, छप्पर, हाथरी (सुपारीच्या झाडाची चुडतें). ५ (घार, गिधाड इ० हिंस्र प्राण्यांची) झडप; झपेट; झांप. ६ (ल.) धांव; उडी; झडपडा (एखादी वस्तु मिळावी म्हणून घातलेला) उत्कंठेनें घातलेली उडी; झेंप. 'झडकरि झड घाली धांव पंचानना रे।' –रामदास, करुणाष्टकें (७. नवनीत पृ. १७०.) ७ एका वस्तूवर एकाच कालीं अनेकांची प्रवृत्ति. (क्रि० घालणें; करणें; पडणें; लागणें). 'एकच विहीर पडली त्यामुळें सर्व लोकांची झड पडते' ८ (एकामागून एक येणाऱ्या गोष्टींची, माणसांची) माळका; परंपरा. (क्रि० लागणें; पडणें). [ध्व. प्रा. दे. झडी=निरंतर वृष्टि]

**झड**—स्त्री. १ (डोक्याचे केंस, झाडांचा मोहोर, पानें इ० कांचें एकसारखें) गळणें; पड. २ (ल.) (शरीराची क्षय इ० कानें होणारी) झीज; क्षय; क्षयरोग. (क्रि० घालणें; लागणें; पडणें). [झडणें पहा].

**झड**—स्त्री. त्वरा; जलदी; घाई; 'पांचाळ देखूं लंघौनीं। पातलासे झड वरौनि।' –शिशु २३६. [सं. झटिति; प्रा. झडि]

**झड**—स्त्री. झुंज; लगट; झोंबाझोंबी; हल्ला. 'ज्याच्या शरीरबळाचें कोड। एकला लक्षांवरी दे झड।' –एभा १७.१३९. [सं. झट्; म. झट] **झडे येणें**—अक्रि. लोभाविष्टपणें मागें लागणें. 'तो गुरु नव्हे भिकारी। झडे आला।' –दा ५.२.२०.

**झड**—स्त्री. (गो.) पिशाचबाधा.

**झड**—वि. (गो.) हट्टी, झोंड; झट. हूड. [झोंड]

**झडकणें**—सर्व अर्थी झटकणें पहा. विशेषतः झाडणें क्रियापदाच्या पुढें योजतात. उदा० झाडून झडकून ठेव (धान्य, विस्तव इ० घर).

**झड-कन-कर-दिनीं-दिशीं**—क्रिवि. झटकन इ० पहा.

झडकर, झडके—क्रिवि. झपाट्यानें. –शर. झडकन पहा.

झडकरी–करून—क्रिवि. (काव्य) लौकर; झटकन; जलदीनें; त्वरेनें. 'ते वेळीं अर्जुन म्हणतसे देवा। आतां झडकरी रथु पेलावा।' –ज्ञा १.१६९. 'संतोषोनि बोले रमारमण। भीमा येईं झडकरून।' –जैअ १०२१.

झडका—वि. क्षीण झालेलें; रोडावलेलें; झडलेलें (शरीर, पानें). [झडणें]

झडकारणें–काविणें—झिडकारणें पहा.

झडगें—न. (क.) भाताची एक जात.

झडझड–झडां—क्रिवि. १ जलदीनें; झरझर; घाईनें; लगवगीनें. झटझट–टां पहा. 'उठोनि झडझड पळती जन।' –दावि ३१०. 'फीटतु सांवरीतु आहे कासोडा। तेवींची चालत आहे झडझडां।' –उषा १८४७. २ धडधड, झडझड असा आवाज होऊन 'वायो झडझडां वाजे।' –दा १३.९.३६. [सं. झटिति; प्रा. झडि; म. झड द्वि.]

झडझडणें—अक्रि. १ (एखाद्याच्या अंगावर) वसकन् येणें; वसवसा करणें; तिडतिडणें; खिसखिसणें (वर–शीं–अंगावर या शब्दांबरोबर प्रयोग.) २ (एखाद्या कामावर) तुटून पडणें; झपाट्यानें लागणें. [ध्व. झड–वृष्टि द्वि.] झडझडया–वि. १ (एखाद्यावर) वसवस करणारा; अंगावर येणारा; तिडतिडया; खिडखिडया. २ जोरानें धडाक्यानें काम करणारा; कामावर तुटून पडणारा; झटझटून कामास लागणारा. [झडझडणें]

झडझडाट—पु. १ जोरानें वाहणाऱ्या वाऱ्याचा आवाज, वेग, सोसाटा. 'झडझडाटें सुटला वारा।' –मुआदि २६.८१. २ घोष; गर्जना. ३ (ल.) अस्तित्वाची मोठ्यानें जाणीव करून देणें. 'माजीं वेदांचा पाला दाट। तो करी सुविद्येचा झडझडाट।' –ज्ञा १५.१९२. [ध्वं. झडझड]

झडझडीत, झडझडून—क्रिवि. १ अर्थाला अधिक जोर आणण्याकरितां झाडणें या क्रियापदापूर्वी योजतात. उदा० खोली झडझडीत, झडझडून झाड. २ जलदीनें; त्वरेनें; झडकरी पहा. (क्रि० बोलणें; चालणें; पळणें; धावणें; देणें; मारणें; करणें इ०). ३ झिडकारून; झाडून. 'सोडुनि सूत सुयोधनपक्षातें झडझडोनि वा। निघ रे।' –मोउद्योग ११.१५. [ध्व. झड द्वि.]

झडझोंबट—न. झटझोंबट पहा.

झडणें—अक्रि. १ (डोक्याचे केंस, शरीराचे अवयव, फळें, पानें इ०) एकसारखें गळणें; गळून पडणें; तुटून पडणें. 'हे हातपाय झडून जावोत.' –नामना ८३. २ झिजणें; क्षीण होणें; रोडावत जाणें. 'आठ दिवस छटाकी बंद होतांच बावांचें दोंद झडलें.' ३ (रंग, चित्रें, लेखन इ०) निस्तेज, फिकें होणें. ४ (ल.) अंग चोरणें; अंग संकुचित करणें. 'कागद झडतांहि झडावें। नलगेचि अक्षर।' –दा १९.१.११. 'कुणी पदर वरून आड झडुन उभ्या राहती।' –प्रला २३२.५ तुटणें; छिन्न होणें. नाश पावणें. 'जरि जिव्हा जाय झडोनी।' (इमारत, छप्पर, व्यवस्था, संस्था इ०) मोडणें; ढासळणें. [सं. शद् प्रा. झड; म. झड] झडणी, झडणूक–स्त्री. झडण्याची गळण्याची, गळून पडण्याची क्रिया. [झडणें]

झडतपडत–क्रिवि. (प्र.) पडतझडत. १ सांडतसांडत; गळतगळत; टपकतटपकत; झरतझरत (गवत, पानें, वाळू, राख इ० नेत असतांना). २ धडपडत; कष्टाकष्टानें; ठेंचाळत; मोठ्या दुःखानें; कसें तरी. [झडणें+पडणें]

झडणें—अक्रि. १ (चौघडा, झांज इ० वाद्यें वादविवाद इ० जोरानें) वाजणें. 'झडे चौघडा अंबेचे पुढें।' –पाळणेसंग्रह पृ. ६. २ (बंदुका इ०) उडणें; धडाडणें. ३ (सैन्याचा किंवा नोकरीचा) पगार ठरल्या वेळीं महिन्याचा महिन्यास मिळणें; मराभर, एकसारखा पैसा येण्याचा क्रम सुरू असणें; अखंड पैसा मिळत असणें.

झडती—स्त्री. झाडा पहा. १ (कायदा) (सामानांची, घरांतील कागदपत्रांची–पोलीस अधिकाऱ्यानें केलेली) बारीक तपासणी; झाडा; धुंडाळा. (क्रि० घेणें). (एखादी वस्तु सांपडण्याकरितां केलेला) शोध; तपास; धुंडाळा. 'सुरी सांपडली नाहीं म्हणून सगळ्या घराची झडती घेतली.' ३ सैन्यगणना. ४ (घरांतील जंगम मिळकत, उत्पन्नाच्या बाबी इ० कांची) मोजदाद; गणना; गणती; मोजदादीची, हिशेबाची तपशीलवार यादी किंवा तपासणी. 'झडती चिरंजीव राजश्री माधवराव नीलकंठ यांचें लग्न.' –भाग्ने १०.३.१६. ५ (पैसा, हिशेब, अन्नादिक पदार्थांची सामुग्री इ० कांचा) फडशा; फन्ना; बेबाक; निःशेषता. (क्रि० लावणें; देणें). ६ (सामा.) हिशेब; झाडा; उलगडा. 'जागों स्वाऽधर्माची वेती येथेंचि वीर ते झडती।' –मोकर्ण ३३.४३. ७ (गो.) ताळा. ८ खेड्याच्या मुलकी उत्पन्नाचा व खर्चाचा हिशेब; सदर हिशेबाचा कुळकर्ण्याजवळ असणारा तक्ता; मामलेदारानें हुजूरून नेमणूक बेहेडा व अजमास घेऊन त्या अन्वयें जी सरसाल प्रांताची वहिवाट केली त्या वहिवाटीचा मामलेदार तपशीलवार हिशेब तयार करी ती ९ (व) नाटकांतील भूमिकेच्या भाषणाचें लिखाण. 'झडती चांगली पाठ कर.' १० (व.) उठावणी; संपादणी; भूमिका घेतल्याप्रमाणें वागणें. 'सोंग घेतलें त्याची झडती दिली पाहिजे.' ११ (कु.) गणित; उजळणी. 'झडतीची तर मी एकोत्रीपर्यंत मजल गांठली होती.' –कुंजविहारी, मार्च १९२७. [झाज]

झडती—क्रिवि. लौकर; त्वरेनें; झपाट्यानें. 'नाना नीद धराया हातीं। घेऊनि उठिला झडती।' –अमृ ७.७५. [सं. झटिति; प्रा. झडति]

झडप—स्त्री. १ झेंप; झांप; उडी; उड्डाण; धांव; पकड. (क्रि० घालणें). 'झडप घालून पाव वेगीं।' –सीन. १ दाराची, खिड-

कीची फळी, तावदान; कवाड; आडोसा. २ ( फोटोग्राफी ) पडदा. [ प्रा. झडप्प; हिं. झडप; गु. झडप ]

झडप—स्त्री. झटपट; त्वरा. [दे. प्रा. झडप्प] झडप्से—क्रिवि. (हिं.) १ जोरानें; त्वरित. २ संघव्यायामांतील एक हुकूम; हा मिळाल्याबरोबर चालणारांना तेहतीस इंच अंतरानें पावलें टाकीत पुढें चालवयाचें असतें. –संध्या २४.

झडपड—स्त्री. तडफड पहा. जोराची धडपड; झटापट. झडपड्या—वि. धडपड्या; तडफड्या. [ झड+पडणें ]

झडपड—स्त्री. झटपट पहा. [ झटपट; प्रा. झडप्पड ] झडपड्या—वि. चपळ; तरतरीत; झपाट्यानें काम करणारा.

झडपडा—पु. झडप पहा. पकड; पटकावणें; हिसडा. (क्रि० घालणें. [ झडप ]

झडपण—न १ झडपण्याचें, वारा घालण्याचें साधन; पंखा. २ झांकण; आच्छादन; ढांकण; खिडकीची फळी; झडपा. [झडप]

झडपण-पणा—स्त्री. १भूतबाधा;बाहेरवसा;झपाटणें. 'कशी गत करूं ह्या बाळाला झाली झडपणा। घेईना थान गे बाई कांहीं केल्या समजेना।' 'प्रीतिची मजला जाहली तुझी झडपणा।' –सला ३. २ एकाएकीं तापानें पछाडणें. [ झडपणें ]

झडपणी—स्त्री. १ वारा घालण्याची, झडपण्याची क्रिया. २ वारा घालण्याचें साधन;पंखा. झडपणें पहा. ३ देव, सूत,सटवी इ०ची बाधा. झडपणा पहा. 'येकी सांगति वो जालि झडपणी।' –भिगा ७७. ४ निरसन. –शर. ५ झडप; झपेट; झांप. 'सोसिल गरुडाची काय झडपणी चिमणी।' –मोमौसल १.४७. [ झडपणें ]

झडपणें—न वारा घालण्याचें साधन; पाखडण्याचें साधन; पंखा; सूप.

झडपणें—सक्रि. १ धान्य, विस्तव यांवर वारा घालणें; वारवणें. २ (सूत, पिशाच, देवता इ० कांनीं ) पछाडणें; झपाटणें. 'सूतें झडपोन मारिती।' –दा १.१०.५९. ३ झोडपणें; मारणें. झोडपणें पहा. 'झडपीती वारयांचे मोहाळें।' –उषा १७२३. ४ पकडणें; धरणें. 'गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि पन्नगा झडपी।' –मोकर्ण ४५.११. –अक्रि. १ थांबणें ( पाऊस ). २ (काव्य.) झडप घालणें; (पक्षी इ०नीं) उडी घालणें. 'तो करींचा पिंड झडपोनी। घारीनें नेला अकस्मात।' –रावि ३.१८७. ३ धडपड करणें; हातपाय झाडणें. 'चाप उरीं दडपे झडपे मग आननपंक्ति धरे रचली।' –वामनसीता ११. ४ झडणें; धास्ती घेणें; दडपून जाणें. 'वागुलमेणें काळ झडपे। कीं अंधारचक्रीं रवि हारपे।' –ज्ञै ७८.१४. [ प्रा. दे. झडप्प ]

झडपपंखा—पु. नोकरांनीं वारा घालण्याचा मोठा पंखा; पंखा. 'भरगच्ची लोडगाद्या लाविणें, झडपपंखा हजर ठेवणें.' –ऐरापुविवि ४४. [ झडपणें+पंखा ]

झडपा—पु. १ (पेटी इ०कांचें) झांकण. २ कारव्या, वांबूच्या काठ्या इ०कांचें बनविलेलें (बगीच्या इ०कांचें) दार, झांपा, झोपा, ताटी, फाटक. ३ वांबूच्या चटईचा पंखा. [ झडपणें ]

झडपाझडपी—स्त्री. १ वारा घालणें; वारवणें २ (ल.) झोंबाझोंबी; धक्काबुक्की [ झडपणें ]

झडपी, झडपें—स्त्रीन. ताटी; फाटक. झडपा पहा.

झडपीव—वि. वारा घातलेलें; वारवलेलें [ झडपणें ]

झडा—स्त्री. त्वरा; घाई; जलदी. झड पहा.

झडाका—पु. ( काठी, पदर, पाऊस, वारा यांचा ) जलद तडाखा, रट्टा, प्रहार. (क्रि० लागणें). या शब्दाचा झपाटा व धडाका या शब्दांच्या अर्थींहि क्वचित उपयोग होतो.

झडाझड-झडां-झडी, झडाड-डां—क्रिवि. लौकर लौकर; झटपट; जलदीनें. 'अशुद्धाच महापुर वाहती शिरें उडालीं झडाझडी।' –ऐपो १३४. [ झड द्वि. ]

झडाड—पु. १ ( वारा, पाऊस इ०काचा ) जोर; सोंसाटा; झपाटा; धडाका. 'प्रळयवायूचेनि झडाडें। आकाश निजस्वभावें तुटे।' –एभा ११.४१२. २ ( पंखांचा ) फडफडाट; जोराची फडफड. 'ज्याच्या पाखांचा झडाड। उन्मळी सुदृढ भववृक्षा।' –एभा २१.२.

झडाडणें—अक्रि. १ तावातावानें, रागानें लागणें. २ जोरानें, उत्सुकतेनें लागणें ३ उत्साहानें पुढें चालणें, सुरू ठेवणें. ४ (वारा) सों सों करीत वाहणें; झडझड आवाज करीत वाहणें. 'झडाडी तो वारा झडकत नभामाजि वितुळे।' –दावि २२७. [ झडझडणें ]

झडात—क्रिवि. झडाडत; झडझड आवाज करीत. 'बहुत वात झडात झडाडितो।' –दावि ८६. [ झडाडणें ]

झडातावा—स्त्रीअव. झरातावा पहा.

झडिती—क्रिवि. लौकर; झटकन्; जलदीनें. [ सं. झटिति ]

झडिवारा—पु जोराचा, सोसाट्याचा, वादळाचा वारा. 'तंव तेथें थोर पाउस पडला। झडिवारा तेणेंहि वेळा। रुंखाखालि बैसला।' –पंच ३.१५. [ झड+वारा ]

झडी—स्त्री. १ पावसाची एकसारखी वृष्टि; झड. २ क्षयरोग; झुरणी; रेंगाळत राहणारा, क्षीण करणारा रोग. 'झडी पडलें मी कमळण भ्रमरा केव्हां भोग देसी।' –होला १७५. ३ ( झाडें इ० कांच्या पानांची ) गळती; जीर्ण होऊन गळून पडणें. 'वृक्षासि होय पानझडी।' –एभा ३.१५५. ४ उडी; झडप. 'तुका म्हणे आतां झडी घालूं पाहें। पांडुरंगे माये तुझे पायीं।' –तुगा १६११. ५ पावसापासुन रक्षण करणारें दार; खिडक्या इ०कांवरील झडपण, तट्टी इ० [ झडणें ]

झडी—स्त्री. १ घाई; त्वरा. २ उत्साह; उमेद. 'ओढीना न झडी धरूनि तुळवी कोणी न तोळी वरा।' –आसी ५०. [ सं. झटिति; प्रा. झडि ]

**झट्टी**—स्त्री. (कर.) (मुलींच्या भाषेंत). वट्टी एका हातांतून दुसऱ्या हातांत झेलणें 'झट्टीकर.'

**झडखा**—वि. (रोगानें) क्षीण होत जाणारा; खंगणारा; क्षयी (शिवीसारखा याचा उपयोग करतात). 'मेल्या झडखा.' –शेक्स्पियर नाट्यमाला–रोमिओ ज्यूलियट ८७. [झड] ०पडखा–स्त्रीअव. झोकांड्या; झुकांड्या; पायांचा थरकांप. (क्रि० देणें; खाणें; जाणें). [झडणें+पडणें]

**झण–कन–कर–दिनीं–दिशीं**—क्रिवि. १ झणझण, सणसण, सुं सुं करीत (बंदुकीची गोळी, गोफणीचा दगड इ० जाणें). २ झट्कन; झटदिशीं; झटक्यासरशीं; खट्कन. [ध्व. झण्]

**झणकवायु**—पु. घोड्याच्या पायाला होणारा एक रोग. यानें घोडा चालत असतांना त्याच्या पायांत शिणका मारते. (इं.) स्ट्रिंगहाल्ट. –अश्वप २.१११. [झणक+वायु=वात]

**झणका**—पु. १ झणकारा. (विंचु इ० कांच्या दंशानें होणारा) सणका; सणसण; चुणचूण; तीव्र वेदना. (क्रि० लागणें; सुटणें; वाटणें). २ (राग, संताप इ० मनोविकारांचा) झटका; झणकारा. (क्रि० येणें). 'प्रेमाच्या झणक्यांत हंसाबाई म्हणाली.' –स्वप ४८. ३ झणझण असा आवाज; छनछनाट; झणत्कार. 'नाण्याच्या झणक्यानं नाचगारीं भुतं दारिद्र्याच्या मंत्रानं दूर होतात.' –सत्तेचे गुलाम ९२. [ध्व. झण्]

**झणकार–कारा**—पु. १ टणत्कार; झणत्कार; झणझण असा आवाज; सणाटा; सणसणाट. २ झटका; फटकारा; झटकारा. 'झणकाऱ्यावरोबर दिवा गेला.' ३ (बोलण्याची, काम करण्याची) चपळाई; हुपारी; झपाटा; वेग. ४ (मनोविकारांचा) उद्रेक; फणकारा; लहर. (क्रि० येणें). ५ (विंचु इ० कीटकांच्या दंशानें होणारा) सणकारा; शिणका; चुणचूण; झणका. (क्रि० मारणें). [ध्व. झण्]

**झणकी**—स्त्री. १ (आघातानें, तडाख्यानें कानांत, हातांत इ० होणारी) झणझणी; भणभण. २ चुणचूण; दाह; तीव्र वेदना (नांगी मारल्यामुळें). ३ (अतिशय तिखट पदार्थ खाल्यानें होणारी जिभेची, तोंडाची) आग; दाह; झणझण. (क्रि० मारणें; उडणें; निघणें). वरील अर्थी झणक्या (अव.) हें रूप जास्त प्रचारांत आहे. [ध्व. झण्]

**झणझण**—स्त्री. (गो.) १ वारा झोंबणें. २ झणझणी पहा.

**झणझण–झणां**—क्रिवि. १ झणझण असा आवाज होऊन. २ जलद; लौकर. ३ फणकाऱ्यानें. [ध्व]

**झणझणणें**—अक्रि. १ झणझण आवाज करणें; खणखणणें; टणटणणें; घणघणणें (टाळ वगैरेंनीं) २ (मोठा आवाज, आघात इ० कानीं होऊन, हात, कान इ० अवयव) झणक्यानें युक्त होणें; भणभणणें; धिवधिवणें; ठणकणें; ठणकणें. 'चापगुण झणत्कारें दिग्वारण मस्तकेंहि झणझणती।' –मोकर्ण ४८.५१. ३ (तिखट इ० पदार्थांनीं तोंडाला, जिभेला) झोंबणें; आग होणें; भडका होणें. ४ (विंचु इ० कांच्या दंशानें) सणका मारणें; चुणचुणणें; फुणफुणणें. [झणझण]

**झणझणाट**—पु. १ (वाद्यांचा) झणझण असा मोठा आवाज खणखणाट; घणघणाट; ठणठणाट. २ (आघातानें शरीरावयवांना होणारा) भणभणाट; तीव्र वेदना. ३ (तिखट पदार्थ तोंडाला झोंबल्यानें होणारा) भडका; आग. ४ (विंचु इ० च्या दंशानें होणारी) तीव्र चुणचुण; शिणका. [झणझण]

**झणझणी, झणझण**—स्त्री. १ (अंगावर बुक्की मारल्यानें कानांत होणारा) फणफणाट; वेदना. २ (ऊन पदार्थ खाल्ल्यानें होणारी) तोंडाची आग. ३ (नांगीच्या दंशाची) रणरण. (क्रि० येणें; सुटणें; लागणें; उठणें).

**झणझणीत**—वि. फार तिखट; तोंडाला झोंबणारा; अतिशय मसालेदार; चरचरीत (पदार्थ, जेवण इ०). [झणझण]

**झणत्कार**—पु. (नूपुरें, घागऱ्या, वाळे इ० कांचा) झणणाट; झणझण किंवा छुमछुम असा आवाज. 'चरणीं वांक्या नेपुरें। चालतां गरजती झणत्कारें।' [सं.]

**झणत्कारणें**—अक्रि. (काव्य.) झणत्कार करणें. 'पदीं नेपुरें झणत्कारिती।' [झणत्कार]

**झणफण होणें**—अक्रि. (कर.) उडणें.

**झणाझण–झणां**—क्रिवि. एकसारखा झणझण, खणखण असा आवाज होऊन. [ध्व. झण द्वि.]

**झणाटा**—पु. १ (दगड इ० कांचा किंवा इ० कांवर होणारा) मोठा व आवाजयुक्त टोका, टोला, तडाका. (क्रि० बसणें; मारणें). २ (वाण, वेंडु, बंदुकीची गोळी इ० कांचा) गोंगावत, सुं सुं करीत लागलेला तडाका. (क्रि० लागणें; बसणें). ३ विंचवाच्या दंशाचा झणकारा. (क्रि० मारणें; बसणें; होणें; वाटणें). ४ (उन्हाची) झळ; तिरीप. (क्रि० लागणें; बसणें). ५ (मनोविकारांचा) उद्रेक, उमाळा. (क्रि० येणें). ६ (सढळपणें) अवजडपणा; मोठेपणा; विस्तीर्णता; अवाढव्यपणा; अतिरेक; आधिक्य (आकार, संख्या, परिमाण, गुण इ० कांचा, उदा० सापाचा–म्हैशीचा–मुलुखाचा–शेताचा–पिकाचा–पावसाचा–उन्हाचा–वाऱ्याचा–थंडीचा–झणाटा); समासांतहि उपयोग होतो; तसेंच विशेषण व क्रियाविशेषणासारखाहि उपयोग होतो. उदा० झणाटा साप; झणाटी म्हैस; झणाटा पाऊस इ०. [ध्व. झण्]

**झणाण**—पु. अतिशय मोठा, झणझण, घणघण असा आवाज. २ (बाण इ० कांचा) झणझण असा आवाज. 'बाण झणाण खणाणित भाली होताहे भडिमार।' –दावि ३३४. ३ (आघातानें, तडाख्यानें होणारी हाताची, कानाची) झणझण; शिणका. [ध्व.

स्को. ३. ५४

झण्] झणाणणें—अक्रि. १ (घांट इ० वाद्यांचा) मोठ्यानें झण झण असा आवाज होणें. 'वश्य करी अश्वसाहणी। मागें तरटांचा कर झणाणी।' –एभा २०.२१६. २ (फोडणी, इ० कांचा) झणझण. चुरचुर आवाज होणें; झणझणणें. [झणझणणें]

झणाणां—क्रिवि. एकसारख्या झणझण अशा मोठ्या आवाजानें; घणघणां; खणाणां ठणाणां. 'घटका गेली पळें गेलीं तास वाजे झणाणां।' [ध्व.].

झणि–णी, झणें—उभ. (काव्य) १ कदाचित्; न जाणों; नाहीं तर. 'तें देखोनि आदिपुरुष विस्मितु। म्हणे झणें होय पां अंतु।' –ज्ञा १.१५९. 'म्हणेल अतुला कथा झणि म्हणाल तो आग्रही।' –केका १११. –क्रिवि. लौकर; त्वरित; जलदीनें. 'कीं जीव देहाचें धरणें। मज पातां सुटे झणें।' –ऋ ६५. 'तया वैदर्भी देशिं झणी पावे।' –र १८. [सं क्षणे; म. क्षणि–झणि; सं शनैः–सणै–झणे–झणीं=शीघ्र. –भाअ १८३४.]

झणें—अ. (काव्य) क्रियापदाला जोडून निषेधार्थी उपयोग करतात. 'म्हणोनि अर्जुनी अर्जुना। झणें चित्त देसी या हीना।' –ज्ञा २.१७. –क्रिवि. निश्चयेंकरून; खरोखर; निःसंशय; खात्रीनें. 'केलां कर्मी जें देयावें। तें झणें मज होआवें।' –माज्ञा १८.१९१.

झननन—स्त्री. (मंजुळ वाद्यें, घुंगरूं, पैंजण यांचा) झणझण असा आवाज. 'झननन झांनन झनत्कारी।' –राला ३९. [ध्व. झन्]

झनाट्या—वि. फार मोठा; दांडगा (वाघ, विंचू, साप इ०). झपाटा अर्थ ६ पहा. 'तो मद्र पण झनाट्या वाघ होता.' –सूर्योदय ४. [झपाटा]

झनानणें—अक्रि (व.) झणझणणें; झणाणणें. झनावणें—सक्रि. (व.) झणझण होण्याइतकें जोरानें मारणें; भडकावणें. [ध्व. झण्]

झनाना—पु. जनानखाना, जनाना पहा. [फा. झन्=स्त्री, बायको]

झप–कन–कर–दिनीं–दिशीं—क्रिवि. झटकन; चटकन; लौकर; त्वरेनें; झपझप पहा.

झपका—पु. १ झुपका; झुमका पहा. –वि. झुपकेदार; 'झाड झपकं फूल टपकं।' –मसाप ४.४.२५२.

झप(पा)झप–झपां—क्रिवि. झटकन, झपकन पहा. 'तो झपझप चालतो.' 'सर्व गोष्टी त्याला झपाझप समजत असत.' –कोरकि ७२८. [झपाटा]

झपणें—क्रि. (व.) दवणें.

झंपा—पु. १ एक प्रकारची झांज. २ (संगीत) एक तालाचें नांव. हा कर्नाटक संगीत पद्धतींतील आहे. त्याचे ६, ७, ८, १० व १२ असे पांच मात्राप्रकार आहेत. [सं.]

झपाटणें—सक्रि. १ (एखादी गोष्ट, काम) त्वरेनें तडकाफडकीं करून टाकणें, उरकणें, जलद संपादणें. २ गट्ट करणें; बकांबकां खाणें; खाऊन फस्त करणें. ३ (भूत, पिशाच इ०कांनीं) पछाडणें. [ध्व.झप्+सं. पाटन=मोडणें, तोडणें; हिं. झपटना] झपाटा—पु. १ सपाटा; जोर; वेग; तडाखा. आवेश; घाई (यांत कौशल्याचा अंतर्भाव होतो). उदा० चालण्याचा–लिहिण्याचा–खाण्याचा–झपाटा. २ (शस्त्र, पदर, इ०कांनीं लागणारा) जोराचा तडाखा, घाव, फटका. ३ जोर; आवेग; तीव्रता; उदा० तापाचा–वाऱ्याचा–उन्हाचा–जरीमरीचा–सांथीचा–झपाटा. ४ पछाडणूक; झडपणी; उदा० भुताचा–पिशाच्चाचा झपाटा. ५ (पशु, पक्षी इ०कांनीं भक्ष्यावर घातलेली) झडप; झपेट. ६ अतिशयितता; आधिक्य. उदा० हाताचा–बोलण्याचा–चालण्याचा–खाण्याचा–झपाटा. ७ फटकारा; झटक. उदा० पदराचा झपाटा. ८ किरकोळ लढाई; चकमक. [ध्व. झप. म. झपाटणें;] (वाप्र) (एका) झपाट्यानें—क्रिवि. एका झटक्यांत, दमांत, तडाक्यांत. (एखाद्याच्या) झपाट्यांत सांपडणें—कचाटींत, तावडींत सांपडणें. झपाट्यासरसा—क्रिवि. झटक्यासरशीं; झटक्यांत. झपाट्या—वि. चपळाईनें काम करणारा; कामाचा उरक असलेला; झपाटा पहा. [झपाटा] झपाट्याचा वारा—पु. ताशीं तीस किंवा त्याहून अधिक वेगाचा वारा. –मराठी ६ वें पुस्तक, पृ. ३०१.

झपाडणें—सक्रि. (खा.) निजविणें; झोपविणें. [झांप]

झपाडी—वि. (कों.) अतिशय मोठी.

झपाण—न. डोंगराळ, अडचणीच्या प्रदेशांतील प्रवासाचें साधन; वाहन हें पाळण्यासारखें असून यास चार माणसें उचलतात; डोली. 'रघुनाथरावयांनीं त्या देशाचे रिवाजा प्रमाणें स्वतः बसण्याकरितां एक झपाण केलें.' –तीप्र ३३. [प्रा. झंपण; हिं. झंप्पन]

झपापां—क्रिवि. झपझप पहा. [झप द्वि.]

झपु(पू)र्झा—स्त्री. (काव्य) जा, पोरी, जा, हें वाक्य झपाट्यानें उच्चारलें असतांना होणारा ध्वनि, शब्द. हा शब्द केशवसुत कवीनें प्रत्यानंदाच्या सीमेचा वाचक याअर्थी रूढ केला. 'झपूर्झा! गडे झपूर्झा!' –केक १०६.

झपेट—स्त्री. १ (हिंस्र पक्ष्याची) झडप; झांप; उडी. २ पिशाच्चबाधा; [झपाटा हिं.]

झबक—न. झुबका; झुमका.

झबलें—न. लहान मुलाचें एक विशेष प्रकारचें अंगडें; हें अर्ध्या मांड्यापर्यंत लांब असतें. हे सरकफांसाचें, गळपट्टीचें व गुंड्यांचें असें तीन प्रकारचें असतें. झगलें पहा. [अर. जुब्बा; फा. जुबा झबा. हिं. झगुला]

झ(झु)बा—पु. झगा; मोठा, पायघोळ सदरा (नेहरूशर्ट सारखा). [अर. जुब्बा=झगा; फा. झुबा. गु. झभ्भो]

झंवाद—वि. (गो.) १ जहांबाज. २ निष्णात.

झब्बू—पु. १ घमेंडखोर मनुष्य. २ शिष्ट समजला जाणारा, लब्धप्रतिष्ठित माणूस. ३ (पत्त्यांचा खेळ) एक खेळ. त्या खेळांतील मारणी. [ सिं. झबू=ठोंब्या ]

झॅम—स्त्री. (गो.) झोंप; डुलकी.

झमकणें—अक्रि. १ चमकणें; झळकणें; चकाकणें; प्रकाशणें. 'कुंडलें तळपती नीळ। वरी जडिले झमकती।' —दा १.२.१४. २ (ल.) शोभणें. 'बारा हजार घोडा पुण्यांत कडकडीत। याशिवाय झमकती पागा नाहीं गणित।' —ऐपो १३०. ३ झण-झण असा आवाज करणें; झणत्कार करणें. 'विणे तालेंघोळें झमकत गुणी दोषदहनीं।' —दावि २२२. ४ (व.) लढाई, भांडण जुंपणें; चकमक उडणें. [चम् प्रमाणें झम्। ध्व. दृश्य; हिं. झमक=चमक ]

झमझम-झमां—क्रिवि. १ (घुंगरांचा, घागऱ्यांचा) रुण-झुण, छुमछुम, झणझण असा आवाज होऊन. २ जोराचा पाऊस पडत असतांना होणाऱ्या झमझम अशा आवाजाप्रमाणें ध्वनि होऊन. झिमझिम पहा. [ ध्व. झम् द्वि ] झमझमा—पु. (संगीत). खटका अर्थ ३ पहा. [ झमझम ] झमझमाट—पु १ नुपुर, चाळ, घुंगरू इ० कांचा झमझम असा मोठा आवाज. २ (ल.) नृत्य; नर्तन; नाच. [ झमझम; अर. झम्झम्=गाणें नाच ] झमाझमी—स्त्री. १ तरवारींची चकमक, कचाकच; चकाचकी. २ (ल.) भांडण; कटकट; वाचावाच; खटका; चकमक. [ झमझम ]

झमेला—पु. बखेडा; धुडगूस; धुमाकूळ. 'हुकमाप्रमाणें त्रिवर्गांनीं गडबड करून दिवसभर झमेला मांडला.' —विक्षिप्त १. ६६.

झर—स्त्री. १ (गो.) झरा. २ (पदार्थाचा) झरून, झिजून गेलेला अंश. 'हा गाळ म्हणजेच पाण्यानें वाहून आणलेली झर होय.' —सृष्टि ४०. [ सं. झृ—झर=झिजणें; सं. झर-रा ]

झरक—क्रिवि. झरकन पहा. 'शरीर झरक झरझरी रोम थर-थरी अनन्वित वळतें।' —दावि ४१७. [ झरकणें ]

झरकटचें, झरकटावचें—अक्रि (गो.) ओरखडणें; खर-चटणें.

झरकणें, झर्कणें—अक्रि. १ झरकन निघून जाणें; पोबारा, गच्छंती, पलायन, करणें; सरकणें; निसटणें; हातावर तुरी देणें. 'नळे आडेत उठती। बाण हवाया झर्कती। गगनामध्यें।' —दावि ५०४. २ झरणें; गळणें. 'तेणें झरकती प्रेमांबु लोचनीं।' —दावि ३७५. [ ध्व. झर्; सं. झृ-झर् ]

झर-कन-कर-दिशीं-दिनीं—क्रिवि. झटकन; चटदिशीं; झटक्यासरशीं.

झरका—पु. (हालचाल, क्रिया, भाषण इ० कांतील) त्वरा; चपळाई; चापल्य; चलाखपणा. (क्रि० करणें; मांडणें; लावणें). [झरकणें] ०देणें-सक्रि. गिरका देणें; फसविणें; हातावर तुरी देणें. 'नाहीं तर दे झरका कापा गळा।' —सला २.

झरकुंड—न जंगल.

झरझर-रां, झराझर-रां, झरारां—क्रिवि. झपझप पहा. 'निर्झर झरझर उड्या मारिती मृग विपिनीं उडती वागडती।' —विक ३५. [ झर् द्वि. ]

झरझरणें—अक्रि. स्फुरणें; फुरफुरणें; अंगावर शहारे येणें; थरथरणें. 'शरीर झरक झरझरी रोम थरथरी अनन्वित वळतें।' —दावि ४१७. [ झर द्वि. ]

झरझरी—स्त्री. गुडगुडी; हुक्का व त्याची नळी. 'अस्ता-व्यस्त लोक गाशे टाकून झरझऱ्या लावून बसले.' —भाव ९९. [ ध्व. झर्. हिं. झरझर ]

झरझरीत—वि. विरविरीत; झिरझिरीत; विरल विणीचें; अतिशय पातळ (वस्त्र). [ सं. जर्जरित ]

झरणें—अक्रि. १ पाझरणें; बारीक धारेनें वाहणें; झिरपणें; २ पाघळणें; विघळणें. ३ गळणें; टपकणें; पाझरणें. उदा० तारू. ४ (शरीर, आयुष्य, संपत्ति, वुद्धि इ०) कमी होत जाणें; झडणें; झिजणें; क्षीण होणें. 'पुष्कळ गंध उगाळूं नको, खोड झरेल.' [ सं. झृ=झरणें; झृ=झिजणें; प्रा. झरण; हिं. झरना; गु. झरवुं ]

झरनाटछंद—वि. (व.) मोठा; अवजड; अवाढव्य. [झणाटा=अवजडपणा+छंद ]

झरनाटा—पु. (व.) झपाटा; झणाटा. [ झणाटा ]

झरनाटून—क्रिवि. (व.) सपाटून. 'झरनाटून ऊन लागलें'

झरम—न. एक प्रकारचा मासा.

झरवण—न. झरा; झिरपण. [ झरा+वण प्रत्यय ]

झरवणी—न. १ झऱ्याचें पाणी. २ झिरपणारें, पाझरणारें, ठिपकणारें पाणी. [ झरा+सं. वन=पाणी ]

झरस—स्त्री. एक वनस्पती. ही कडू व गोड अशा दोन प्रकारची असून हिच्या पाल्याची भाजी करतात.

झरा—पु. १ जमीनींतून, खडकांतून झिरपणारें पाणी, त्याचा प्रवाह; झिरा. 'वळणें वाकणें भोवरे। उकळ्या तरंग झरे।' —दा ११.७.३. २ (ल.) पैशाचें, संपत्तीचें उगमस्थान, मूळ; झिरा; खाण. ३ (द्रव्य इ० ची). सतत होणारी प्राप्ति. [ सं. झृ—झरा ]

झरा—पु. झारा पहा.

झराका—पु. चपळता; चलाखपणा. झरका पहा.

झराझर-रां, झरारां—क्रिवि. झरझर पहा. 'मिल्टनचीं काव्यें झराझर बाहेर पडलीं नव्हतीं.' —विवि ८.९.१६६.

**झराट**—क्रिवि. संतत; एकसारखें; झरझर. 'तेणें लोटलें अपार जीवन। चक्षूंतून झराट तें।'—नव १४.२३. [म. झरणें]

**झराताया**—स्त्री.अव. (ग्रां.) जोराचा, नेटाचा प्रयत्न; आटोकाट यत्न. (क्रि० देणें).

**झरार-रां**—क्रिवि. झरझर पहा. 'तुरा हा झरार आला पुढें।'—रामदासी २.१५. 'अंतीं जाशिल रे झरारा।'—सोहिरोबाकृत स्फुट पदें (नवनीत पृ. ४५१)

**झरी**—स्त्री. १ झरा; ओहळ; ओढा. 'नाना झऱ्या क्षिरपती।'—दा १६.४.६. २ (कों. शेतकी) खार म्हणून जी भातजमीन तयार करतात तिला बांध घालून आंतील पाणी सोडण्यास बांधास जो फांज (दरवाजा) राखतात तेथपासून खारजमिनीच्या उंच भागापर्यंत बांधलेला फरसबंदी नाला. —कृषि २१४. [सं. झॄ]

**झरी**—स्त्री. ऱ्हास; क्षय; (संपत्ति, शरीर, आयुष्य इ० चा); कमी कमी होत जाणें; क्षय पावणें. (क्रि० लागणें). [सं. झॄ=झरणें]

**झरी**—स्त्री. झारी पहा.

**झरीपट्टी**—स्त्री. (गवंडी काम) खिडक्या व जाळ्या यांच्या पायथ्याची गिलाव्याची उतरती भिंत. [झरणें+पट्टी]

**झरु(रू)का, झरोका-खा**—पु. (भिंतींतील) लहान खिडकी; गवाक्ष; जाळी. 'तिंदां पहाते झरका उघडुन शब्द तसा पडतां कर्णीं'—प्रला १५०. 'मुखांबुजीं रोधिति ज्या झरोखे।'—सारुह ७.६७. [ध्व. झरझर]

**झरे**—पु.अव. मांगांची एक पोटजात. यांची वस्ती ठाणें जिल्ह्यांत आढळते. —अस्पृ ४१.

**झर्नाट्या**—वि. (व. ग्राम्य) अगडबंब; अवाढव्य. झन्नाट्या पहा. 'असा झर्नाट्या माणूस मी पाहिला नाहीं'

**झल**—स्त्री. (व.) झळ पहा. [हिं.]

**झलक-की**—स्त्री. (व.) तरतरी; हुशारी; चलाखपणा. [हिं.]

**झला(ल्ला)ळ**—स्त्री. (काव्य.) १ झळाळ; चमक; तेज; चकाकी; लखाखी. 'मुगुट माथां कोटी सूर्यांचा झल्लाळ।'—तुगा ३. २ ज्वाळांचा डोंब, भडका; जाळ. [सं. ज्वल्; हिं. झल]

**झल्लर**—स्त्री. (काव्य.) झालर; किनार. 'मुक्ताफळाचीं झल्लरें। झुबके रत्नमणीचे।'—वेसीस्व ७.८०. [सं. झल्लरी]

**झल्लर**—पु. पाण्याचे तुषार; ओलावा. नीरज भार समार सुमारें। झल्लर मारितसें वर वारें।'—दावि ४४६. [सं. झिल्ली]

**झल्लरी**—स्त्री. झांज; झंगट; टाळ. 'नाद उठिला झल्लरी। मृदंगध्वनी त्यामाझारीं।'—एरुस्व ६.७४. [सं.; ध्व.]

**झ(झं)वणें**—उक्रि. (अश्लील) संभोगणें; मैथुन करणें; स्त्रीशीं रत होणें. [सं. धवनं-झवणें-झवणें; सं. धव=नवरा, त्याचें मुख्य कर्म धवनं अथवा (-वि.) धुवनं(=रतं) याचा अपभ्रंश झवणें. —राजवाडे भाग १८३३. तुल० सं. च्यु-च्यव=जाणें, हलणें]

**झवकीर**—वि. (अश्लील). कामुक; विषयांध; स्त्रीलंपट. हें एक आडनांवहि आहे. [झवणें] **झवतरोड**—वि. (अश्लील.) रोडका; किरकोळ बांध्याचा; अशक्त; दुबळा; मरतुकडा; हें एक आडनांवहि आहे. [झवणें+रोड] **झंवर-चाडपट्टी**—स्त्री. (अशिष्ट). एखाद्याची भरमसाट शिव्या देऊन केलेली निर्भर्त्सना; खरडपट्टी; घाणेरड्या शिव्या देणें. (क्रि० काढणें). [झवणें] **झवाडणें**—सक्रि. (अशिष्ट) शिव्या देऊन खरडपट्टी काढणें; निर्भर्त्सना करणें; अभद्र बोलणें. [झवणें] **झवाडया**—वि. (अश्लील) व्यभिचारी; अतिशय कामुक; विषयासक्त. [झवणें]

**झष**—पु. मासा. [सं.]

**झळ, झळई**—स्त्री. १ उन्हाची तिरीप; धाप; धग; अंग भाजणारी उष्ण वाऱ्याची झुळूक. (क्रि० खाणें; लागणें; दाबणें बसणें). 'तृषार्ता मरुदेशीं। झळे अमृतें वोळली जैसी।'—ज्ञा १८.१६१. 'केवळ बाळ झळेनें ग्रीष्मांत जसा तसाचि कोमेला।—मोअश्व ५.३२. २ अग्नीची धग; अही; आंच. ३ मृगजळ. 'उदकाऐसी दावुनि ओढी। ऊरु फोडी झळई।'—तुगा १२६३. —वि. तेजस्वी; झगझगीत. 'झळकत झक झळ घनदामिनी,'—दावि ४९६. [सं. झला; धातु, ज्वल्. हिन्यू. गल्] **झळणें**—अक्रि. सूर्यकिरणांनीं तापणें (मद्य इ०). **झळघट**—वि. उन्हानें तापलेलें, तापविलेलें (पाणी इ०). **०पाणी**—न. उन्हानें गरम झालेलें, केलेलें पाणी (घामोळें इ० रोगांस उपयोगी). [झळ+पाणी]

**झळ**—स्त्री. १ धातु तापविल्यानें होणारी घट; धातु तापवितांना निघून गेलेलें अशुद्ध द्रव्य. २ (ल.) व्यापारांतील घस, तूट, बूड, ठोकर. (क्रि० लागणें). [सं. झला] **झळणें**-अक्रि उन्हांत तापणें; उन्हानें गरम होणें (पाणी).

**झळक**—स्त्री. १ उन्हाची झळ. —शर. २ चमक; चकाकी. (क्रि० मारणें). 'तेजे झळक देत किरीट तो साजे।'—गीतांचंद्रिका १.७. [सं. झला] **झळकणें**—अक्रि. १ चकाकणें; प्रकाशणें; चमकणें; झांक मारणें. २ शोभणें; साजणें. 'कंठीं झळके माळ मुक्ताफळांची।'—आरती गणपतीची. 'काणी झळकतें कुंडलें।'—उपा १०.८९. ३ दृष्टीस पडणें; आढळणें; दिसणें. 'झडझडां झळकती सकळ। प्राणी तेथें।'—दा १४.४.९. [सं. झला. म. झळक; सिं. झल्कणु; का. जलकने=चकाकत; स्पष्टपणें] **०फळक**—स्त्री. चकचकीतपणा; चकाकी; तेजस्विता; झकाकी. —वि. चकचकीत; लख्ख; झकमकीत. [झळकणें द्वि.] **झळकावणें**—सक्रि. १ चकचकीत करणें; लखलखीत करणें. २ (ल.) (शस्त्र इ०) परजणें; लखलखीत करणें. 'कोल्हाटी शस्त्र दावी झळकावून। परी रणपंडित नव्हे तो।'—ह ५.१९२. [झळकणें प्रयोजक]

**झळक**—न. (गो.) मासळी. [झळकणें]

**झळकणें**—अक्रि. (ना.) (पातळ पदार्थ इ०) हेलकावणें; डवकणें; डवकून सांडणें; झुलकणें पहा. [झुलणें]

**झळझळ-ळां**—स्त्री १ चकचकाट; लखलखाट; झिलई; तकाकी; उजळा; तजेला. २ कवडसा. —वाक्यवृत्ति ६४६. ३ (गो.) स्वच्छता; सफाई. —क्रिवि. चकचक करीत; झगझगीतपणें. 'अतिमृदु पदतळ झळझळ तळपति।' —आविश्वा, चूर्णिका १. [सं. झला द्वि.] **झळझळणें**—अक्रि. (भांडीं, दागिने इ०) चकाकणें; चकचकीत दिसणें; चमकणें. 'ओंकारांतुन माया झाली हिऱ्याहून झळझळे।' —पला ८. [झळझळ] **झळझळाट**—पु. (झळझळचा अतिशय) अतिशय तेज, चकाकी; झगझगाट. [झळझळ] **झळझळावचें**—सक्रि. (गो.) स्वच्छ करणें; खळवळणें. [झळझळणें] **झळझळीत**—वि. १ चकचकीत; झगझगीत. २ स्वच्छ; स्पष्ट. ३ निर्मळ; शुद्ध. झुळझुळीत पहा. ४ (ल.) थाटमाटाचा. 'तुमच्या तेवढ्या झळझळीत देवपुजा पहाव्यात.' —नामना ७५. —क्रिवि. १ अगदीं उघडउघड; स्पष्टपणें; ढळढळीतपणें; धडधडीत. ह्या शब्दाचा सदर अर्थी सामान्यतः निंदाव्यंजक शब्दाबरोबर उपयोग करतात. उदा० झळझळीत—वेड—सोदेगिरी—शिनळकी; झळझळीत—वेडा—सोदा—शिनळ. 'तो झळझळीत वेडा आणि त्याला मुलगी देतां?' २ (निषेधार्थी) बिलकूल; अगदीं; मुळींच. 'आज घरांत झळझळीत तांदूळ नाहींत.' [झळझळणें]

**झळणें**—अक्रि. झाकलें जाणें; डाग पडणें. झाळणें पहा.

**झळपेंघचें**—अक्रि. (गो.) झोंपेंत वरळणें.

**झळफळ**—स्त्री. झकपक; झगझगाट; चकाकी. (ल.) थाटमाट. 'बाह्य केली झळफळ। देहबुद्धीचा विटाळ।' —रामदास, स्फुट अभंग (नवनीत पृ. १४७.) [झळ द्वि.] **झळफळणें**—१ झळकणें. झळझळणें पहा. 'भाळीं कौस्तुभमणि झळफळी वो।' —दावि १३४. २ जळफळणें पहा. [झळफळ] **झळफळाट**—पु. १ झळझळाट पहा. २ दाह; तडफडाट. [झळफळ]

**झळफळीत**—वि. १ झळझळीत पहा. तेजस्वी 'तंव वासींगाचीं तोंगलें झळफळितें श्रीनेत्रांवरि येति।' —ऋ १३७. २ स्वच्छ. निर्मळ. 'झळफळित उपकर्णे। माळा गवाळी आसलें।' —दा २.७.८०. ३ भरभराट पावणारा; भरभराटीचा; समृद्ध; संपन्न. [झळफळणें]

**झळंब**—पु. झेपण; झळ; झळई; जळप, जळंप पहा.

**झळंब**—पु. चांदवा. 'कीं झळंबाचेनि मीषें। अनुरागें रादला असे।' —ऋ ६८.

**झळंबणें, झळमणें**—अक्रि. १ (जातांना एखाद्या पदार्थाशीं) घासणें; चाटून जाणें; घसवटणें; खरडणें. २ भूत, पिशाच्च यांनीं पछाडणें; झपाटणें. ३ (काव्य.) (दुःख, गर्व, माया, मोह इ०कांनीं) पछाडणें; व्यास होणें; झोंबणें. 'सर्वेचि प्राणी झळंबला। माया-जाळें।' —दा ३.४.४९. ४ ताप येणें; जाळणें; पोळणें. 'प्राक्तनु चंडांसाथ रस्मी। थोर तातली कर्मभूमि। झाउवी पडुउर्मी। झळंबिला जो।' —ऋ ९. ५ उन्हांत तापविणें; ऊन देणें. ६ स्पर्श करणें; स्पर्शणें; (ल.) लेपणें. 'कापूरकुमुदाचें पाणी। मर्दिजे चंद्रकिरणी। तेणें ते विरहिणी। झळंबीजे।' —शिशु ७०५. [झळ] —अक्रि. १ भरून येणें; उचंबळणें; डबडबणें; बुडणें. 'तैसे डोळे दीसति झळंबैले। अश्रुपातीं।' —ऋ १६. २ हेलकावे, गटंगळ्या खाणें. 'जन्ममृत्यूचिया लाटीं। झळंबती इया सृष्टी।' —ज्ञा १२.८७. ३ विरघळणें. 'जैसें लवण जळें झळंबलें।' —ज्ञा २.३.४ आदळणें; धक्के दिले जाणें; हादरणें; डगमगणें; मर्मी लागणें. 'पै पुनरावृत्तीचेनि उभडें। झळंबती सत्यलोकींचे हुडे।' —ज्ञा ७.८४. ५ ओळंबणें; लोंबणें; लटकत राहणें. 'त्या नदीच्या तीरावरून एक मोठें झाड झळंबलें आहे.' —सिंव ४५. ६ (गुच्छाच्या रूपानें फळें, फुलें झाडावर) लोंबत राहणें. [तुल० का. झळी=झुपका] ७ (सूर्यकिरणांनीं पाण्यांत किंवा मृगजळानें हवेंत) हेलकावे खाणें; हेलकावणें. ८ (भूत, पिशाच्च इ०कांनीं) पछाडलें-झपाटलें जाणें; चिकटणें. ९ झळ लागणें. [झळ] **झळंबून धरणें**—(फळें इ०कांनीं झाडापासून) लोंबत राहणें; लटकून राहणें; झळंबणें अर्थ ६ पहा.

**झळंबुका**—पु. झेला; गुच्छ. 'वासींगाचे झळंबुके दोहींकडे लागती।' —ऋ १३८.

**झळम**—वि. १ लोंबणारें; लटकत असलेलें; वाकलेलें; झळंवणारें (झाड). (यामुळें) २ (ल.) चढावयास कठिण (वृक्ष, शाखा इ०).

**झळमळणें, झळंवळणें**—अक्रि. १ (हालणारें पाणी, कांच इ०) चकाकणें; चमकणें. २ (झाडाच्या फांद्या इ० वाऱ्यानें) हलणें; हेलकावणें; हेलकावे खाणें. [झळ द्वि.]

**झळा(ळा)ळ-ळा-ळी**—स्त्रीपु. १ (झळझळचा अतिशय) चकचकाट; लखलखाट; चकाकी; उज्वलता; कांति. 'कळस हिमाचे पोकळ। जळो वरील ते झळाळ।' —ज्ञा १३.४७४. २ तरंग. —शर —वि. १ चकाकणारा; उज्वल; झळकणारा. 'झळाळिला देवांचा पाळा। तूं गोपिनाथा।' —शिशु १५५. २ उन्हाच्या झळीमुळें उत्पन्न झालेलें (मृगजळ इ०). 'दशांही इंद्रियांचे दश विषयरूप मृग ते झळाळ उदकापाठिं धाओनि अज्ञानत्वें मरों रीगे।' —ऋ ९. (टीप) [झळ] **झळाळणें**—चकचकणें; लकाकणें; चकाकणें. झळझळणें पहा. [झळाळ]

**झळी**—स्त्री. (वे.) झुडप.

**झा, झां**—अक्रि. झ्या पहा. ०करणें—पळून जाणें.

**झाऊ-व**—पु. एक प्रकारचें सुरुसारखें झाड; शेरणी.

**झाऊ**—स्त्री. (ना.) झळ.

झाऊ—वि. १ झिरझिरीत; विरविरीत; पातळ विणीचा (कपडा इ०). २ हलका; तकलादी; नाजूक (दागिना, कागद, मांडें इ०). ३ (ल.) टाकाऊ; निरुपयोगी; कुचकामाचा (मनुष्य, जिन्नस).

झाक—स्त्री. १ (रत्नें, दागिने, धातु, रंग इ० कांची) चमक; चकाकी; झकाकी; तेजस्विता २ (सोर्पे, रुपें इ०कांचा) मुलामा; जिल्हई. ३ पावसाची जोराची सर. (क्रि० येणें). ४ पक्ष्यांची झुंड; (टोळ इ०कांची) धाड; पक्ष्याची झडप; झाप. (क्रि० येणें; पडणें; मारणें). 'वरौनि कापूरकेळीं। भ्रमरांची झांक उठिली।' —शिशु ६०५. ५ (उन्हाची) तिरीप; झळ; ऊन किंवा थंड हवेचा मारा. (क्रि० लागणें; बसणें; येणें; वरून जाणें). ६ (ल.) चुणूक; भास; लकेर. 'दुष्काळामुळें कहर उसळला नाहीं तर त्याची झाक मात्र दिसली.' —विवि ८.७.१३५. ७ झुळूक; छटा. 'म्हातारपणाची झाक मारते.' ८ इतर अर्थी झांक पहा. [झक]

झाक—वि. १ चकचकीत; चकाकणारें; चकः. २ (ल.) (सढळपणानें) सुंदर; छान; झोंकदार; दिखाऊ. झक पहा.

झां(झा)क—स्त्री. १ (मूतबाधा, पित्त, उपासमार यांनी डोळ्यावर येणारी) झांपड; झाप; तंद्रा. (क्रि० पडणें; येणें; घालणें). २ चक्कर; मोंवळ; घेरी. ३ ग्लानि; गुंगी; सुस्ती; डोळे जड होणें व तारवटणें. (क्रि० येणें). ४ (ढग, झाडें इ०कांची घनदाट) अंधेरी; छाया; झांपड; काळोख. (क्रि० घालणें; पडणें).' पावसानें झांक घातली परंतु पडत नाहीं.' [झांकणें पहा. तुल० गु. झांख=अंधेरी, काळोख]

झांकचें—अक्रि. (गो.) वडवडणें; वरळणें. [गो. झाक= बडबड; हिं. झंखना, झकना=वडवडणें, शोक करणें]

झां(झा)कण—न. १ आच्छादन; टोपण; ढांपण. २ (क.) झांपड. झापड पहा. [सं. छादन]

झां(झा)कणा—क्रिवि. (राजा.) झांकण घालून; झांकण असलेल्या स्थितींत (मांडें इ० ठेवणें, असणें). (क्रि० ठेवणें; घालणें; असणें). [झांकण]

झां(झा)कणी—स्त्री. १ आच्छादन; भांडीं इ० कांवर झाकण्याची ताटली, तवकडी, वेळणी. 'तपतेजाचा चेतऊन अग्नि। उदासीनता वेऊनि फोडणी। आदण वोतूनि पतिपायवणी। झांकणी झांकिली उपासना।' —दावि १०४. २ (बैल, घोडा इ० जनावरांच्या डोळ्यांना लावावयाची) झांपडी; अंधारी. ३ आच्छादण्याची, झांकण्याची, लपविण्याची गुप्त ठेवण्याची क्रिया; दावादाव; छपवणूक. ४ (सुस्तीमुळें) डोळ्यावर येणारी झांपड. 'नेत्रद्वारांची झांकणी पडोनि ठेली।' [झांकण]

झांकणी—वि. (गो.) वरळणारा; वडवडणारा. [गो. झांकचें= वडवडणें; वरळणें]

झां(झा)कणें—न. झांकण अर्थ १ पहा. 'जैसें झांकणें दर्भीकुंडाचें। उघडितांच नये।' —दा ३.१.१४.

झां(झा)कणें—उक्रि. १ आच्छादणें; झांकण घालणें. 'त्यामाजीं वाणांच्या संधानें। झांकिली यादवसैन्यें।' —मुवन ३.७०. २ लपविणें; छपविणें. ३ (ल.) (एखादी गोष्ट, व्यवहार) छपविणें; दाबून, लपवून ठेवणें; दावादावी करणें. ४ (उपकार इ०) न फेडतां तसेच ठेवणें, राखणें. 'तुझा ऐसा उपकार मी न झांकीं।' -र १३. [सं. झष्=(आच्छादणें)—झाँख—झाँक —भाअ १८३४. प्रा. झंप=झांकणें. सं. शाख्=पूर्णपणें व्यापणें किंवा सं. छादन] म्ह० न्हातीचे वाल व खातीचे गाल झांकत नाहींत.' (वाप्र.) झाकउघड—स्त्री. झांकणें आणि उघडणें. उघडझांक पहा. झांकली मूठ—स्त्री. (एखाद्याची अप्रकट) स्वाभाविक स्थिति; परिस्थिति; स्वरूप. म्ह० झांकली मूठ सव्वा लाखाची= आपण होऊन आपली (ज्ञान, संपत्ति इ० कांची) स्थिति उघडी करून दाखवूं नये. त्यांत आपली अब्रू राहते. झाकलें माणीक—न. (ल.) दिसायला साधा पण खरोखर गुणी व विद्वान् मनुष्य. झांकल्या पाठीचा—वि. ज्याला कांहीं सबब सांगता येईल किंवा जो फारसा अक्षम्य समजला जाणार नाहीं असा (अपराध इ०). झांकल्या पाठीनें—क्रिवि. अब्रू गमावून न घेतां; प्रतिष्ठितपणानें; वोज कायम ठेवून. झाकल्या मुठीं—मुठीनें—क्रिवि. गुपचूप; वभ्रा न करितां; बोभाटा न होऊं देतां; कोणालाहि कळूं न देतां; गुप्तपणें. झांकसापा करणें—सक्रि. (व.) दावादावी करणें. झांकून—क्रिवि संक्षेपानें.—शर. झां(झा)कापाक—का—स्त्री. १ जेवण झाल्यानंतरचीं स्वयंपाकघरांतील उरलींसुरलीं कामें (समुच्चयानें). 'स्वयंपाक घरांतील झाकापाक करून त्याही वर गेल्या.' —कोरकि ३०३. २ जलदीनें, गडवडीनें आवरणें, उरकणें. [झांकणें द्वि.] झांकीव—वि. १ झांकण, ढांपण असलेला (डवा, पेटी इ०). २ ज्यावर झांकण, आच्छादन ठेवलेलें आहे असा. ३ झांकून ठेवलेला; लपवून ठेवलेला; वंद करून ठेवलेला. [झांकणें] झांक्या— वि. झाकणारा. [झांकणें]

झां(झा)कर—न. १ अतिशय दाट व पुष्कळ फांद्या फुटल्यामुळें विस्तृत दिसणारें (मिरची इ० कांच्यासारखें) झुडप. २ झाडाच्या अतिशय पानांचा गर्द, निबिड भाग; जाळी. 'वानर आंब्याच्या झांकरांत जाऊन वसला आहे.' ३ दाट पानें असलेली झाडाची खांदी. उदा० वेली इ० चढविण्याकरितां तोडून आणून पुरतात तशी. [सं. शाख्=पूर्ण व्यापणें. गु. झांकळं=कांटेरी झुडप]

झांकरणें—अक्रि. (झुडप, झाड इ०) भरगच्च पानांनीं झांकलें जाणें—युक्त होणें; गुरफटलेलें असणें. [झांकर]

झाकरी—क्रिवि. तावडतोब; लौकर; त्वरित. 'झाकरी अनुमानाचेनि कतलें।' —ज्ञा ७.१९२. [झ्या+करणें]

झाकली—स्त्री. (गु.) निळीचा रंग तयार करण्याच्या कारखान्यांत निळीचें पाणी साठविण्याकरितां बांधलेला हौद. —कृषि ४१२.

झाकविणें—झकविणें पहा.

झांक(का)ळणें—उक्रि. १ झांकून ठेवणें; लपविणें; आच्छादित करणें; दडविणें. २ घेरणें; व्यापणें; लुप्त करणें; छायेनें आवृत करणें; व्याप्त होणें. 'झोंपेनें झांकलिला प्रियो।'—मुआदि ९.४०. —अकर्तृक्रि. १ अंधुक होणें; मलिन होणें; अंधारून येणें (ढग वगैरेनीं). 'प्रभा पृथिमीवरी। यकायकीं झाकळली बरी।' —ऐपो १२७. २ झाकुळणें, झाकोळणें पहा.

झांकातापा—पु. लपंडाव; छपवाछपवी. 'प्रगट विवेक बोलेना। झांकातापा करी जना।' —दा १९.६.९.

झाकी—स्त्री. (व.) मूक अभिनयाचें नाटक; चालत्याबोलत्या माणसांचा सिनेमा. [ हिं. झक, झाक ]

झांका—स्त्री १ (प्रां.) मूर्च्छेमुळें, ग्लानीमुळें डोळ्यांवर येणारी झांपड. २ अंधारी; घेरी. (क्रि० येणें; पडणें; घालणें). [ झांकणें ]

झांकी—स्त्री. १ शोभिवंत मांडणी, आरास. 'श्रावण महिन्यांत देवाच्या मंदिरांतून झांकी व रोषनाई होण्याचा रिवाज आहे.' —विक्षिप्त १.७०. २ ऐट; डौल. [ झक् ]

झांकु(को)ळणें—उक्रि. १(काव्य) झांकणें; लपविणें; आच्छादित करणें. 'यादव सैन्याचा महागिरी। शरधारीं झांकोळला।' —एरुस्व ८.४९. २ (ल.) झांकलें जाणें; फिकें पडणें. 'मत्स्यवंशकुळदीपकजोती। झांकुळेल म्हणऊनि उजोती। —वामन, विराट ७.१४९. ३ व्याप्त होणें; लिप्त होणें. 'परी तेथिचेनि उर्मी। झांकोळेना।'—ज्ञा ३.७०. —अक्रि. १ दिपणें; दिपून जाणें; चकित होणें. २ बंद होणें; मिटणें (डोळे, पापण्या इ०). 'बुद्धीचें द्वार। झाकोळे जेणें।'—माज्ञा १३.११५. ३ अंधारमय होणें; सांयकाळ होणें. 'झांकोळलें गगन सूर्य गेला मिळून।'—ऐपो १२०. [ झांकणें ]

झांकें—अ. व्यर्थ—मनको.

झांगड—स्त्री. १एक प्रकारचें वाद्य; झंगट. 'झांगड नौबत वाजती दणादण।'—ऐपो ११८. २ अनेक वाद्यांचा एकदम होणारा कडकडाट, गजर. ३ (व.) लचांड; लिगाड; झंगटः ब्याद. 'ती झांगड माझे मागें आहे.' ४ भांडण; कलहः वाचावाच; झांगडझिंगा. [ध्व.] ०झांगड—स्त्री. भांडाभांडी; जोराचें, हमरीतुमरीचें भांडण; झगडा. —क्रिवि. नगारा, नौबत यांच्या आवाजाच्या दणक्यानें; मोठ्या गोंगाटानें, गलबल्यानें. ०झिंगा—पु. तंटाबखेडा; धांगडधिंगा; धिंगाणा; धिंगामस्ती. [ झांगड द्वि. ]

झांगड—न. (कु.) मोठ्या विरवणाचें जाळें.

झांगडू—डू—वि. (कर.) उत्तम; फक्कड; फकडू. १ प्रेमपात्र; रखेली, बाई. २ प्रेमरहस्य; गुप्त प्रेम. [ झंगट ]

झांगरा—पु. (ना. व.) उडवाउडव; थापेबाजी. झांगरें शिकवणें, झांगरेबाजी करणें—(ना. व) उडवाउडवीचीं उत्तरें देणें; बोलतांना एखाद्या गोष्टीचा थांग न लागूं देणें.

झाज—न. जहाज पहा. [ फा. जहाज ]

झांज—स्त्री. १ पंखा; विंझणा. २ ताटी; पडदा. झुरकुला पहा. 'वाळियाच्या झांजी। दवण्याचे कुंड घालोनी।'—ऐपो १५.

झांज—झ—स्त्री. एक प्रकारचें काशाचें वाद्य; हें पुरीएवढ्या कांशाच्या तुकड्याच्या मध्यावर थोडी फुगवटी असलेलें व तींत दोरी ओंवण्याकरितां एक भोंक पाडलेलें असें असतें. ओवलेल्या दोरीस बाहेरील बाजूस धरण्याकरितां लाकडाची गोटी बांधतात. प्रत्येक हातांत एक झांज घेऊन त्या परस्परांवर आपटून भजन, कीर्तन इ० कांत ताल धरतात. [ध्व.; सं.; प्रा. झंझ; हिं. झांझ; सिं. झांझु; तुल० फा. संज्] (वाप्र.) झांज खाणें—(व.) एखाद्याची खरडपट्टी काढणें. झांज झाडणें पहा. 'आमच्यावर झांज खाण्यांत काय अर्थ आहे.' ०झडणें—जाणें—अक्रि. १ झांजा हातांत असणें; झांजा वाजविल्या जाणें. २ एकाद्या कामांत असणें; चकमक उडणें; भांडाभांडी होणें; मोठ्यानें ओरडून बोलणें. ०झाडणें—एखाद्याची खरडपट्टी काढणें; ताशेरा झाडणें. झांजी—ज्या—वि. झांज वाजविणारा. [ झांज ]

झांज—स्त्री. मूर्च्छा; झीट; घेरी; चक्कर; डोळे फिरणें. (क्रि० येणें.) [ सं. झंझा ]

झांजड—र, झांजरमांजर, झांज(झ)ड मांज(झ)ड—नस्त्री. १ पहाटेच्या वेळचा झुंजरूक मुंजरूक; झुंजुमुंजु; अंगावरील लव दिसण्याजोगी पहांट. (सामान्यतः द्विरुक्तीनें) उदा० 'झांजड झांजड झालें कीं लागलेंच औषध घ्या.' (क्रि० पडणें; होणें). २ सायंकाळचा संधिप्रकाश. 'संध्याकाळीं मागत फिरतो महारापोरा पर्णी चारा। झांजर पडतां घेऊन पळे हा रांडसुंडेचा नित मारा।'—प्रला २४०. —क्रिवि. अंधुकअंधुक; मिणमिण. [ सांज? ]

झांजर—पु (हत्ती, बैल, घोडा इ० कांच्या पायांत घालावयाचा) वाळ्यासारखा झणझण वाजणारा दागिना. —खानगी खातें, लागतीचे नियम (वडोदें) पृ. ५२ व ५५. [ झांज ]

झांजर—वि. जीर्ण झालेला; झिरझिरीत, विरविरीत झालेला (कपडा इ०). 'एका अंगावर झांजर शेला तो जातो चुरचुरा।' —पला ८३. [ सं. जर्जर; हिं. झांझर=फाटलेला ]

झा(झां)जरणें—उक्रि. १ घसवटणें; घासटणें; खरडणें; खरचटणें. 'चंद्रिकेच्या अंगावर झाजरल्यासारखें झालें.'—निचं १४. २ (ल.) (राजा.) फसवणें; एखाद्याला टोपी किंवा गोता घालणें. ३ वापरून खराब होणें; जीर्ण, जर्जर होणें; झिजणें; छिन्नभिन्न करणें; खराव

होणें, करणें. 'ती जखम झाजरल्याइतकी ... कठीण ठरली नाहीं.' –झामू २.४ (ल.) पीडणें; पीडा देणें. 'झांजरलीं पंचवाणें एक-मेकावरी पडिलीं हरणें ।'–भाए४३०. [सं. जर्जर; म. झांजर] (वाप्र.) **झाजर माडाचे गरे खाणें**–(उप.) झाडावरून पडून अंग खरचटल्यानें, ठेचल्यानें पीडित होणें. **झांजरता**–वि. ओझरता पहा. **झांजरला**–वि. झिजलेला; जर्जर झालेला. 'दोन्ही खांद्याला दोन्ही घट्टे बांधल्या गरधी । वांकडा हातखुला देह झाली झांजरगी।' –पला ८०. [झाजरणें]

**झांजरा**—पु. हुरहुर; हुरहुर. 'शत्रुनें तुज बांधितां रथि हुंवरा सम वासरा । फोडिला असशील तूं मज लागला जिवीं झांजरा।'–कुशलवाख्यान ३२. (मराठी ५ वे पु. आवृत्ति ८, पृ. १६३.)

**झांजरी**—स्त्री. लहान झांज; टाळ. 'मोरचंग झांजरी पंती-संपत्यही नानापरी ।'–राला ३१.

**झांजरी**—स्त्री. (वे.) झुग्गी (गव्हाची कोंडा काढून केलेली खीर)

**झांजरो, झांजी**—स्त्री (व.) झोपडीच्या दाराची झडपी (गवत वगैरेची); झांज पहा.

**झाजाव(वि)णें**—सक्रि. जोराजोरानें धसधस तोडणें; पुन्हां पुन्हां घाव मारणें; खापलणें; खांडणें; जाजावणें पहा.

**झांजू**—न. एका विशिष्ट तालांत गावयाचें पद, पोवाडा.

**झांझ**—झांज पहा.

**झांझड-डी**—स्त्री. झांजड पहा. 'मोटकी जाली झांझडी।' –गीता २.२२८८.

**झांझर-री**—स्त्री. झांजरी पहा. 'नाना ताळ झांझर सुंदर मृदांग।'–सप्र ९.३१.

**झांझरणें**—झांजरणें पहा.

**झा झा, झां झां**—उद्गा. (घोडा, बैल इ०नें) जलद चालावें म्हणून उच्चारावयाचा हांकणाऱ्याचा शब्द. 'झां झां म्हणतां प्राण कंठाशिं आले.' [ध्व. झा द्वि.] (वाप्र.) **झाझाचें करणें, झां म्हणणें**–अक्रि. निसटून जाणें; पलायन करणें; हातावर तुरी देणें; पोबारा करणें.

**झाझात**—स्त्री. (कर.) शिकस्त; पराकाष्ठा; अटोकाट यत्न; यातायात. (क्रि० करणें). 'त्यानें झाझात केली पण कांहीं एक जुळलें नाहीं.' [झां झां ?]

**झांझी**—स्त्री. (व. खा.) झांजी; कापसाच्या पऱ्हाटयांची विण-लेली ताटी. [झांज]

**झाझ्झू**—स्त्री. १ कटकट; धुसफूस. बोलाचाली. २ झुमझुम, झुनझुन असा आवाज. [ध्व.]

**झां(झा)ट**—न. १ (अश्लील) शिस्नाच्या किंवा योनीच्या वरील केंस, केंसांचा समुदाय; गुह्यस्थानचे केंस; शष्प. शेट. २ –स्त्री. खालीं लोंबलेल्या बटा. 'मोहालीं पांखरांवरी झांटा। पायीं नोपुरें क्षुद्र घंटा।'–गीता १.४८२. [सं. जटा ? देप्रा. झंटी=ऱ्हस्व-नसा केशकलाप; हिं. झांट] ०**मुंडावण**–स्त्री. गुह्येंद्रियावरील केंस काढणें यावरून) (तिरस्कारार्थी) अतिशय क्षुद्र व सोपें काम. [झाट+मुंडावण] **झांटोजी**–वि. (अशिष्ट) (उप.) व्यर्थ फुशा-रकी मारणारा; ढोंगी; गर्विष्ठ माणूस); क्षुद्र; हलका (माणूस). [झाट]

**झाड**—न. १ वृक्ष; झुडप; रोप; वनस्पति (लहान, मोठी). 'तूं फिरलास झाडोझाड मीं फिरलों पानोपान.'–तुझ्या पेक्षांहि मला जास्त माहिती आहे. २ शाखायुक्त वस्तु, पदार्थ; वृक्षाकार वस्तु. ३ मेणवत्ती इ० लावण्याचें कांचेचें झुंबर; पुष्कळशा उदवत्त्या लावण्याचें वृक्षाच्या वाकाराचें धातूचें घर. 'चांदीच्या झाडांतून उदवत्त्या खोंविल्या होत्या.' –अस्तंभा १३६. ४ दारू-कामांतील एक प्रकार; वृक्षाच्या आकाराचें दारूकाम. ५ भूतानें पछाडलेलें माणूस. 'ज्यास भूत पछाडतें त्या झाडास तें सुग्रास अन्न खाऊं देत नाहीं.' –अस्तंभा ५८. ६ वंशवृक्ष; वंशावळ. ७ (कु.) बंदुकीचा लांकडी भाग, दस्ता. [सं. झाट; प्रा. झाड] (वाप्र.) ०**उभें करणें**–उत्कृष्ट रीतीनें एखादें काम वठविणें. उदा० गायन, वादन, कीर्तन, व्याख्यान इ० इतक्या उत्तम शैलीनें करणें, रंगविणें कीं जणुं काय तें करणारा, एक विशाल व फळाफुलांनीं युक्त असा वृक्षच उभारीत आहे असें वाटावें. **कोण्या झाडाचा पाला**–एखाद्याचा दिमाख, नक्षा, मगरूरी उतरण्या-करितां, उद्धटपणाची लुडबुड थांबविण्याकरितां, अभिमान, अधिकार झिटकारण्याकरितां योजावयाचा शब्द; अशा माणसाविषयीं क्षुद्रता व तिरस्कार दाखविणारा शब्दसमूह. 'सुभेदार ? हं: सुभेदार म्हणजे कोण्या झाडाचा पाला ? आम्ही ओळखीत नाहीं असें जाऊन सांग जा !' –नाट्यकथार्णव. **झाडाचे राऊन दिसणें, करणें**–भीतिं इ०कामुळें झाड घोडेस्वार इ०कांच्या आकृतीप्रमाणें दिसणें; दोरीचा साप बनविणें (वायवलांत सुद्धां अशीच कल्पना जजेस् ९.३६. मध्यें दृष्टीस पडते). **झाडावरचें भूत**–(ल.) ज्याचा नामनिर्देश करणें अनिष्ट आहे अशा नीच, तिरस्करणीय मनुष्याबद्दल वापरावयाचा वाक्प्रचार. (**सुकया झाडास वा(बां)क लावणें**–(सुकलेलें झाड इष्ट त्या दिशेनें वांकवितां येणें शक्य नाहीं यावरून ल.) एखाद्या वृद्धास उपदेश करणें, हट्टी, हटवादी, पूर्वग्रहदूषित माणसास बोध करणें (पालथ्या घागरीवरच्या पाण्याप्रमाणें आहे). सामाशब्द. **झाडकी**–स्त्री. क्रि. झाडी. ०**कुट**–न. (गो.) वाळलेलें, मोडून पडायला आलेलें झाड, फांदी, काटकी. ०**खंड**–न. १ जंगल; झाडी; झांकर; झुंवाड; राई; रान. 'विशाळें बहु लागलीं झाडखंडें।' –राक १.१२. २ झुडुपें; जाळी; लहान झाडांचा

समुदाय. [झाड+खंड] ०खंडा–क्रिवि. १ (वर दिलेल्या झाड उभें करणें या वाक्प्रचाराच्या उलट अर्थी–झाडाचीं पानें, फुलें, फळें, तोडून टाकलीं असतां तें वेडव व ओवडधोवड दिसतें या-वरून) ओवडधोवड; अर्धवट; रूक्ष; नीरस; अशास्त्रीय; अव्यवस्थित; बेशिस्त असें (गायन, वादन, कीर्तन, व्याख्यान इ०). २ गुरुपाशीं अभ्यास न करतां नुसतें एकूल आपल्याच अकलेनें वाज-विणारा व त्याचें तें वादन; स्वयंसिद्ध (गवयी, वादक). 'त्याचा वाणा, वाणी, गाणें, वाजविणें, म्हणणें, झाडखंडा आहे.' [झाड+खंडणें] ०खंडी–स्त्री. (क.) झाडें व झुडपें. 'दरें दर्कुटें झाडखंडी अनेकी।'–दावि. –वि. अरण्यमय; जंगलाचा (प्रवेश; जागा इ०). [झाड+खंड] ०गाळ–वि. वृक्षमय. झाडखंडी पहा. ०झुडुल्ला–पु. (व्यापक) लहानमोठ्या झाडांचा समुदाय; वृक्ष; झुडुपें; रोपटीं. [झाड द्वि.] ०झाडोरा–झुडपी–झडुल्ला–झुड–झुडुप–पुखी न. लहानमोठ्या झाडांचा समुदाय. (समुच्चयार्थी, एकुणएक किंवा कोणतेहि). झाडझडुल्ला पहा. ०दस्त–पु. फळझाडांवरील कर. 'झाडदस्त झाडे सुमारी ३१ येकूण रुपये.' –मसाप २.२.१४३. [म. झाड; फा. दस्त=कर] ०पंचाळ–वि. १ (माकड अतिशय चपळ असल्यानें तें जणुं काय एकाच वेळीं पांच झाडांवर असल्याचा भास होतो यावरून) चपळ; तरतरीत; दुण-दुणीत; चलाख. २ चंचल; वळवळ्या; चुळबुळ्या; पायांवर भोंवरा असलेलें (मूल इ०). ०पदरी–वि. किनारीमध्यें रेशमाचीं झाडें, फुलें काढलेलें (वस्त्र इ०). [झाड+पदर] ०पाला–पु. १ (व्यापक) (औषधाच्या उपयोगी) वनस्पती, त्याचा पाला, मुळें इ० (सामा.) वृक्ष; वनस्पति. २ (व्यापक अर्थी) खाण्याच्या उपयोगाचा भाजी-पाला, पानें इ० ०पाल्याचें औषध–न. वनस्पतीपासून तयार केलेलें औषध; याच्या उलट रसायनी औषध–खनिज धातु–पदार्थ इ०कांपासून केलेलें. [झाड+पाला] ०पेढ–ड–माड–पु. (व्यापक) झाडझाडोरा पहा. [हिं. झाड+पेड=झाड; माड] ०झाडरूं–न. लहान झाड; झुडूप. 'या बाजूस रानांतून, डोंगरावर दवणा, रामाठा, ... वगैरे झाडरूंच रगड.' –खेया ४३. [झाड] झाडशाई–स्त्री. वस्त्रांवर काढलेलीं झाडांझुडपांचीं चित्रें. –वि. झाडांचीं चित्रें ज्यावर आहेत असें (वस्त्र, भिंत, जमीन). झाडझवा–वि. (शब्दशः अश्लील, पण तो अर्थ मनांत येत नसल्यानें रूढ) उनाड; भटक्या; भणंग; भटकभैरव; उडाणटप्पू. [झाड+झवणें] झाडळ–ळी–स्त्री. दाट झाडी; राई. 'जीवधर्मांचिया झाडळी। मनोरथांचिया वेंधजाळी।'–ज्ञाप्र २६६. झाडसुनें–न. झाडकुत्रा; कुत्र्याची एक जात. 'पाणसुनीं झाडसुनीं। नाना प्रकारींचीं सुनीं।' –दावि २४४. [झाड+सं. शुन=कुत्रा]

झाडण–स्त्री. १ केरसुणी; झाडणी. २ झाडण्याची क्रिया. ३ (ल.) (कर्ज, अक्सासुमी इ०कांची) निःशेषता करण्याची क्रिया; फडशा पाडणें; देणें वारणें; काम पार पाडणें. [झाडणें]

झाडणा–वि. झाडणारा. 'मी झाडणा मी खिल्लारी।'–एभा १२.५६१. [झाडणें]

झाडणी–स्त्री. १ (खा. कों.) झाडण; केरसुणी. 'दिर्ती म्हणे नृप अहा चवरी ती झाडणीच कीं केली।'–मोआदि १२.७८. २ झाडणें; झाडून, झटकून टाकणें. ३ अंगांतील भूत, पिशाच्च इ० मंत्रतंत्रांनीं काढणें; पिशाच, विष, डोळ्यांतील फूल इ०काढण्या-करितां मांत्रिक करतात तो टाहाळ टाकण्याचा विधि; हकालपट्टी. 'अहंमहिषासुर लागला जनीं। त्यासि करावया झाडणी। कृष्ण गुणी चालिला।' –एमा ७.२०८. ४ (ल.) रागें भरणें; कानउघा-डणी; खरडपट्टी; खडसावणी; निर्भर्त्सना. [सं. झाटन; प्रा. झाडण]

झाडणें–उक्रि. १ (केरसुणी इ० नीं) केरकचरा काढून साफ करणें; जागा निर्मळ करणें. २ हसडणें; झटकणें; झटक्यानें हलविणें (ओलें वस्त्र, शेंडी इ०); (हात, पाय, डोकें इ. कांस) झटका देणें. 'झाडितां आपला हात। तंव आंगासि असे जडित।'–परमा १०.१९. ३ लोटून देणें. 'त्यांतें उडोनि झाडी झाले ते चूर्ण जेविं नगपातें।' –मोवन १२.२९. ४ काढून टाकणें; नाहींसें करणें. 'लोक पारखुन सोडावे। राजकारणें अभिमान झाडावे।' –दा ११. ५ (विस्तव इ० कांस) पंख्यानें वारा घालणें; झड-पणें. ६ खरडपट्टी काढणें; खडसावणें; निर्भर्त्सना करणें. 'वाव्ला आणि नंद्याला लक्ष्मीकाकूंनीं चांगलेंच झाडलें.' –सुवे ५२. ७ (मागणाराचा, भिकाऱ्याचा) निषेध करणें; मनाई करणें; साफ नाकारणें; बंदी करणें. 'अंतींच स्मरावें श्रीरामराम। ऐसा कितेका जडला भ्रम। असो गृहस्थानें भजनप्रेम पाहोनि मस्तक झाडिला।' –दावि २०२. ८ (सरकार, सावकार इ० कांची) बाकी काढून टाकणें; देणें बेबाक करणें. 'धन्याची बाकी हळु हळु झाडा।' –भज १३४. ९ (अंगातील भूत, पिशाच इ०) काढणें; हाकलून लावणें. १० (बंदूक इ०) उडविणें; गोळी मारणें. –अक्रि. (बंदूक इ० कांनीं उडतांना हात इ० अवयवास) हिसडा, झटका देणें. [सं. झाटन; प्रा. झाडण; हिं. झाडना; जुका. झडिसु=टाकणें, फेंकणें; झाडणें=केरसुणी; फेकणें] ०झट-कणें–उक्रि. केरसुणी इ० कानीं झाडून, फटके देऊन, धूळ उडवून साफ करणें, निर्मळ करणें. झाडझपट–झटक–स्त्री. १ (व्यापक) धूळ, केर इ० काढण्याचा, झाडण्याचा, झटकण्याचा व्यापार; झाड-झूड; सडासंमार्जन. २ (ल.) (व्यापक) चोरीच्या म्हणून समजल्या जाणाऱ्या लुबाडणें लुटणें इ०. सर्व क्रिया. 'त्यानें आजपावेतों झाडझपट करून पोट भरलें.' ३ लुटालूट; धूळधाण; दाणादाण. 'पेंढाऱ्यांनीं त्या गांवांत जाऊन झाडझपट केली.' [झाडणें+झपाटणें] झाडझूड–स्त्री. झाडझपट अर्थ १ पहा. 'माझी झाड-झूड होईतों तूं पाणी घेऊन ये.' [झाडणें द्वि.] झाडपट्टी–स्त्री. १ जमीनीचा सारा किंवा घरपट्टी यावद्दलची बाकी चुकती

करण्याची अखेरची मागणी. २ (उप.) खरडपट्टी; खडसावणी; वोडंती. (क्रि० करणें). [झाडणें+पट्टी=कर] **झाडपाखड**–स्त्री. १ (धान्य इ०) सुपानें पाखडण्याची,-झटकण्याची, साफ करण्याची क्रिया. २ (ल.) कवडीकवडीचा हिशोब देणें–घेणें. [झाडणें+पाखडणें] **झाडपि(पी)ड**–स्त्री. झाडझूड; झाडलोट. 'झाडपीडी करूनि मानऊं संताला।' –दावि ३५३. [झाडणें द्वि.] **झाडपिड्या**–वि. देऊळ, मंदिर इ०कांची झाडझूड,साफसूफ करणारा. [झाडपिड] **झाडपोतें**–न. कर्जफेडीचा शेवटचा हप्ता.[झाडणें+पोतें] **झाडफूक**–स्त्री. (ना.) अंगारा; धुपारा; मांत्रिकाकडून करावयाचा मंत्रोपचार. (क्रि० करणें). [झाडणें+फुंकणें] **झाडफेड**–स्त्री. (राजा.) झाडझूड; झाडलोट. [झाडणें+फेडणें] **झाडबाकी**–स्त्री. १ (कर्ज, अभ्रसामुग्री इ० कांची) पूर्ण निःशेषता; वेवाक; निरानिपटा. २ कर्जफेडीचा शेवटचा हप्ता. (क्रि० करून टाकणें; करणें). [झाडणें+बाकी] **झाडलोट**–स्त्री. केर काढणें, सारवणें इ०; झाडझूड. [झाडणें+लोटणें] **झाडलोट्या**–वि. झाडलोट करणारा. –मसाप २.८.३९७. [झाडलोट] **झाडवण**–स्त्रीन. झाडण्याची क्रिया. –पु. (काव्य.) १ झाडणारा. 'चोखामेळा म्हणे मी तुमचा। झाडवण साचा म्हणवितों।' २ केरसुणी; झाडू. [झाडणें; प्रा. झाडवण] **झाडसारव, झाडवणसारवण, झाडसारवण**–स्त्री. (समुच्चयानें); (घर इ०) झाडणें व शेणानें सारवणें इ० क्रिया; साफसुफी. 'झाडसारवण...वगैरे...करतांना त्यांचीं अंगें उकिरड्यासारखीं होत असतील यांत काय नवल!' –नाकु ३.९. [झाडणें+सारवणें] **झाडून**–क्रिवि. एकंदर सर्व, यच्चयावत्; एकूणएक; एकहि न वगळतां. 'यदुसचिव पौरसुख्य द्रुत आणविले सभेंत झाडुनी।'–मोमौसल २.२९.–पया ७९. [झाडणें]

**झाडन-नी**–स्त्री. झाडणी; (व.) गवताची केलेली केरसुणी.

**झाडनी**–स्त्री. झाडणी अर्थ ३ पहा. (क्रि० करणें). 'भूतबाधा झालीसे इजला करा झाडनी याघडी।'–होला १४१. [झाडणी]

**झाडनी**–स्त्री. (व.) कडाक्याच्या थंडीनें, किंवा फार आंबट पदार्थ खाल्ल्यानें (मनुष्यानें केलेली) हात, पाय,डोकें इ०झाडण्याची क्रिया; शहारे आल्यासारखें करणें. (क्रि० देणें). [झाडणें]

**झाडपंचाळ**–पु. सोनारांतील एक पोटजात किंवा त्या जातीचा मनुष्य (सोनार ही जात पांचाल ब्राह्मणांपैकीं आहे). [झाड+पांचाल]

**झाडवळ**–वि. झाडवाला. 'आववे झाडवळी महार। उतरले पार संतासंगें।' –भज ६१. [झाडणें+सं. वत्; हिं. वाला; म. वळ प्रत्यय]

**झाडा**–पु. १ (कायदा, सामानसुमान इ० कांची सरकारी नोकरानें केलेली) झडती; बारीक तपासणी. (क्रि० घेणें.) २ (सामा.) हिशेव चुकता करणें; हिशेव, देणें–घेणें मिटविणें. ३ (ल.) पूर्णपणें, कांहीं लपवून न ठेवतां उघड करणें; खरें स्वरूप प्रकट करणें; झडती देणें. 'अहंतादि भावां आपुलियां। झाडा देऊनि आघवेयां।'–ज्ञा १७.२७९. ४ जुलाब; मलविसर्जन; मलशुद्धि. ५ फन्ना; निकाल; फडशा; निरास. 'त्याच दिसीं झाडा द्रव्याचाही जाला।'–रामदासी २.९९. ६ (गो. खा.) (भूत, पिशाच्च, विषार इ० काढण्याकरितां मांत्रिकानें) टाहाळ्यानें, केरसुणीनें केलेली झाडणी. (क्रि० घालणें). [सं. झाटन; प्रा. झाड; हिं. झाडा; गु. सिं. झाडो] (वाप्र.) ०**करणें**–१ कर्ज फेडणें. 'झाडा करून देऊं.' –भाअ १८३५.२७१. २ नाश करणें; निकाल करणें. 'ऐसा द्वादश वार्णे झाडा केला।' –जै ३०.३७. ३ शौच करणें; परसाकडे जाणें. ०**घेणें**–बारकाईनें कसोशीनें तपास करणें. 'छप्परबंदांच्या तळाचा झाडा बारकाईनें घ्यावा.' –गुजा ४६. ०**पुसणें**–विस्तारपूर्वक सांगणें. 'श्रोते म्हणती न पुसी झाडें। लग्न निवाडें लागोंया।' –एरुस्व १५.१५९. ०**होणें**–संपणें. 'आतां बातमी हरकारे झाडा झाले, लवकरी आणीक पाठविणें.' –पेद १०.९१. **झाड्यास जाणें** शौचास जाणें. सामाशब्द–०**झटका**–पु. (व्यापक) १ सरकारी नाकें इ० कांवर केली जाणारी झडती, तपासणी इ०. २ शौचमुखमार्जन; परसाकडणें, तोंडधुणें इ० [झाडणें+झटकणें] ०**झडती**–स्त्री. १ (व्यापक.) झाडाझटका अर्थ १ पहा. २ (एखाद्याकडून) कवडीकवडीचा हिशेव घेणें; हिशेवाची कसून केलेली तपासणी, विचारपूस. (क्रि० घेणें). [झाडा+झडती] ०**पत्र–पत्रक**–न. मामलतदारानें ठेवावयाचें वसुलाच्या झाड्याचें मासिक पत्रक. निकालपत्र पहा. [झाडा+पत्र=कागद] ०**पवाडा–पाडा**–पु. १ कसून हिशेव मागणें; कडक रीतीनें जाव विचारणें. २ अशा तऱ्हेनें दिलेला हिशेव, जाव, झडती (सामान्यतः अनेकवचनीं प्रयोग). (क्रि० करणें; देणें; घेणें; होणें; येणें). 'न सुटेचि बाकी नव्हे झाडापाडा।' –तुगा १५४३. या कामाविषयीं कोठें झाडेपवाडे द्यावे लागतील काय कोण जाणे.' [झाडा+पवाडा=पाडा] ०**बाकी**–स्त्री. (कर्जाच्या) बाकीचा निकाल, फडशा. 'नामदेवा म्हणती घ्यावा जन्म तुम्हीं। झाडाबाकी आम्ही करूं येथें।' –रामदासी २.१४३. [झाडा+बाकी] **झाडावा**–पु. तपासणी; शुद्धि. –शर. [झाडा] ०**वॉरंट**–न. (कायदा) जंगम माल शोधून काढून मॅजिस्ट्रेटकडे हजर करण्याबद्दल पोलीस अंमलदारास दिलेला हुकूम. (इं.) सर्चवॉरंट. [म. झाडा+इं. वॉरंट=आज्ञा, परवाना] **झाडेकरी**–पु. (जकातीच्या नाक्यावर नेमलेला) झाडा घेणारा अधिकारी; जकात-अंमलदार. [झाडा+करणें] **झाडेकार**–पु. (गो.) भूतबाधा घालविणारा, विष इ० उतरविणारा मांत्रिक. [झाडा+करणें] **झाडेभवांडे**–पुअव. (व.) १ अळंटळं; हयगय; दिरंगाई. 'आतां का झाडेभवांडे देता.' २ हाल; हालअपेष्टा; भोग. 'आमच्या जित्राचे झाडेभवांडे आहेत.' [झाडा+भोंवांडा]

**झाडी**—स्त्री. १ झाडणें; झाडून टाकण्याची क्रिया. 'सुरडिवें आगें झाडी करितु । अनियाळां डोळां वेंझ घेतु ।'—शिशु ७१०. २ निकाल; फडशा. झाडा पहा. ३ शुद्धि. ' देहजाड्याचिया किटा । आवृत्तिपुटीं सुभटा । झाडी कीजे '—ज्ञा १७.२०९. ४ लांबविणें; पळविणें. [झाडणें] ०करणें—झाडून टाकणें; निकाल, नाश करणें. 'स्वानंदें तृप्ति झाली. । झाडी केली भवरोगा । '—एभा १०.२९.

**झाडी**—स्त्री. १ जंगली किंवा झाडांझुडपांनीं व्यापलेला प्रदेश; राई; झाडांचा समुदाय. 'ज्यांच्या रम्य तटांवरी पसरल्या झाडया किती सुंदर । '—केक १२८. २ झाडोरा; झाडझुडपांनीं व्याप्त अशी अवस्था, निबिडता. ३ (ना.) चांदा व भंडारा हे अरण्यमय जिल्हे, यांना झाडीपट्टी असेंहि म्हणतात. [म. झाड; का. झाडी] ०वाट—स्त्री. झाडींतून, जंगलांतून जाणारी वाट; जंगलांतील पायवाट. या वाटेंत चोरांची फार भीति असते. ' झाडीवाट ते नेणती स्वामी । पुत्रासी न धाडितां समागमीं । '—दावि ३९२. [झाडी+वाट]

**झाडी**—स्त्री. (हेट. नाविक.) गलबताच्या वांकांच्यामध्यें उभें घातलेलें लांकूड; (गलबताच्या) वांकाची वाढी व भाग व गलबताची एकएक बाजू यांस जोडणारा तिरपा वासा. [झाड]

**झांडी**—स्त्री. (ना. गोंडी.) एक लहानसें लांकडी टाळासारखें गोंडी वाद्य. [झांज, झांजडी]

**झाडू**—पुस्त्री. १ केरसुणी; खराटा. २ रस्ते झाडणारा; विशेषतः भंगी, हलालखोर. 'ही वया माझ्या शिकारखान्यामधीं झाडूचं काम करीत व्हती.' —वाय २.६. [झाडणें; हिं. गु. झाडू] ०खोर—पु. (ना.) भंगी; मेहतर. ०वाला—वि. रस्ते झाडणारा; भंगी. 'पहिल्याच झपाट्याला झाडुवालीचें काम पत्करतें.' —नाकु ३.३८. [झाडू+वाला=धंदेवाचक प्रत्यय]

**झाडोरा, झाडौली**—पु.स्त्री. (कों.) १ दाट, गर्द झाडी; राई. २ त्यामुळें होणारें अभेद्यत्व; दाट झाडेंझुडपें असणारी जागा. 'कल्पतरूंचे झाडोरे । '—वेसीस्व ९.२०. 'विचित्रा वेदवेलीं । दिसती सहजें सिद्धांओळीं । भावा भावाचिया झाडौली । चहोंकडे । '—दाव ४४४. [झाड+आवली=रांग]

**झाड्या**—धाना. १ झाडूवाला; भंगी; हलालखोर. २ सोदा; उचल्या; भामटा; चोर. [झाडणें]

**झाड्या**—धाना. पिशाच्च किंवा देव यानीं पछाडलेला मनुष्य; (भूताचें, पिशाच्चाचें) झाड. [झाड]

**झांनन**—पु. झनझन असा आवाज; झणझणाट; झणत्कार; छुमछुम; रुणझुण. नाचण्याचा आवाज. छनन पहा. 'धिमकी धिमकी धिमभेरी—झननन झांनन झनत्कारी । '—राला ३८. [ध्व. झन्]

**झांप**—पु. १ कांटेरी झुडपांचें दाबून बांधलेलें मोठें ओझें; काट्यांचा भारा. २ झाडाची मोडलेली फांदी; झांकर. ३ (कों.) नारळीच्या झाडाची फांदी, झावळी, सावळी. ४ नारळीची, माडाची चटईसारखी विणलेली झावळी; चुडवत; सावळीचा वळलेला तक्ता, चटई. हा छपराला उपयोगी पडतो. ५ गुरें जाऊं नयेत म्हणून केलेलें फाटक, दुवेळकें. वेडें; आँगर; झांपा. ६ दाराचें, खिडकीचें झडप, फळी. ७ शेतांतील गवतारू झोंपडी; गुरवाडा. ' शेतांत एकदोन घरें असलीं तर त्यांना झांप म्हणतात. '—गांगा २. ८ कोंबड्यांसाठीं मोठ्या करंड्याच्या आकाराचें केलेलें तक्त्याचें खुराडें. [प्रा. झंप=झांकणें; हिं. झांप=झांकण; गु. झांप=जाळें] ०टळ—न. माडाची जुनी झावळी; जुनी झांप. [झांप+टळ प्रत्यय]

**झांप**—न. (गो.) गुंतागुंत; घुसणी पहा. [गु. झांप=जाळें]

**झां(झा)प**—स्त्री. १ पक्ष्यांची झडप; झेंप; उडी. (क्रि० घालणें). २ (मनुष्य पोहतांना, साप सरपटतांना, कडेवरील मूल एखाद्या ओळखीच्या माणसाच्या पुढें केलें असतांना करतात ती) शरीराचा पुढील भाग थोडा उंचावून पुढें झोंकण्याची क्रिया; झेंप (क्रि० टाकणें; मारणें; घालणें; खाणें). ३ (चोर इ०कांचा) हल्ला; छापा. (क्रि० घालणें; पडणें). [सं. झंप=उडी, बुडी; बं. झाँप; तुल० इं. जंप्=उडी]

**झांप**—स्त्री. (मूर्च्छा, भूतबाधा, पित्त इ०मुळें डोळ्यांवर येणारी) गुंगी; झांपड; ग्लानि; तंद्री. [सं. स्वाप (झोंप)—स्वाप—झांप—झाप. —भाअ १८३४.]

**झां(झा)पड**—स्त्री. १ (पित्त, मूर्च्छा इ०मुळें डोळ्यावर येणारी) झांप; गुंगी; ग्लानि; तंद्री; झोंपेचा पगडा; डोळे मिटूं लागणें. (क्रि० पडणें; घालणें). निद्रेच्छा; सुस्ती. 'या स्वामीस लागलें वेड । सादर मृत्यूझापड । ' —नव १५.७४. २ ढगांची अंधारी, काळोखी; मळभ (क्रि० घालणें). ' मेघांनीं, पावसानें झांपड घातली. ' ३ तोंडावरून पांघरूण घेणें; वस्त्रानें तोंड झांकणें (क्रि० घालणें). ४ (ल.) भूल; मोह; भुरळ. 'यांस कालगतीमुळें झांपड पडली. '—भाव ४८. ५ (ना.) आटोका; तावड; धाप. ' लोक त्यांना फितविण्यास आले परंतु ते त्यांच्या झांपडींत आले नाहींत. '—सन १८५७.४०८. ६ (खा.) पहांट; उषःकाल; झांझरमांजर. ७ जनावरांच्या डोळ्यांना बांधतात ती ढांपणी. [झांपणें, झांकणें] ०देणें—(व.) १ एखाद्याच्या तोंडावरून हाताचा पंजा उलटा करून डोक्याकडून खालीं उतरणें. २ (ल.) फसविणें.

**झां(झा)पडी**—स्त्री. १ झांपड अर्थ १ पहा. ' बाण सुटले कडाडी । पडली डोळियां झांपडी । '—एरुस्व १०.१९. २ अंधारी; झांपड अर्थ ७ पहा. ' कां तेलियाचा ढोर पाही । डोळां झांपडी स्वदेहीं । ' —एभा २१.२३१. ३ तोंडावरून वस्त्र गुंडाळणें; घुंघट; बुरखा. ४ (व.) पावसाची झडप घरात येऊं नये म्हणून दारावर, खिडकीवर केलेली पत्र्याची, गवताची छपरी, झडप, झांजी. ५ (सामा.) झांपड पहा.

**झांपण**—न. झांपड अर्थ १ पहा. (क्रि० पडणें; घालणें). —न. १ झांकण; ढापण. २ झोपडीच्या दाराची झडपी; झांपा. [झांपणें]

**झांपणी**—स्त्री. १ अंधारी; झापड; झांपण. २ झांकण; ढांपण. [झांपणें]

**झांपणें**—उक्रि. झांकण घालून बंद करणें; झांकणें; झांकण ठेवणें. [झाप; हिं. झापना]

**झापणें**—उक्रि. (प्र.) झेंपणें पहा.

**झापर**—न. (ना.) झोपडीचें फाटक; झांपा. [झाप]

**झापरें**—न. (ना.) डोक्यावरील केंसाचें छप्पर; झिपऱ्या. —वि. केंसाळ. [झिपरी]

**झांपा**—पु. (कुंपण, झोंपडी, गोठा यांचा) तट्ट्या, कामट्या, गवत, झावळी इ०चा केलेला दरवाजा, फाटक; झांप. 'रोज चार वाघीर मारती, मुंडकें उडविती दरेक झांप्यास।'—गापो ५. [प्रा. झंप=झाकणें; गु. झांपो] म्ह० वैल गेला झांपा केला=वरातीमागून घोडे याप्रमाणें.

**झांपा(प)ळ**—न, १ झांकर; गर्द छाया; झाडाच्या फांद्यांचा निबिडपणा; दाट झाडी. २ ढगांची अंधेरी. (क्रि० येणें). दाट फांद्या असलेलें (झाड); गर्द; निबिड; घन; दाट. [झांप] **झांप(पा)ळणें**—अक्रि. १ (झाड) दाट फांद्यांनीं, पालवीनें युक्त होणें; गर्द, घनदाट होणें. २ (मेघ इ०नीं आकाश) दाटणें; व्यापणें; झाकोळणें; भरून येणें. [झांपाळ]

**झांपाळो**—वि. (गो.) झोंपणारा; झोंपाळु.

**झांपी**—स्त्री. झांपड. —शर

**झांव**—स्त्री. (खा.) घेरी; मूर्च्छा. —भात्रै ७.१-४.

**झाबड**—वि. (व.) अगदीं वृद्ध; म्हातारपणामुळें रोड झालेली; जख्खड (स्त्री). 'झाबड झाली आहे बाई, पण तिचे ढंग कायम आहेत.' [झांवड ?]

**झांवड**—स्त्री. १ हिसकावून घेणें. २ (ल.) लुबाडणें; लुटणें; लूट. [झोंवड]

**झांवड**—स्त्री. झांपड; अंधार; काळोख. (क्रि० पडणें). [झांपड] **झांव(वा)डणी**—स्त्री. हिसकावून घेणें; लूटमार; लुटालूट; नागवणूक. [झोंवडणें] **झांव(वा)डणें**—उक्रि. १ हिसकावून घेणें; हिसडणें; हिसकणें; जोरानें ओढणें. 'शिरींचा पाडोनियां मुगुट। दाहाही झांवाडिले कंठ।'—भारा, किष्किंधा १६.१३६. २ लुटणें; लुबाडणें; नागविणें; बुचाडणें. [झोंवडणें] **झांवडाझांवड**—स्त्री. १ जोराची हिसकाहिसक, ओढाताण, झोंवाझोंवी. २ लुटालूट. [झांवड द्वि.]

**झांबड**—वि. वेडौल; अतिशय मोठा; अवाढव्य.

**झावड-ड्या**—वि. गोंधळ्या; झांवऱ्या; भांब्या; अमिष्ट.

**झांवडणें**—अक्रि. (राजा.) (आजारीपणामुळें) सुस्त होणें; मंद होणें; मरगळणें.

**झांव(म)रा-ऱ्या**—वि. (राजा.) (वर्तनांत, दिसण्यांत) गोंधळ्या; विसराळु; अमिष्ट; गफलत्या; गबाळ्या; चुका करणारा. [झांवड]

**झांववला**—वि. अंधुक; अस्पष्ट; मंद. 'ना दिवस नव्हे सोज्वळ। जैसी झांववली सांजवेळ।'—एभा २५.२५१. [झांवड]

**झांवळ**—स्त्री. लूट; जाळपोळ. झांवड पहा

**झावळा**—पु. (कु.) दोऱ्यांची विणलेली पिशवी; जाळें. झारें पहा.

**झावळी**—स्त्री. १ (कों. हेट.) पकडलेले मासे ठेवण्याचें कोळी लोकांचें लहान जाळें. २ (हेट.) जाडया सुताची विणलेली जाळीदार पिशवी. (कु.) गवत ठेवण्यासाठीं बैलगाडीच्या खालीं असलेली जाळी.

**झावा-वूं**—पु. तेल ठेवण्याचा, ओतण्याचा चामड्याचा बुदला; तेलाचें कातडी भांडें. [हिं. झावा]

**झाबू**—वि. (प्र.) झावू; झाऊ. झाऊ पहा.

**झामड, झामडणें**—झांवड, झांवडणें इ० पहा.

**झामरा**—वि. केंसाळ; फार केंस असलेली कुत्र्याची जात; (ल. माणसासहि म्हणतात).

**झायाझुया**—स्त्रीअव. (ऊन्ह, ताप यांमुळें दिल्या जाणाऱ्या मोठ्या) धापा; सुस्कारे; श्वासोच्छ्वास. (क्रि० करणें; देणें; टाकणें; होणें). हायहुस्श. —क्रिवि. धापा टाकीत; लाहक्या, अहाळण्या देत. [प्रा. झाय=जळलेलें; दग्ध किंवा हाय ध्व.]

**झार**—स्त्री. (राजा.) तांदूळ इ० धान्याचे कुटल्यानंतर, दळल्यानंतर चाळणीनें चाळून राहिलेले अतिशय बारीक कण. [सं. क्षृ-क्षर् किंवा क्षर्; प्रा. झर]

**झार**—पु. १ रशिया प्रजासत्ताक होण्यापूर्वीच्या राजघराण्यांतील राजाची पदवी. २ (ल.) जुलमी राजा. [लॅ. सीझर; रशि. झरी] **०शाही**—स्त्री. १ झाराचा अंमल, राज्य. २ (ल.) झार बादशहाच्याप्रमाणें जुलमाचा व दडपशाहीचा अंमल. 'सरकारच्या झारशाही जुलमाचा निषेध केला आहे.'—के २७.५.३०.

**झार**—पुन. शेवाळासारखा नदींतून वाहून तीरास लागणारा एक बुळबुळीत पदार्थ. —शर.

**झार, झारं**—न. (कोळी) समुद्रांतील एक प्राणी. याच्या समुदायास आकृतीवरून पोर्तुगीज लोकांचें लढाऊ जहाज या नांवानें संबोधितात. (इं.) फिझेलिया. —प्राणिमो १४३. [देप्रा. झारुआ= क्षुद्रजंतु]

**झार**—वि. (तंतुवाद्याच्या तारेस झारा लाविला असतां होणाऱ्या आवाजाप्रमाणें) खणखणीत; उंच आवाजी; पहाडी. (कंठ, तंतुवाद्य इ०). [ध्व.]

झार—वि. (गो.) अतिशय कडू; कडू जहर. 'औषध कडू झार झालें आहे.' [जहर]

झारगें—न. (कों.) मळणी झाल्यानंतर प्रथम ज्या चाळ-णीनें धान्य चाळतात ती झाळण, चाळणी. [झारा]

झारगें—न. १ (झाडावरून फळें काढण्याची) जाळी लाव-लेली आंकडी; झेला. २ (सामा.) जाळें; पिशवी. ३ (कु.) नारळ वगैरे आणण्यासाठीं दोऱ्यांच्या जाळ्याची केलेली पिशवी; थैली. झावळा पहा. [सं. क्षृ–क्षर् किंवा क्षर्]

झारणें—उक्रि. १ (राजा.) (माती, पीठ इ०) चाळणें; गाळणें. २ सोनाराच्या शेगडींतील राख, माती इ० चाळून चांदी-सोनें काढणें. झारा, झारेकरी पहा. [सं. क्षृ–क्षर् किंवा क्षर्; प्रा. झर]

झारंवा—पु. १ (उंसाचा रस कढत असतांना त्यावरील किंवा तेलावरील) मळी काढण्याची अथवा छाटून काढण्याची परडी; झारें; टोपली. २ तेलांतील गाळ. –श्र. [झारणें]

झारय—स्त्री. (गो.) खेकडे धरण्याचा गळ. [झारा]

झारा, झारी–झाऱ्या, झारिया, झारेकरी—पु. १ सोनाराच्या दुकानांतील राख विकत घेऊन किंवा रस्ता इ०कांतील पडलेला केरकचरा इ० चाळून, गाळून तींतून सोन्याचे कण काढून त्याजवर चरितार्थ करणारी एक जात व तींतील व्यक्ति. 'मिरविति गुणज्ञ कनका काढी सूक्ष्मा जपोनि झारा ज्या।'–मोमंभा २.१. –दनाम ४४. 'धुळी माजील सोनें जैसें। भेसळलें न दिसे। तें निवडूं जाणे जैसें। झारियाचि पैं।'–विउ ४.५९. 'सरंजामदारांची झारे-कऱ्याप्रमाणें चौकशी सुरू झाली.' २ (ल.) कृपण; कद्रू. [झारणें]

झारा—पु. १ वीणा इ० तंतुवाद्याच्या घोडीजवळ तारेखालीं घातलेला कापूस, लोकरीची दशी; जिव्हाळी (ज्याच्या योगानें आवाज चढा होतो). २ तंतुवाद्यांतील खर्ज स्वराची पितळी तार. ३ झाऱ्याच्या योगानें निघणारा चांगला आवाज. या आवाजा-सारखा कंठांतून निघणारा आवाज. [ध्व. झार]

झारा—पु. १ दांडा असलेलें व एका टोकास सपाट, वाटोळें व सच्छिद्र असलेलें स्वयंपाकाचें पळीसारखें उपयोगी उपकरण. यानें तेल गळून कढईंतील तळलेले पदार्थ वर काढतां येतात. तंजावरकडे याला झारीची पळी म्हणतात. २ गाळण्याचें साधन; गाळणी. 'नीर बहुत ठाईं हिंडलें। झारा घातला मग निवळलें।'–दावि ७७८. ३ पाणी तापविण्याच्या बंबांतील विस्तव ठेवण्याची जाळी. [सं. क्षृ–क्षर् किंवा–क्षर्; प्रा. झर; फा. शिर]

झारी—पु. झारेकरी. 'कीं धुळींत हारपलें मुक्त। झारी निवडी सावचित्त।'–रावि ३१.४५. [झारणें]

झारी—स्त्री. १ लांब गळ्याचें, पाणी थंड राखण्याचें (विशे-षतः जस्ताचें) भांडें. २ तोटी असलेला गडू. 'निघे न झारींतुनि नीरबिंदु।'–वामन, वामनचरित्र १.२७. ३ झाडांस पाणी घाला-वयाचें जस्ताचें भांडें. याला एक लांब तोटी असून तिचें तोंड पसरट व सच्छिद्र असतें. ४ चहाची किटली. ५ तोटी. [सं. क्षृ–क्षर् किंवा क्षर्; प्रा. झर; सिं. झारी] ०चा अपकरा–पु. पाणी पिण्याचा तोटीचा अपकरा. गडू. ०ची पळी–स्त्री. (तंजा.) झारा.

झारें—न. झारंवा अर्थ १ पहा.

झारेकरी, झाऱ्या—झारा, झाऱ्या पहा.

झाल—स्त्री. १ डाली; वेळूचें केलेलें उथळ व पसरट शिपतर. २ या शिपतरांत कणकीचे दिवे, फळें (आणि मराठ्यांत) पुरण-पोळ्या, कच्चे पापड इ० पदार्थ ठेवून याची पूजा करून ती विवाहसमारंभांत वधू वरहीं जाण्याच्यापूर्वीं वराच्या आईस दान करितात, तो विधि. ऐरणीझालर पहा. 'चरव्या घागरी आणी झाली। हारे डेरे रत्नाचे।'–वेसीस्व १४.३९. [का. जल्ली= वाटोळी वेळूची टोपली (धान्य ठेवण्याची), दुरडी? झारगें, झालर पहा.]

झाल—स्त्री. १ (कु.) सुरमाडाच्या फळांचा व फुलांचा लोंबता घोंस. २ सुरमाडाच्या पानांचें केलेलें पायपुसणें. –पु. पुढील बैलांच्या शिंगाला बांधावयाचा केसांचा गोंडा. [प्रा. झुल्ल. म. झुलणें?]

झाल—स्त्री. १ एखाद्याच्या अंगावर लहान मुलानें टाकलेली झेंप, उडी, झांप. (क्रि० टाकणें). २ (गोट्यांच्या खेळांत) गोटी विशिष्ट मर्यादेच्या बाहेर पडणें, फेकणें. (क्रि० खाणें). ३ एखाद्या-वर रागानें धावून जाण्याची क्रिया. (क्रि० जाणें). ४ झोल; झोकांडी; चांचरी. (क्रि० जाणें). –वि. (प्र.) जहाल पहा. [झोल] ०जाणें–(कोणाएकावर) त्याला उद्देशून अमर्याद भाषण करणें.

झाल—स्त्री. (ना.व.) सायंकाळचा अंधार; झांजड. 'आम्ही बाजारांतून परत आलों तों चांगलीच झाल पडली होती, लांबून माणूस ओळखतां येईना.' [सं. जाल?]

झालणा—पु. (कों.) बांबूच्या कडयाला अडकविलेलें मासे धरावयाचें हातजाळें; हर्णैकडे झाला हातझाळणा असेंहि म्हण-तात व रत्नागिरीकडे हातविंड हें नांव आहे. [सं. जाल; म. झाल]

झालर—स्त्री. १ मंडप, छत, झगा इ० कांस शोभा आणण्या-साठीं लावावयाचा चुण्या घातलेल्या कापडाचा पट्टा; संजाप; मगजी; नक्षीदार कांठ. २ (नाट्य) राक्षसाच्या सोंगानें नेसाव-याचा लुगड्याचा–चुण्या पाडलेला–घागरा. ३ (नाट्य) पडद्याच्या वरच्या बाजूस लोंबणारा कापडाचा चित्रित पट्टा. उदा० महा-लाची, आकाशाची, जंगलाची झालर. [हिं. झालर]

झालर—स्त्री. १ गुऱ्हाळांतील मांदण किंवा नांद यावरील विळ्याचें केलेलें झांकण; चाळणी; उंसाचा रस गाळून घेण्याची विरळ विणीची टोपली. २ विवाहसमारंभांत वरातीच्या दिवशीं,

(गोपा मुतविण्याच्या वेळीं) जींत दिवे, रंगाचा तांब्या व बाळ-कृष्णाची मूर्ति ठेवून जी मानकऱ्याच्या डोक्यावर ठेवतात ती झाल. गोपा अर्थ ३ पहा. [झाल]

**झालर**—स्त्री. १ झांज; झांजरी; टाळ. 'मुहूर्तेविद झालर त्वरित वाजवी त्या क्षणीं।' —वीरेश्वरकविकृत सीताकल्याण ३०. २ मोठया आवाजाचें एक रणवाद्य. 'चौघडे व नगारे व ढोल व झालरी व तासे इत्यादि रणवाद्यें गांवांत कोणास वाजवूं देऊं नये, परंतु मंगलवाद्यें वाजविल्यास चिंता नाहीं.'—विष्णुबुवा ब्रह्मचारी-कृत-वेदोक्त धर्मप्रकाश पृ. ४३६–४५०. [सं. झल्लरी; हिं. झालरी]

**झाला**—पु. (वाद्य) सतारीच्या सर्व तारांवर (चिकाऱ्या मुद्दां) द्रुत गतीनें सारखे बोल काढणें; वीन किंवा सतार वाजवीत असतां कड-झीलीच्या तारेंत ताल धरणें.

**झालेपण**—न. जन्म; आयुष्य. 'विजेसिंग युद्धास आला म्हणोन नामोहरम व्हावें तरी झालेपणाचें सार्थक काय?' —भाव १०. [म. झाला=होणें याचा भूतकाल+पण]

**झा(झां)व**—स्त्री. (ना. व.) (उन्हाची) झळ, तिरीप. 'दुसऱ्या उदाहरणांत उन्हाची झाव, आसपासची घाण व अशक्तता ...' —न्यायप १३३. [सं. दह्; प्रा. झाप=जळणें, जाळणें; प्रा. झावण=दहन किंवा झाळ] ०काढणें-(व.) एखाद्याची खरडपट्टी काढणें. **झावेला**—वि. (व.) झळ लागल्यामुळें म्लान झालेला. [झाव]

**झा(झां)वळ**—वि. १ विसराळू; भ्रमिष्ट; भ्रांतिष्ट; अजागळ; झांवऱ्या. 'वुद्धि झावल जयाची। तो तें मानी।' —ग्रंथराज ६.६७. २ विसराळूपणाचें; भ्रमिष्टपणाचें; गबाळपणाचें (वर्तन, भाषण इ०). ३ अस्पष्ट; अंधुक; संदिग्ध. 'एऱ्हवीं संकल्पाचिये सांज-वेळे। नावेक तिमिरेजती वुद्धीचे डोळे। म्हणोनि अखंडित परि झांवळे। भूतभिन्न ऐसें देखे।' —ज्ञा ९.७२. [सं. श्यामल?] **झावळणें**—अक्रि. भ्रमिष्ट होणें. —शर. ०झावळ-मावळ-वावळ—नस्त्री. झुंजुमुंजु झांजड, झांजडमांजड सर्व अर्थी पहा. —क्रिवि. अंधुकपणें.

**झावळी**—स्त्री. (को.) ताडामाडाचा, पोफळाचा, सुरमाडाचा झांप, फांदी (विणलेली किंवा साधी). सामान्यतः झावळी असा शब्द आहे पण मुंबईच्या आसपास झावळी हा शब्द वापरतात. ''सरळ सोट सुःमाड येकावर येक जिवट झावळी।' —प्रला १५४. [सं. छाया+वली]

**झा(झां)वळी-ळें**—स्त्रीन. झांजड; अंधार; अस्पष्ट उजेड. 'चांदणियाचें झांवळें। देखणें जैसें।' —भाए २९९. [सं. श्यामल?]

**झावाड**—न. खडकांवर आपटणारी पाण्याची लाट. (क्रि० उसळणें; उठणें; पडणें).

**झावू**—वि. क्षुल्लक; किरकोळ. झाऊ पहा.

**झांस**—पु. (महानु.) दाट झाडी. 'अनर्थांचे आसुर। जेथ झांस दुर्धर। अतिस्नेहाचे पाझर। उन्हाळें देति।' —ज्ञाप्र २७८. [टीप-ग्रंथातील अर्थ बरोबर नसावा. सं. झष; प्रा. झस=मासा हा अर्थ नीट लागतो]

**झांसा**—पु. १ (दुसऱ्याला लुबाडण्याची, इजा किंवा दुःख देण्याची, वाईट करण्याची) धमकावणी; दहशत; दपटशा; धाक; भीति (त्रागा याच्या उलट अर्थी); अमुक गोष्ट न केल्यास पुढें तुझें अमुक तऱ्हेनें वाईट करीन अशी (एखाद्यास) सूचना; धम-कावणी. 'मनाचा बलात्कार कैसा। निर्गुणी पाडी गुणाचा फांसा। लावूनि जीवपणाचा झांसा। संसारवळसा आवर्ती।' —एमा २३. ६१७. २ लुटालूट; गुंडगिरी; उचलेगिरी. '... झांसा करण्यास कोणी माणूस निघेल आणि त्यामुळें बंड, फितुर होईल तर माजि-स्ट्रेटानें सदर अदालतीची आज्ञा घेऊन ...' —न्यासे १००. [सं. झष्=मारणें, इजा करणें; हिं. झासा=दगा; धोका; गु. झासो=राग, त्रागा]

**झांसा**—पु. तळमळ. 'लाविसी हरि किती मज झांसा।' —सारुह ४.११७. [सं. ध्यास]

**झांसुरणें**—अक्रि. मनांत झुरणें; तळमळणें. 'तैंहि ब्राह्मणु नेवों सरे। कीं हाणिचेनि शिणें झांसुरे।' —ज्ञा १७.२९२. [झांसा]

**झांसुरणें**—अक्रि. आळसानें स्वस्थ पडून असणें; निश्चेष्ट पडणें. 'उचितानुचित आघवें। झांसुरतां नाठवे जीवें।' —ज्ञा १४. १८४. [झांसा]

**झाळ**—स्त्री. (उन्हाची) झळ; तिरीप; झळई. 'झाळेंकरोनि म्लानलें मुख।' —दावि १५७. [सं. ज्वाल, झला]

**झॉळणॉ**—पु. (गो.) पाळण्याचें कापडी छप्पर. [झोळणा]

**झाळणी**—स्त्री. १ झाळण्याची, डांक लावण्याची क्रिया; डांक लावून घट्ट बसविणें. २ झाळलेली, डांक लावलेली अवस्था. [झाळणें]

**झाळणें**—सक्रि. (धातूंचीं भांडीं इ० कांस) कस्तर, डांक लावून अग्निसंयोगानें सांधणें, जोडणें. [सं. ज्वल्? हिं. झालना; गु. झाळवुं]

**झि(झि)कणें**—सक्रि. (राजा.) वरचेवर झेलणें, पकडणें, धरणें. **झिकणार**—वि. (गो.) झेलणारा. [जिंकणें?]

**झिक(ग)झिक(ग)**—स्त्री. जिगजिग पहा.

**झिकझिकणें, झिकझि(मि)की, झिकझिकीत**—झिग मध्यें पहा.

**झिकलेस**—स्त्री. (भरतकाम) जरतारीचे बंद; जिगची लेस. झीक पहा. [झिक=जिग+इं. लेस=फीत]

**झिकवण-वणी**—स्त्री. फसवणी; झकवण-वणी पहा. (क्रि० करणें; लावणें; मांडणें).

**झिकविणें**—उक्रि. चकविणें; फसविणें; ठकविणें. झकवणें अर्थ २ पहा.

**झिकापुरी कांठ**—पु. (नाशिक) जरीच्या कांठांची एक जात.

**झिगचें**—अक्रि. (गो.) खुरटणें; खंगणें; रोडावत जाणें; झुरणें.

**झिगझिग**—स्त्री. १ जिगजिग; पायधरणी; मिनतवारी; त्रासदायक विनवणी. २ किरकीर; पिरपिर; कटकट; तकार. ३ पावसाची बुरबुर. ४ (हालचालींतील, कार्यातील) मंदपणा; सुस्ताई; ढिलाई; दिरंगाई. (क्रि० करणें; लावणें; मांडणें; चालविणें). —वि. त्रस्त; त्रासलेला; वेजार (अविरत श्रमानें). [जिगजिग]

**झिगझिग-झिगी**—स्त्री. चमक; लुकलुकी; चकाकी; झकाकी; तेज; झगझगी. 'राहेल कसी कौस्तुभमणिपाशीं माणिकांत झिगझिग जी।' —मोभीष्म ६.३५. [ध्व; झिग द्वि.] **झिगझिगणें**—अक्रि. चकाकणें; लुकलुकणें; चमकणें. [झिगझिग] **झिगझिगीत**—झगझगीत; चमकणारें; लुकलुकणारें; चकाकणारें. [झिगझिग]

**झिंगट**—न. झिंगा नांवाचा लहान मासा; चिंगाटी; कोळंबें. [सं. चिंगट; हिं. झिंगा]

**झिंगट**—वि. दारुड्या; निशाखोर; अंमली; दारू पिऊन झिंगणारा; [झिंगणें]

**झिंगडी**—पु. (गो.) चावटपणा.

**झिंगणें**—अक्रि. (दारू, अफू इ० मादक पदार्थांच्या सेवनानें) धुंद होणें; गुंगणें; बेशुद्ध होणें; गुंगून पडणें; कैफांत, तारेंत येणें. [?] **झिंगत चालणें**—(मद्यप्राशन इ० मुळें) झोंकांड्या खात जाणें. **झिंगा, झिंग्या, झिंगीखोर**—वि. दारुड्या. झिंगट पहा. [झिंगणें]

**झिंगनी मात**—पु. (को.) एक प्रकारचा गोड व पौष्टिक चारा; गवत. 'वरच्या रानचा झिंगनी मात।' —मसाप ४.४.२६४. [झिंगनी+मात=चारा]

**झिंगरडू**—न. शेतांत आढळणारा एक लहान कीटक. [देप्रा. झिंगिरड]

**झिंगरू**—न. (तिरस्कारानें, प्रेमानें) झिंगा नांवाचा लहान मासा. [सं. चिंगट; हिं झिंगा; देप्रा. झिंगिर]

**झिंगा**—पु. लहान मासा. 'जळीं राघव माधास अडविलें असंख्य झिंग्यांनीं।, —ऐपो ४०३. [सं. चिंगट; हिं. झींगा]

**झिंगा**—पु. (राग इ० मनोविकारांचा) झटका; लहर; आवेग; झपाटा. (क्रि० येणें). [झिंगणें]

**झिंगा**—पु. गारुडी, जादुगार, तमासगीर इ० लोकांच्या विशेष उपयोगांतील अश्लील अर्थाचा एक शब्द.

**झिंगाटो**—पु. (गो.) एक प्रकारचें राक्षसाचें सोंग. [पोर्तु. झिंगात=राक्षस]

**झिंगी**—स्त्री. (नाविक. कों.) पडणास खालच्या अंगास आधार म्हणून जोडतात तीं लांकडें.

**झिंगी**—स्त्री. जिल्हई; चकाकी; झिगझिगी पहा. —राको २४७.

**झिंगी**—स्त्री. १ अंमल; धुंदी; माज; गुंगी. २ (ल.) (संपत्ति इ० कांच्या योगानें येणारा) ताठा; धुंदी; माजोरेपणा; मस्ती. ३ मादक द्रव्य; दारू; मद्य. [झिंगणें] ०खाणें—दारू पिणें. ०खोर—वि. दारुड्या; झिंग्या.

**झिंगी, झिंजी, झिंज्ी, झिंझोटी**—स्त्री. तोंडावरून अस्ताव्यस्तपणें लोंबणारी केसांची बट; झिपरी. (नेहमीं अनेकवचनी प्रयोग. उदा० झिंग्या, झिंज्या). [सं. झिंटी=झुडूप]

**झिंगुर्डें**—न. (व.) १ बारीक बारीक कांटेरी बोंडें येणारें एक जंगली झाड. २ वांडगूळ.

**झिजणें**—अक्रि. १ घर्षण इ० कांच्या योगानें क्षय पावणें, कमी होणें; झरणें. 'मना चंदनाचे परी त्वां झिजावें।' —राम ८. २ (शरीर इ०) रोडावत जाणें; कृश, क्षीण होणें. ३ (ल.) कष्ट घेणें, करणें; उपयोगी पडणें. 'झिजल्यावाचुनी कीर्ति कैंची। मान्यता नव्हे कीं फुकाची।' —दा १९.३.२४. [सं. क्षि-क्षयति; प्रा. झिज्जइ; हिं. झीक(ख)ना] **झिजणावळ**—स्त्री. (एखाद्या वस्तूच्या आकारमानांतील) घर्षण इ० कांच्या योगानें झालेला कमीपणा; झीज; झिजणी. [झिजणें] **झिजणी**—स्त्री. १ झिजण्याची, कमी कमी होत जाण्याची क्रिया; रोडावणें; क्षीण होणें. २ क्षयरोग; झिरफणी. **झिजविणें**—सक्रि. १ झिजण्यास लावणें; घर्षण इ० कानें कमी करणें. २ घसवटून जाणें; घस, झीज सोसणें; झरविणें; कावविणें. म्ह० आपणास झिजवावें तेव्हां दुसऱ्यास रिझवावें=स्वतः शारीरिक, सांपत्तिक झीज सोसल्यावांचून दुसऱ्यास खुष करतां येणार नाहीं. [झिजणें]

**झिजाड(ट)णें, झिंझाडणें**—उक्रि. १ (एखाद्यास) केंस धरून खालीं पाडणें;' झिंजी धरून वांकविणें. २ झिडकारणें. 'थोरपणासि पाडिलें। वैभवासि लिथाडिलें। महत्त्वासि झिंजाडिलें। विरक्तिवळें।' —दा ५.९.३८. ३ झुगारणें; झाडणें (हात, पाय इ०). 'सोडवूनि मगरमिठी। झिंजाडोनि लोटिला।' —सुसमा ७.२५. —आसी ४५. ४ (ल.) झिडकावणें; तिटकारणें; हुर्यो, छीःथू करणें; झिटकारणें. [झिंजा]

**झिजार(ड)णें**—अक्रि. १ (बंदूक उडतांना, काठी मारतांना) प्रत्याघात होणें; झटका देणें; उसळी खाणें. २ झटका बसणें; प्रत्याघातानें (हात इ०) व्यथित होणें. [ध्व.?] **झिजारा-डा**—पु. १ (बंदूक, तोफ इ० उडतांना किंवा काठीनें मारतांना होणारा) प्रत्याघात, धक्का, झटका; उलट खाणें. (क्रि० होणें; येणें). २ वरील धक्क्यानें (हात इ० कांवर) होणारा परिणाम, वेदना. (क्रि० वसणें).

**झिंजी**—स्त्री. झिंगी पहा. केसांची बट. 'झिंजा धरूनि पाडिती।' –पांप्र १६.१८९.

**झिंजो(झो)टी, झिंझूटी**—स्त्री. (संगीत) एक राग. ह्या रागांत षड्ज, तीव्र ऋषभ, तीव्र गांधार, कोमल मध्यम, पंचम, तीव्र धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. जाति संपूर्ण–संपूर्ण वादी गांधार, संवादी निषाद. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर. हा सार्वकालिकहि मानतात.

**झिंज्या**—पु. एक प्रकारचा मुलांचा खेळ. 'वाघोडी आणि आट्यापाट्या। झिंज्या बोकट अगलगोट्या। मोंवरे चक्रें फेरवाट्या। वेती काठ्या सत्वर।' –भवि २७.२०.

**झिंज्या**—स्त्रीअव. केसांची झिंजी; झिंझोटी; झिंगी पहा.

**झिंज्या(ंझ्या)वात**—पु. झंझावात पहा. [सं. झंझावात]

**झिट**—न. झाडाची फांदी. फरगाडी. –कृषि ५५५. झीट अर्थ १ पहा. [सं. झिंटी=झुडप]

**झिटकार(व)णें**—सक्रि. धिक्कारणें; तिरस्कारानें उडवून देणें; धुडकावणें; तिटकारा दाखवून नाकारणें; झिडकारणें पहा. [झटकारा]

**झिटिमिटि**—क्रिवि. १ थेंबाथेंबांनीं (दुध मांड्यात पडणें, पाणी इ० ठिपकणें, गळणें). २ कणाकणांनीं; थोडा थोडा; थोडथोडका; तीळतीळ (नफा इ० मिळणें). ३ क्वचित् क्वचित्; कुठें कुठें; तुरळक (पाऊस पडणें, पिकें इ० पिकणें). [ध्व. झिट् द्वि.]

**झिटी**—स्त्री. झिंजी; झिपरी; झिंगी पहा. [सं. झिंटी=झुडप]

**झिडकझिडकुं**—क्रिवि. झरारा; भरारा. 'झिडकझिडकुं धांवे वारा।' –दा २०.८.२५. [झटक]

**झिडकणें, झिडकारणें, झिडकाविणें**—उक्रि. धुतकारणें; धुडकावणें; कठोर भाषणानें धिक्कार करणें; झटकारणें; झिटकारणें. 'तिजलागीं पोटासि धरिता होये। तों ती तयातें झिडकावीत।' –जै ७७.१७. 'चांडाळा निघ बाहेरी झिडकिला मार्जारवेषें दडे।' –कीर्तन १.८२. [झटक, झिडका; हिं. झिडकना]

**झिडका**—पु. १ (हात, पाय, वस्त्र इ० कांचा) झटका; हिसका; झटकारा; हिसडा. २ इतर अर्थी झटका पहा. (क्रि० मारणें; देणें) [झिडकणें] **झिडकार-कारणी**—पुस्त्री. धिक्कार; हेटाळणी; हेडसावणी; धुडकावणी. [झिडकारणें]

**झिडपुंचें**—सक्रि. (गो.) झिडकारणें.

**झिडवा**—पु. (गु.) १ एकास एक चिकटलेलें अशा जोड केळ्यांचें लोंगर. –कृषि ४९०. २ (गु.) अफूचा दोडा, बोंड. –कृषि ४९८.

**झिणकार**—पु. १ (वाद्यें इ० कांचा) झंकार; झनत्कार २ (कठिण वस्तूवर आघात केल्यानें हात इ० कांस येणारी) झणकी, झणझणी. ३ झिडकार पहा. [ध्व. झिण]

**झिणझिणणें**—उक्रि. १ झणाणणें; झणझण असा आवाज करणें; झनत्कार करणें. २ झणझणणें हा शब्द इतर अर्थीहि उपयोगांत आणतात (हा शब्द हलका आवाज आणि ल्हानशी वेदना कल्पना दर्शवितो). [ध्व. झिण द्वि.]

**झिणा**—वि. झिजलेला; घासलेला (दागिना, भांडें इ०). [सं. क्षीण; प्रा. झीण; सिं. झिणो]

**झिण्यां**—स्त्रीअव. पूर्णपणें न पोसलेले, पोंचट असे धान्याचे दाणे; हा शब्द एकवचनी (झिणी असा) क्वचितच आढळतो. [झिणा]

**झितरी**—स्त्री. (ओतकाम) ओतलेली मूर्ति साफसूफ करतांना होणारी घस.

**झित्तर**—न. (व.) शिंदीचें मोडलेलें टोपलें, शिपतर.

**झिंद**—पु. मेलेल्या मुसलमानाचें पिशाच्च; जिंद पहा. 'तुमच्या घरांत झिंद गेलें.' –धर्माजी ८३. [जिंद]

**झिनॉ**—पु. (गो.) एक प्रकारचें झाड.

**झिनी**—स्त्री. (महानु.) ठिणगी. 'तया प्रकाशाची झिनी। ते स्वर्गी शशी तरणी।' –ज्ञाप्र ४९०. [ध्व. झिन्]

**झिप्र**—क्रिवि. जलद; भरधांव? 'दावितां खंडवेगु। वैसें राउतैवें आंगु। मुरडतां क्षिप्र वेगु। डोळां सुजावती ना।' –शिशु १४२१. [ध्व.]

**झिप**—वि. (नवीन बनावट शब्द) गळलेली; खालीं पडलेली; झिम पहा. 'पहा फुलांची पखरण झिपू। माझे गडेग। टिपू फुलें टिपूं।' –केक ७७. –स्त्री. सडा. [सं. क्षिप्=टाकणें?]

**झिपटी**—स्त्री. केसांची बट; झिंजी. झिपरी अर्थ १ पहा.

**झि(झिं)परी**—स्त्री. १ झिंजी व झिपटी पहा. 'माथां पिंगट झिपऱ्या, मुखबिळीं विक्राळ दंतावळी।' –आपू ४२. २ (ल.) अजागळ, गबाळ, गोबरी पण व्यभिचारी स्त्री; माभळभटीण; नेभळभटीण स्त्री. म्ह० चटोपटीचे बोभाटे झिपरी मारी झपाटे=छानछोकीनें राहणारी स्त्री व्यभिचारी नसतांहि तिच्या संबंधीं लोक बोभाटा करतात. परंतु एखादी माभळभटीण व्यभिचारणी असूनहि समाजाचें तिकडे लक्ष्य जात नाहीं. ०धरणें–केंस ओढणें; अवहेलना करणें; प्रत्यक्ष शिक्षा करण्यास उद्युक्त होणें. 'नेणो केव्हां धरूनि झिपरी देव घेईल झाडे।' –आठल्ये

**झि(झिं)परा-ऱ्या**—वि. ज्याचे केस लांब असून फिंदारलेले आहेत असा. 'सर्कशींत काम करणाऱ्या झिपऱ्या पोरीसारखी उडी मारून...' –नाकु ३.१२. [झिपरी] **झिपा-झिपापाणी खेळ**–पु. एक प्रकारचा मुलींचा खेळ; यांत दोन्ही पक्षांकडील गडी एकमेकांवर पाणी फेंकतात. 'झिंपा गे झिंपा रामचरण झिंपा। विषयाचे गोडी वायां नको करूं खेपा।' –ब ५९२. [ध्व. झिप्; सं. क्षिप्=झिंपणें. झिंपणें]

**झिपुटा**—पु. झोक्याची, पाळण्याची, झोळीची ( झोके देण्याची ) दोरी; शेपटा. [ सं. शेप ]

**झिपोरडी**—स्त्री. (व.) झिपोटी. झिपरी, झिपटी पहा.

**झिप्पट**—न. ( कुंपणाचें, झोंपडीचें ) झांप, झडप, झोंपा.

**झिंबड–डी**—स्त्री. १ पावसाची जोराची झड. (क्रि० वसणें). २ (ल. मेजवानींतील, गाण्याच्या मजलसींतील, खेळांतील चंगळ; सामुग्रीची विपुलता; बहार–रंग. ३ ( कामाचा, धंद्याचा ) रगाडा; झोड. ४ (माणसांची ) अतोनात गर्दी; झुंबड; झोड; दाटी. ‘ गिऱ्हाइकांची काय झिंबड पडली हो ! ’ [ ध्व. झिम ]

**झिबली**—स्त्री. (ना.) मिठाईची टोपली. [ फा. झंबील= टोपली ? ]

**झिबा, झिबें**—पु.न. पायघोळ अंगरखा. झुबा व झबा पहा.

**झिंबा**—पु. झिम्मा पहा.

**झिबी**—स्त्री. (कुण.) मुलींच्या वेणींतील रेशमी गोंडा.

**झिम**—क्रिवि. एकसारखा व जोरानें; मुसळधार (पाऊस पडणें) [ध्व. झिम ]. ०झिम–स्त्री. वारीक पण टिकाऊ पाऊस; भुरभुर ०झिम–झिमां–क्रिवि. वारीक पण एकसारखा (पाऊस पडणें). झिमझिम पावसाच्या शब्दाचें अनुकरण. [ ध्व. झिम् द्वि. ]

**झिमटा**—वि. (वे.) कंजूप; कृपण; हिमटा. [ ध्व. झिम ]

**झिम(म्म)ड–डी, झिमर**—स्त्री. झिंबड ३ पहा. ‘ दररोज रात्रीं, दिवसां स्वामींच्या भोंवती ज्ञानेच्छु मंडळीची सारखी झिम्मड.’ —नि ३४१. [ झुंबड ]

**झिमन्या गाळणें**—सक्रि. (व.) दुःख, शोक करीत वसणें.

**झिमुट**—वि. वारीक. झिमटा पहा. —विवि ८.३.४१.

**झिमोटा**—पु.(रागानें, तिरस्कारानें)कपाळास आठ्या घालणें, नाक, तोंड मुरडणें, फेंदारणें; भ्रुकुटीभंग. ( क्रि० मारणें, घालणें )

**झिम्मा**—पु. मुलींचा एक खेळ. यांत मुली एकमेकींकडे तोंडें करून उभ्या राहून परस्परांच्या हातांच्या पंजावर पंजे मारून थोडेसें मागें जाऊन पुन्हां पुढें येऊन, परस्परांच्या हाताच्या पंजावर पंजे मारतात. [ ध्व. झिम ] (एखाद्या घरीं भुतांनीं) **झिम्मा खेळणें**–भुतें नाचणें; भुतांनीं घरांत खेळ करणें, धिंगाणा मांडणें.

**झियाफत**—स्त्री. मेजवानी. जाफत, जियाफत, ज्याफत इ० पहा. [ अर. झियाफत् ]

**झिरकणी**—स्त्री. ( चिकट दुखण्यामुळें, जिवलग माणसाच्या विरहामुळें लागलेली ) झुरणी; झिजणी. झिरपणी पहा. [ झिरकणें ]

**झिरकणें**—अक्रि. रोडावणें; खंगणें; झिजणें; झुरणें; क्षय होणें. [ झिरपणें; सं. क्षृ–क्षर्=झरणें ]

**झिरकुंचें**—अक्रि. ( गो. ) झेलला जाणें.
धको. ३. ५६

**झिरकोगल्ल**—न. (गो.) वराच वांक आलेलें काकडी, दोडका यासारखें फळ.

**झिरंग**—पु. कडीनिंबाचें झाड. —स्त्री. (वे.) एक प्रकारचें गवत.

**झिरझिर–झिरी**—क्रिवि. झुरझुर; थेंबथेंब ( पाऊस पडणें ) [ झिरणें ]

**झिरझिरा झिरझिरीत**—वि. १ जीर्ण झालेलें; विरविरीत झालेलें; फाटलेलें ( वस्त्र ). २ पातळ; विरळ विणीचें (कापड इ०). [ सं. ज्नृ (जुने होणें)–जीर्यति; हिं. झिरझिरा ]

**झिरणें, झिरणीस लागणें–पडणें–येणें**—अक्रि. झिजणें; झुरणें; कृश होत जाणें; झुरणीस लागणें. [ सं. ज्नृ ]

**झिरपणें**—अक्रि. १ पाझरणें; गळणें; झरणें; स्रवणें ( भांड्यांतून, खडकांतून, झऱ्यांतून पाणी इ० ). २ झुरणें; झिजणें; खंगणें; थकणें. [ सं. क्षृ–क्षरण किंवा क्षरण; प्रा. झरण ] **झिरपण–पणी**—स्त्री. १ पाझर; गळती; झरण्याची क्रिया. २ झुरणी; झिजणी. ( क्रि० घेणें ). —**णीस लागणें–पडणें–येणें**–अक्रि. झुरणीस लागणें; खंगणें; झिजणीस पडणें; कृश होत जाणें.

**झिरपा**—पु. १ स्राव; पाझर; गळती (एखाद्या फुटक्या भांड्याला असलेली, भांड्यांतून होणारी). २ ओहळ; ओघळ; झरा. ‘ ठिकठिकाणीं सतत वहाणारे झरे व झिरपे असून...’—खेया ८. [ झिरपणें ]

**झिरबुटी**—पु. हलवार जमीनींतील भात. —बदलापूर २८३.

**झिरम(मि)ळी**—स्त्री. झिलमिळी पहा.

**झिरमिर, झिरिमिरि**—क्रिवि. थोडाथोडा; झुरझुर (पाऊस पडणें). ‘ मग झिरमिर वर्षावो निर्मिला। ’ —दावि ६६. [ध्व.; झिर द्वि. ]

**झिरमिरी**—स्त्री. मूर्च्छा; घेरी; झीट.—शर. [ध्व. झिरूर् द्वि. ]

**झिरमुळॉ**—पु. (गो.) एक प्रकारचा कंद.

**झिरमोळी**—स्त्री. (फुलमाळ्याचा धंदा) हाराच्या मध्यावर सोडलेले पदर. झिलमिळी पहा.

**झिरवणी**—न. झऱ्याचें पाणी; झरा. [ झिरा+पाणी ]

**झिरा**—पु. १ झरा; ओहळ. २ (ल.) उगम; उत्पत्तिस्थान;. ‘ त्याची नोकरी म्हणजे पैशाचा झिरा. ’ [ सं. क्षृ–क्षर् किंवा क्षर्; प्रा. झर ]

**झिरमिरु**—वि. झुरूमुरू. १ सरासरी जीव मात्र धरून राहिलेला; अत्यंत अशक्त ( मनुष्य ); कसा तरी धुगधुगी धरून असलेला ( आजारी मनुष्य ). २ खंगलेल्या, खालावलेल्या स्थितींत असलेलें ( झाड, पीक इ० ). —क्रिवि. बारीकबारीक; दुरळक दुरळक, थोडथोडा; किंचित ( पाऊस, ऊन पडणें ). [झिरणें+मरणें] ०करणें–१ मरूंमरूं करणें; जिवंतपणाची किंचित धुगधुगी असणें;

(मरणसमयीं) जीवज्योति किलकिलणें. २ आजारी असणें; अतिशय दुबळें, अशक्त होणें.

**झिरें**—न. १ (कों.) (कुंपणाकरितां) झाडाची तोडलेली फांदी. काटकी; झांकर. २ (दादर) बांबूचा बारीक शेंडा.

**झिर्पिटावचें**—सक्रि. (गो.) झिडकारणें.

**झिल**—स्त्री. (व.) बैलाच्या गळ्यांतील लहान घुंगरांची माळ. झील पहा.

**झिल, झिलगा**—पु. (कों. राजा. गो. बे.) मुलगा; झील पहा. 'परवांचे दिवशीं झिलगे मोंवडीवर गेले व आज परत आले.' —सह्याद्री ११८. [स. झला=मुलगी; हिब्र्यू. गल्लद=मुलगी]

**झिलई, झिल(व्ह)ई, झिला(ल्हा)ई, झिली, झील**—स्त्री. तकाकी; चकाकी. जिल्हई पहा. **झिलीची-झिल्हईची-झिलेची माती, झिल्हई, झिल्लीं**—स्त्री. भांडीं, हत्यारें साफ करण्याकरितां वापरतात ती पिवळसर तांबडी माती.

**झिलपी**—स्त्री. (व. खा.) ढलपी; धलपी.

**झिलमट**—न. जळमट पहा. कोळिष्टक. 'कानाकोंपऱ्यांत कोठें जाळीं झिलमटें आहेत कां काय पाहून ...' —सुदे ३३.

**झिला-ल्या**—पु. एक प्रकारचा नाग. 'मयोर मंडुक झिल्यादि नाग।' —दावि ३५२.

**झिलाण**—न. १ पाणथळ जागा; दलदल; ओलवट जमीन. २ (जमीन इ० कांचा पाण्याच्या झऱ्याचा निदर्शक असा) ओलावा; ओलासरा; आर्द्रता; ओल. ३ जमिनीच्या पोटांतील झरा. झील पहा. [सं. क्षीर=पाणी. हिं. झील=सरोवर]

**झिलीं**—क्रिवि. हळू. —शर. (केशव. पद ५३८).

**झिलक़ाद**—पु. अरबी अकरावा महिना. जिल्काद पहा. [अर. झील्क+अदा]

**झिल्लट**—वि. १ विरविरीत; झिरझिरीत (कापड). २ पातळ; अतिशय बारीक (कागद, मनुष्य इ०). ३ (ल.) क्षुद्र; किरकोळ; घाणेरडा (मनुष्य; जिन्नस). [हिं. झिल्ली]

**झिल्ली**—स्त्री. रातकिडा; राळ; मुरकुट. 'ज्या वनीं करिति किंकृत झिल्ली।' —आग्र ५. [सं.]

**झिल्ली**—स्त्री. (मांसाहारांत) (जनावराच्या) मेंदूवरचा पापुद्रा. 'प्रथम झिल्लीसह तीन मेंदू वाफल्यावर त्यांवरची झिल्ली काढून टाकावी.' —गृशि २.८५. [हिं.; सं. छाल]

**झिल्लीम**—स्त्रीन. १ शिरस्त्राण. २ (विशेषतः) मुखवटा (शिरस्त्राणाचा). [हिं. झिल्म=चिलखत]

**झिळमिटा-मिट्यार**—पु. (गो.) झुंजुमुंजु; झांजड; झांजरमांजर. झिळमिळणें पहा.

**झिळमिळ-मिळां**—क्रिवि. झळंवत; झोलावत; हेलकावे खात; लोंबकळत. (क्रि० लोंबणें; लटकणें; हालणें).

**झिळमिळणें**—अक्रि. (महानु.) लिकलिकणें; मिणमिणणें; मंदमंद प्रकाशणें. 'जीवज्योति झिळमिळीं हृदयांत.' —भाए ७४. [सं. ज्वल्; झला=ज्योत. हिं. झिलमिला=हलणारी ज्योत]

**झिळमिळी**—स्त्री. १ नथ, हार इ० दागिन्यांस शोभेसाठीं लावलेलें लोंबणारें मोतीं, लोलक इ०. 'पायीं पैंजण सांकळ्या। नक्षिदार चरणांगुळ्या। लावून वर्तें झिळमिळ्या।' —होला ८०. २ कांचेच्या झुंबराला लावलेला लोलक. ३ (पगडी इ० कास) शोभेसाठीं लावलेला कलाबतूचा झुमका, पदरांचे दोरे, दशा, आंचळ्या. 'वरतीं टांगण्याकरितां कमानीचा घाट काढून खालीं झिळमिळ्या काढाव्या.' —रंगवल्लिका १.१६. ४ शोभेसाठीं लावलेल्या (कागद, झालर इ० कांच्या) चिरफळ्या. ५ जुनाट छपराला लोंबणारें कोळिष्टक; जळमट. ६ (ल.) लिकलिकी; मंदमंद प्रकाश; मिणमिण. 'निवरी काष्ठ सारखी। झिळिमिळी करी।' —शिपु २.२२.४२. [सं. झला=ज्योत. देप्रा. झिल्ली=लहरी, तरंग; हिं. झिलमिला=हलणारी ज्योत, एक प्रकारचा बारीक मऊ कपडा]

**झिळें**—न. (कों.) मासे धरण्याचें जाळें.

**झीक-ग**—पु. जरतार; कलाबतू.

**झीग**—स्त्री. सुळक्याचा टेका.

**झीज**—स्त्री. १ (दागिने, भांडीं इ० कांची) वापरण्यानें, घर्षणानें होणारी घस; कांहीं अंश कमी होणें; वजनांत उणेपणा. २ (ल.) शारीरिक कष्ट. ३ (व्यापार, व्यवहार इ० कांतील) घस; नुकसान; बूड. (क्रि० खाणें; बसणें; येणें). 'त्याच्या करितां मी बरीच तनमनधनानें झीज सोसली.' —टिसु ३. ४ (सामा.) क्षय; नाश. [झिजणें]

**झां(झी)ट**—स्त्री. १ (म्हातारपण इ० मुळें चालतांना जाणारी) झोकांडी; झोक; झोल. २ घेरी; मूर्च्छा; अंधेरी; मोंवळ. (क्रि० येणें). —न. १ काटक्या, ढलप्या, फांद्या, उपटलेलीं वाळकीं रोपें यांचा भारा. हीं जमीन भाजण्यास उपयोगी असतात. २ (नाविक. हेट.) दोरीला अडकवून ठेवण्याचें लांकूड. ३ (अशिष्ट) झेंगट; लचांड; अडथळा; पेंच; संकट; त्रास; दशा. पुढील शब्द पहा.

**झी(झीं)ट, झीड, झीण**—नस्त्री. (कों.) १ जीर्ण व खराटलेलें, वठलेलें झाड, वनस्पति. २ असल्या झाडाचें खोड, बुंधा, सोट. ३ असल्या वृक्षाची एखादुसरी उरलेली फांदी. ४ (ल.) जर्जर झालेला, खंगलेला खप्पड, म्हातारा मनुष्य. ५ (ल.) (साथ इ० कांत कुटुंबांतील बाकीचीं माणसें मेल्यामुळें) शिल्लक राहिलेला एकटाच पुरुष, वंशांकुर. ६ (ल.) अतिशय खंगलेला, गरीब, मरतुकडा माणूस, दुष्काळी माणूस. 'हें मूल वाढून झीट झालें.' [झड; सं. क्षीण; प्रा. झीण]

**झीटपीट**—स्त्री. (प्र.) झटापट; चकमक. 'शैसियास त्याची याची झीटपीट झाली.' —पेद३.१२६.

**झीण**—स्त्री. (चंदनाचें खोड, गंधाचा खा, हळकुंड इ० कांचें उगाळून उगाळून शिल्लक राहिलेलें ) थोटूक; खोड; ( एखाद्या पदार्थाचा ) घासून घासून अवशिष्ट राहिलेला भाग. [ सं. क्षीण; प्रा. झीण; हिं. झीन; गु. झिणुं ]

**झीबी**—स्त्री. झिबी पहा. 'त्याखालीं फुल तेंचि ताइत पद्म झीब्यावरी आंवळे।' —अकक २ अनंत, सीतास्वयंवर ४५.

**झील**—पु. १ मुलगा; झिलगा. (कों. गो.) झीलो. 'तू नंदाचो झीलो, माकां फडको दी।' —मज ८. —भवि ३५.५५. २ एका झाडापासुन केलेलें, उत्पन्न झालेलें दुसरें झाड. 'हा आंबा त्या आंब्याचा झील आहे.' ३ (ल.) जवळजवळ नष्ट झालेल्या वंशांतील जिवंत मनुष्य, वंशाचा अंकुर. [ सं. झला=मुलगी ]

**झील**—स्त्री. रत्न इ०कांवरील तेज. [ अर. जिला; म. जिल्हई ] (वाप्र.) **(एखाद्याची) झील उडणें-उतरणें-बिघडणें**-( एखाद्याचें ) वैभव खालावत जाणें, नष्ट होणें; कीर्तीचा, मानमरातबाचा नाश होणें. **झील चढणें**-(कर्त्याची षष्ठी). (एखाद्याच्या ) वैभवाची, मोठेपणाची भरभराट होणें. **झील चढविणें**-१ अगदीं तकतकीत, साफ हजामत करणें, तासणें. २ (एखाद्यास) नांवारूपास आणणें; प्रतिष्ठा मिळवून देणें; मोठेपणाला चढविणें.

**झील**—स्त्री. (संगीत). १ गाण्यांतील सफाई, ठाकठिकी. २ गाणाऱ्या कंठाचा कंप; गिटकडी. ३ ( वाद्य. ) संबळाच्या दोन टिमक्यांपैकीं लहान आकाराची खणखणीत आवाजाची टिमकी (मोठ्या व ढब आवाजाच्या टिमकीस बंब म्हणतात ). ४ ( क. ) चौघडा. 'झील सुरू करा.' ५ एक प्रकारचें चर्मवाद्य. हें कडधा एवढ्या टिमकीच्या आकाराचें असून याला प्रायः कडयाच्या मधून समोंवार खाचा पाडून लोखंडी अगर पितळी गोल पत्र्या किंवा झांजा बसविलेल्या असतात. ६ ( तमाशांत ) गाण्यांतील पालुपद; ( तमाशांतील ) पुढील गाणारांनीं म्हटलेल्या भागाचें मागील साथीदारांनीं पालुपद म्हणून सुरांचा आरोह शेवटास नेण्याची जी साथ करावयाची असते ती. ७ ( व. ) बैलाच्या गळ्यांतील घुंगरमाळ. [सं. झिल्ली; हिं. झील; फा. झील] (वाप्र.) **०ओढणें-धरणें-देणें**-१ (दुसरा) गातानां त्याच्या सुराची साथ करणें. २ (ल.) (एखाद्याचा) अनुवाद करणें; री ओढणें, धरणें. **झीलकरी, झील देणारा**-पु. ( तमाशांतील ) मुख्य गाणाऱ्याची झील ओढणारे, धरणारे, सुरकरी. [ झील+करणें ]

**झील**—न. ( प्रां. ) एका टोंकास जाळी लावलेली, झाडावरून आंबे इ० काढण्याची बांबूची आंकडी; झेला. [ झेलणें ]

**झील**—पु १ पाणथळ, दलदलीची जागा, जमिनीचा ओलावा दमसपणा; आर्द्रता; ओलसरा. 'एकेकडून पानें व शेरणीचीं बेटें व पाणियाची झील असे अडचणींत उतरलों.' —भाव ५६. २ झरा; ओहोळ. [ सं. क्षीर. हिं. झील=सरोवर ] **झीलाण**-न. झिलाण पहा. [ झील ]

**झील**—स्त्री. (गो.) १ दाट झाडी. २ ( गो. ) (विटीदांडूच्या खेळांतील ) एक सप्तक; झकू.

**झील**—वि. हलकें. 'कां मेघाचें आंग झील। दिसे वारेंनि जैसें जाईल।' —ज्ञा १३.२१३. —क्रिवि. हळू; मंदपणें. [प्रा दे. झिल्ली= लहरी, तरंग ?]

**झीलगो**—पु. (कु.) १ मुलगा. २ गडी. झिलगा पहा.

**झीलफ**—पु. (संगीत) एक राग. ह्या रागांत षड्ज, कोमल ऋषभ, कोमल गांधार, कोमल मध्यम, पंचम, कोमल धैवत, कोमल निषाद हे स्वर लागतात. अवरोहांत ऋषभ वर्ज्य असतो. जाति संपूर्ण-षाडव, वादी धैवत, संवादी गांधार, गानसमय दिवसाचा पहिला प्रहर.

**झुई**—स्त्री. नदींतील बेट; जुवा; जुवें; जूं.

**झुकणें**—अक्रि. १ लवणें; वांकणें; एका बाजूस तोलणें; कलणें; वळणें. २ झुलत झुलत, झोंके खात चालणें. ३ रमत गमत, रेंगाळत चालणें; डौलानें, मिरवणुकींतल्या प्रमाणें चालणें. 'घाटगे मोहिते माने पाटणकर झुकती।' —ऐपो १०७. ४ दृष्टि चुकवू निसटणें; पळून जाणें; हातावर तुरी देणें; पोबारा करणें. ५ ( आजारानें ) कृश, रोड होणें. 'तो पंधरा दिवसांच्या तापानें बराच झुकला.' [ सं. युज्-युक्; हिं. जुक, झुकना; सिं. झुकणु ] **झुकत झुकत**—क्रिवि. झुलत झुलत; झोंके खात.

**झुकवणी**—स्त्री. १ वांकविण्याची, ओणविण्याची, कलविण्याची क्रिया. २ झुकांडी; झुगार; हुलकावणी; टाळाटाळ; चुकवाचुकव. [ झुकविणें ]

**झुकविणें**—सक्रि. १ वांकविणें; नमविणें. २ फसविणें; चकविणें; झुकांडी, झुगारा देणें; हुलकावणें; निसटून जाणें. [झुकणें प्रयोजक ]

**झुकाटणें, झुकांडणें**—अक्रि. ( एखाद्याच्या ) हातावर तुरी देणें; पोबारा करणें; निसटणें. [झुकणें] **झुकाटा-टी, झुकांडी, झुकाटणी**-पुस्त्री. झुगारा; चुकवाचुकव; चकविणें; फसवून निसटून जाणें. ( क्रि० देणें ). [ झुकाटणें ]

**झुकांडा-डी**—पुस्त्री. १ झोल; तोल. २ झुलणें; झोंक; झोकांडी; भेलकांडी; भिरकंडी. ३ गुंगारा; पळ; निसटणें. [ झुकणें ]

**झुकापुरी**—स्त्री. ( विनोदी शब्दप्रयोग ) हुलकावणी देऊन निसटून जाण्याचा व्यापार; झुकांडी. ( क्रि० देणें ). [झुकणें+पूर= शहर ]

**झुंकार**—पु. झणत्कार; झंकार. 'तेथें आलीं षट्पदकुळें। झुंकारशब्दें।' —दा १.२.११. —कथा ३.१६.८२. [ ध्व.; सं.

झंकार] झुंकारणें—अक्रि. झुंकार शब्द करणें; गुंजारव करणें. 'भ्रमर झुंकरती झुंकारें।' –मुआदि २८.९.

झुंग—स्त्री. (प्रां.) तांडा; समुदाय; टोळी; झुंड. [झुंड]

झुगझुग-झुगां—क्रिवि. अतिशय मंदपणें; मिणमिण; धुग-धुगीनें, अंधुकपणें (दिवा, जीव–प्रकाशणें, असणें). म्ह० झुगझुग जिणें टुकटुक खाणें.=गरीबीनें किंवा आजारीपणांत दिवस काढणाऱ्यास म्हणतात. [ध्व.; झुग द्वि] झुगझुगणें—अक्रि. १ (दिवा, प्राण) लिकलिकणें; मिणमिणणें; धुगधुगी असणें. २ फडफडणें; लुकलुकणें. [झुगझुग] झुगझुगी—स्त्री. (दिवा, जीव इ० कांची) धुगधुगी; लिकलिक; मिणमिण; अति मंद प्रकाश. [झुगझुग]

झुगटणें—सक्रि. फेंकणें; दूर लोटणें; झुगारणें. 'कुकर्मासि सत्कर्मे झुगटिलें।' –दा ५.९.४८.

झुगर—न. झुंबर.

झुग(गा)र—न. १ जाडेंभरडें व झिरझिरीत कापड. २ लग्नकार्यांत पाटील, देशमुख इ०कांस देण्याचा मानापानाचा पोषाख. ३ टाकाऊ, क्षुद्र, विनकिमतीचें कापड, वस्तु, मनुष्य इ० –वि. जुनें व जीर्ण (वस्त्र इ०).

झुगारणें—सक्रि. फेकणें; फेकून देणें; उडविणें; दूर लोटणें; भिरकावणें; झोंकणें; (खा.) झुगाडणें. 'खोडी सनाळ कमलांस तटीं झुगारी।' –र ५६. झुगारपट्टी—स्त्री. छकवाछकव; आज–उद्यां असें सांगून कांहीं तरी पोकळ सबबीवर लांबणीवर टाकणें; झुकवा-झुकव; झुलवणी. (क्रि० देणें). [झुगारणें+पट्टी] झुगारा—पु. नजर चुकवून काढलेला पळ; झुकांडी; चकविणें; झुकाटा; गुंगारा; टाळाटाळी; दडी; झुगारपट्टी (क्रि० देणें). [झुगारणें]

झुगारणें—न. दुर्बळ व कृश मनुष्य, जनावर. 'कणखर दळदपट गडी असावा, हें झुगारणें काय नांगर हांकितें.'

झुंज-झा—नस्त्री. १ लढाई; युद्ध; रण. 'बहुतकरूनि कौरव। हे आतुर दुःस्वभाव। वांटिवावीण हांव। बांधिती झुंजीं।' –ज्ञा १.१७२. २ भांडण; कलह; झोंबाझोंबी. [सं. युद्ध; प्रा. जुज्झ; सं. युज्; प्रा. जुज. हिं. जूझ; आर्मेनियन जिप्सी जुज] (वाप्र.) झुंजणें झुज(झ)णें–१ लढणें; युद्ध करणें. २ हुजत घालणें; भांडणें. झुंजविणें–१ झुंजण्यास लावणें; लढविणें. २ भांडणास प्रवृत्त करणें. [झुंजणें] (कण्या-दाणे टाकून कोंबडे) झुंजविणें १ आपल्या गमतीखातर खर्च सोसूनहि लोकांना भांडावयास प्रवृत्त करणें. २ बक्षीस ठेवून त्यासाठीं एखाद्या मंडळांत, जूट असणाऱ्या लोकांत भांडण लावणें; आपल्या समाईक देणगीनें एखाद्या गटांत फूट पाडणें, कलागत लावणें. झुंझात राहणें–लढाईंत ठार होणें. झुंझा(जा)स उभें राहणें–लढाई देणें; लढाईस सिद्ध असणें. 'मेजवानी म्हणून दहा लक्ष रुपये घेत असल्यास उत्तम, नाहींतर झुंजास उभें राहावें.' –भाव ३१. सामाशब्द–

झुंजणार–रा–वि. झुंजार; लढवय्या. 'सखाराम पानशे परशुराम भाऊ भले झुंजणार।' –ऐपो २५५. झुंजागाळ—स्त्री, (गो.) रणभूमि. [झुंज+(गो.) गाळ=मैदान] झुंजा(झा)-र-रू—स्त्री. १ लढाई; युद्ध; घनचक्कर. (क्रि० लागणें; असणें; होणें). २ –वि. लढवय्या; युद्धनिपुण; रणशूर. 'धाक घेतला झुंझारीं। केशिक सैन्य पळे दूरी।' –एरुस्व १०.३६. [झुंज] झुंजा(झा)रराव—पु. योद्ध्यास द्यावयाची एक पदवी; वीरपुरुष; शूरबहाद्दर; रणगाजी. 'पुण्यांतल्या तरुणांनीं मोठमोठ्या झुंझार-रावांना चकविलें.' –इंप १२०. [झुंजार+राव] झुंजारी—वि. (गो.) अंगाशीं अंग लावून लढणारा; झुंजार (–वि.) पहा. [झुंज]

झुजता—वि. जुजता पहा.

झुंजरूक मुंजरूक, झुंजुमुंजु, झुंजुकमुंजुक—न. पहाटेचा संधिप्रकाश; अरुणोदयाच्या वेळेचा प्रकाश; झांजड पहा.

झुजा(झा)ट–झुंजा(झा)ट—स्त्री. जोराचा वारा; वादळ; वावटळ; झुजाटा पहा. (क्रि० येणें). –वि. सोसाट्याचा, जोराचा, घोघाट्याचा, सनाट्याचा (वारा इ०). 'तो सुटला झुंझाट वारा।' –वेसीस्व २.४२. –क्रिवि. १ सोसाट्यानें वाहात; घोघाट्यानें वाहात (वारा इ०). (क्रि० सुटणें). २ जोरानें; चपळतेनें; चपळाईनें (घोडा इ० धांवणें). [ध्व; सं. झंझा=वादळ, वाऱ्याचा आवाज; झुंजणें]

झु(झुं)जा(झा)टा—पु. (काव्य.) सोसाट्याचा वारा; वावटळ; (प्र.) धुधाटा. 'वात सुटला झुंजाटें थोर।' –जै ३४. १८. [ध्व. झुजाट]

झुंजात—न. तुफान; वादळ; झंझावात; झुंजाट पहा. [सं. झंझावात]

झुंजुरकां-कीं-कें—क्रिवि. पहाटेस; उजाडत उजाडत; अरुणोदयाच्या वेळीं.

झुंझुरझुंझुर—क्रिवि. थोडथोडें; अस्पष्टपणें; अंधुकपणें. 'आतां पायाखालीं झुंझुरझुंझुर दिसूं लागलें.' –निबं

झुंझुरमाल–ळा—स्त्री. घोड्याचा एक दागिना. –स्वप५.३.

झुंट—न. झुडुप. 'कनकनाम हा पलाश, तैसा क्षुद्र झुंट धतूर।' –टिक १८८. [सं.]

झुटकणें—अक्रि. पळून जाणें; झुकांडी, झुगारा देणें; पळ काढणें; झटकणें पहा.

झुटका—पु १ (विडी, गुडगुडी इ० कांचा) झुरका. २ (उसाचा रस, दूध, पाणी इ० पेयाचा) घोट; घुटका. (क्रि० घेणें). ३ चुटा; विडी; चिरूट. ४ (गोष्ट, गाणें, लेखन इ० कांचा) चुटका; मजेदार उतारा. ५ व्यंगोक्ति; उखाणा; आहाणा; कोडें; कूट प्रश्न. ६ चुटका; झुल्का; डुलकी. 'निद्रेचा, झोपेचा झुटका.' [ध्व.]

**झुटा, झुटासानक**—स्त्री. १ उष्टें झाल्यामुळें दुसऱ्याच्या उपयोगी न पडणारें ताट, अन्न इ०. २ (ल) कायमची, परत न घेतां येण्यासारखी जहागीर, इनाम जमीन; सानक, खुर्दसानक पहा. ३ इनामपत्र. [सं. उच्छिष्ट. हिं. झूटा. उष्टें+सानक=ताट]

**झुटामुटा**—क्रिवि. १ 'दुधाचा, पिकाचा झुटामुटा.' थोडथोडें; थेंबथेंब (दूध गळणें, पिळून काढणें). 'झुटामुटा धार पडती, वासरूं पितें, गाय हुमती, बाई दोहती.' २ तुरळक तुरळक (पीक इ० येणें). 'झुटामुटा पीक आलेलें दिसतें.' –पु. (क.) तुटवडा; दुष्काळ; कमतरता; तोटा. [हिं.]

**झुट्यार**—वि. (कु.) खटयाळ; स्वैर; हूड; द्वाड वात्रट. 'ही मुलगी पहिल्या नंबरची झुटयार आहे.' [सिं. झुटो=कसबीण]

**झुंड**—स्त्री. (मनुष्य, प्राणी. इ० कांची) टोळी; जमाव; गर्दी; समुदाय; (पशु. इ०कांचा) कळप; खिल्लार. 'दैवें एकहि न मिळे जेथ मृगांच्या सदैव बहु झुंडी।' –मोकर्ण ४१.५२. [सं. यूथ; हिं. गु. झुंड]

**झुंड**—वि. (प्र.) झोंड, झोंट पहा. [झोंड] **झुंडाई**—स्त्री. झुंडपणा; दांडगाई. झोंटाई पहा. [झुंड]

**झुडणें**—झडणें पहा.

**झुडत(ता)र**—न. (निंदार्थी) १ खुरटें, पर्णहीन व कोमेजलेलें झुडूप. २ खुजा व दुबळा माणूस; म्हातारपणानें जर्जर झालेला जख्खड मनुष्य, जनावर. [झुडणें]

**झुडतुडला**—वि. क्षीण, कृश झालेला; झुरतुडला पहा. [झुरतुडणें]

**झुड(डू)प**—न. १ लहान, खुजट व पसरणारें झाड. २ (कों.) दाट झाडी; झाडांची जाळी; झाडी; वृक्षवाटिका; झुडपी पहा.

**झुडपी**—स्त्री. (को.) झुडुपांची दाटी; झाडी; लपून रहावयाजोगें अनेक फांद्यांनीं, वेलींनीं गच्च भरलेलें झाड; जाळी; झाडझूड. [झुडूप]

**झुंडी**—स्त्री. (सामा). झुंड· झुंड पहा.

**झुणका**—न. वेसन; पिटलें; अळण.

**झुणझुण-झुणां**—क्रिवि. १ पायांतील पैंजण, नुपूर इ०कांचा झुनझुन असा आवाज होऊन. (क्रि० वाजणें). 'झुणझुणशब्दा करिति घागऱ्या तालावरती गाती।' –कमं ४.१०९. २ सुं सुं करीत; सोंसावत; गोंगावत (वारा वाहणें). [ध्व. झुण द्वि.]

**झुणझुणणें**—अक्रि. १ (वारा इ० कानें) सुं सुं, घो घो करणें, गोंगावणें, घोघाटणें. २ (वीणा, वीन इ०तंतुवाद्यानें) तनन् तनन्, तुन तुन करणें. ३ (पायांतील पैंजण, वाळे इ० कानीं) झन झन, छुमछुम असा आवाज करणें; रुणझुणणें; छुमछुमणें. ४ फुणफुणणें; सणसणणें; झणझणणें. **झुणझणा-झुणी**—स्त्री. लहान मुलांचा एक प्रकारचा खुळखुळा. [झुणझुणणें]

**झुणा-ना**—पु. १ (मुलीचा) लहान लहंगा, परकर; लहान लुगडें. (व.) झुना=रंगीत पातळ. 'जरतारि झुणा करनाटकिचा।' –अकक २. किंकर, द्रौपदीवस्त्रहरण ७७. [हिं. झूना]

**झुणा, झुण्णा, झुना**—पु. लहान मुलींचा एक खेळ. 'झुना बाई झुना। झुना घालं रात्रीं।' –मसाप २.३.१३२. [ध्व.]

**झुणूक**—स्त्री. किंचित् भास; चुणूक पहा.

**झुतरी, झुत्री**—स्त्री. १ लहान ओढा; नाला. २ लहान ओढयाचा पाट. ३ पाटाचें कोरडें पात्र, तास. [झुरती ?]

**झुप(ब)का, झुमका**—पु. १ गुच्छ; घोंस; पुंज; गेंद (फुलांचा, केसांचा इ०). २ कर्णफुलाला लावलेला लोंबणारा मोत्यांचा घोंस, लोलक. [हिं. झुमका; तुल० अर. झुमरा=गर्दी]

**झुपकी**—स्त्री. (वेली इ० कांची) जाळी; कुंज; पुंज; झुपका. 'मुलीचे हातीं एक शतावरी नामक वेलीची झुपकी लागली होती.' –धर्माजी २५. [झुपका]

**झुंपडी**—स्त्री. (गु.) झोंपडी. –मौज ता. २.६.३०. [दे प्रा. झुंपडा; का. झोंपडी]

**झुबकळी**—स्त्री. झुबक बाळी; झुबका, झुपका पहा.

**झुबका**—पु. झुपका पहा. [हिं. झुमका] **-केदार**—वि. झुपक्यांनीं युक्त; गोंडेदार; गेंदवाज. [झुबका+दार] **-के(क)बाळी, झुबेबाळी, झुबा(बी, बें)-झुबुकबाळी**—स्त्रीपुन. मोत्यांचा (पोंवळयांचा) घोस खालीं लोंबत असलेली बाळी. 'कुडया झुबकबाळयाच्या जोडें।' –देवीदासकृत–भामावर्णन ४.–राजवाडे.

**झुबकी**—स्त्री. झुपकी; पुंज; पुंजका; राशी. 'पवित्रा ते केली परम असतां पापझुबकी।' –निमा २.८७. [झुपका]

**झु(झुं)बड**—स्त्री. १ दाटी; गर्दी; झिंबड; खेचाखेच; भोंवतीं गोळा होणें. 'तसेंच त्याच्याही पलीकडे नैर्ऋत्येकडे उडालेली अग्नीच झुंबडही सहज दिसेल.' –पालै ४५. (क्रि० वाळणें; पडणें). २ झिंबड पहा. [तुल० अर. झुमरा=गर्दी; दाटी]

**झुंबडा-डें**—पुन. (माण.) (धान्याच्या कणसांची) जुडी; मोळकें; जुडगें. झुंबाड अर्थ २ पहा.

**झुंब(म)णें**—अक्रि. (खा.) झोंबणें; चावणें; दंश करणें. 'गणू वाऱ्याली काल रातीं इच्चू (विंचू) झुंबला.' [झोंबणें]

**झुंबर**—न. १ अनेक दिवे लावतां येतील अशा रचनेचें बिलोरी कांचेचें लोंबणारें झाड; दिव्यांचें झाड. २ (खडीकाम) कमानीच्या नक्षीमध्यें झुंबरासारखी काढतात ती आकृति.

**झुंबर, झुंबड**—न. झोंबी. 'झुंबर करितो तिथें कोण कुणाचा वाली।' –राला ४०. –वि. तुंबळ; हातघाईचें; निकराचें (युद्ध). 'आला दिवस दोनपारला लागली टक्कर झुंबर लढाई दोन्ही दळाला।' –ऐपो ३३०. [अर. झुमरा=दाटी]

**झुबा**—पु. पायघोळ आंगरखा; झगा; जुबा पहा.

**झुमकणें**—अक्रि. ठमकणें; ठुमकत, नखऱ्यानें, अकडीनें चालणें; नटनथटन, नाटकी पद्धतीनें चालणें. [ ध्व. झुम् ]

**झुमकदोडकें**—न. ( खा. ) दोडक्याची एक लहान जात; याला घड येतात. —मात्रै ७.१–४.

**झुमका**—पु. झुबका, झुपका पहा. [ हिं. झुमका; गु. झुमखो= झुपका; सिं. झुमकु; अर. झुमरा ]

**झुमझुम-झुमां**—क्रिवि. पायांतील घागऱ्यांचा, पैंजणाचा झुमझुम आवाज होऊन. ( क्रि० वाजणें; करणें ). [ ध्व. झुम द्वि. ]

**झुम्मड**—स्त्री. ( खा. ) हुल्लड; झुंबड पहा. —मात्रै ७.१–४.

**झुर-कण-कन-कर**—क्रिवि. त्वरित; सपाट्यानें; झटकन; पळांत; क्षणांत. 'आनंदवनीं अवतार होता। झुरकर उडाला गेला केउता।' —चांगदेवगाथा ३१. [ ध्व. ]

**झुरकणी**—स्त्री. तांदुळांतील फार बारीक कणी. [चुरा+कणी]

**झुरकणें**—सक्रि. तपकीर, चिलीम यांचा झुरका, वारा इ० खूप जोरानें आंत ओढणें; दम मारणें. [ झुरका ]

**झुरकणें**—अक्रि. निसटणें; पळणें; झुकांडी देणें.

**झुरका**—पु. १ जोरानें ( तपकीर, वारा, विडी, गुडगुडीचा धूर इ० ) आंत ओढण्याची क्रिया; जोरानें मारलेला दम. २ पातळ पदार्थाचा जोराचा घुटका, घोट. ( क्रि० घेणें; ओढणें ). [ध्व. झुर्!]

**झुरझुर-झुरां, झुरझुरून**—क्रिवि. झुळझुळ-ळा, खळखळ-ळां, गु(गु)ड-गु(गु)डां इ० ( ओढ्याचें पाणी वाहतांना वाऱ्याची झुळुक आली असतां, तंबाकूची चिलीम, गुडगुडी ओढतांना होणाऱ्या आवाजाप्रमाणें ); झरझरा पहा. [ध्व.] ०**पळणें**—जवळजवळ पण जलद पावलें टाकून पळणें (विंचू, लहान मूल इ०नीं); तुरतुर पळणें.

**झुरझुरणें**—अक्रि. १ झरणें; झिरपणें; ठिपकणें. २ झुरणें; क्षीण होणें; झिजणें; क्षय पावणें ( शरीर इ० ). 'तुजसाठीं जैसी मैना झुरझुरी.' —होला ११४. ३ हळूहळू नाहींसें होणें; झुराडा, चुराडा होणें. [ झुरझुर, झुरणें ]

**झुरझुरपंजर**—वि. अत्यंत क्षीण झालेला; अस्थिपंजर उरलेला; हाडाचा सांपळा असा दिसणारा ( माणूस ). [झुरणें+पंजर]

**झुरझुरीत**—वि. १ झिरझिरीत; पातळ; विरळ विणीचें (कापड). २ उपयोग केल्यानें विरविरीत झालेलें; फाटलेलें (वस्त्र). [ सं. झृ=जीर्ण होणें ]

**झुरट**—वि. क्षीण; अशक्त; थकलेला. [ झुरणें ]

**झुरडी**—स्त्री. १ सुरकुती. २ क्षीणता. —शर.

**झुरण**—न. तांदूळ कांडल्यानंतर झालेली कणी; तांदुळाचा चुरा. झुरकणी पहा.

**झुरणी**—स्त्री. १ ( प्रिय माणसाच्या वियोगानें प्राप्त होणारी शरीराची किंवा मनाची ) क्षीणता; क्षय; झिजणी. 'तो झुरणीस पडला किंवा त्याला झुरणी लागली.' २ खंत; निदिध्यास. ३ गळती; झरणी; झिरपणी. [ झुरणें ]

**झुरणें**—अक्रि. १ झिरपणें; स्राव होणें; झुरझुरणें पहा. गळून जाणें. २ झिजून, झरून हळू हळू नाहींसें होणें; झिजणें ( पावसानें भिंत इ० ). ३ दुःखानें क्षीण होणें; खंत घेणें; झुरपणीस लागणें. 'पग पाहून मोर झुरे.' ४ ( ल. ) डोळा चुकवून पळून जाणें; निसटणें. 'साधुसंता पाहुनि झुरा।' —सिसं ३.१७५. [ सं. झृ. प्रा. झूर ]

**झुरतडी**—स्त्री. ( व. ) सुरकुती; वळी.

**झुरती**—स्त्री. पलायन; पळ. ( क्रि० करणें ). 'तुम्ही देखत-चिटी झुरती करणें.' —भाव ७८. [ झुरणें ]

**झुरतुडला**—वि. १ कृश; झिजलेला; फार कमी झालेला. २ थकलेला; क्षीण झालेला. ३ ( ल. ) गरीब; अशक्त; निरुपयोगी ( वस्तु ). [ झुरणें ]

**झुरपणी-पणें**—झिरपणी-पणें पहा.

**झुरमुरणें**—अक्रि. १ खालावणें; ऱ्हास पावणें; झिजणीस लागणें; दुखण्यास पडणें ( प्राणी, झुडूप ). २ (प्रिय वस्तू-माणसें यांच्याबद्दल) झुरणीस लागणें; शोकाकुल होणें; खंत करणें. [ झुरणें ]

**झुरमुरीत**—वि. ( गो. ) थोडासा राग किंवा रागाचा आवेश आणलेला; झणझणीत; खरमरीत.

**झुरविणें**—सक्रि. रिझविणें; आनंद देणें. 'तुकोबाचीं पदें अद्वैत प्रसिद्ध। त्यांचा अनुवाद चित्त झुरवी.' —व २१.६. [ रिझविणें-विपर्यास ]

**झुरळ-ळें**—न. १ वाशुरडा; कीटकवर्गातील षट्पाद जातींतील एक किडा; एक क्षुद्रजंतु. २ पतंगाची एक जात. [का. जिरिले] म्ह० समुद्राला झुरळाची गरज लागते. ( समुद्र आणि परशुराम यांच्या कथेवरून ).

**झुरळी**—स्त्री. १ सुरकुती; वळी; चिरमी; वळकटी ( मांस, फळ, वस्त्र इ० ला पडणारी ); शिथिल चामड्याला पडलेली सुरकुती. २ दुमड; दूण; घडी. [ हिं. झुल्री; सं. झल्लरी ]

**झुरळूक**—स्त्री. अस्पष्ट, अंधुक, ओळखूं न येण्याजोगा देखावा किंवा आकृति (वस्तूची). —क्रिवि. अंधुकपणें; अस्पष्टपणें (दिसणें).

**झुरा**—पु. ( झुमर ) ओढा. [ झुरणें ]

**झुरा, झुराबावरा**—वि. १ धाडसी; बेफिकीर; निधड्या छातीचा. 'मिळालें दळ तीन लाख झुरा.' —ऐपो २८७. २ विनदिक्कत; निःसंकोच; बेगुमान; निर्भीड. ३ डामडौली; फांकडा रंगेल इष्कीबाज. 'तुम्ही झुरे बावरे फंदी मुशाफर दिसतां.' —प्रला १९१. [ फा. झहरा=धीटपणा, धाडस+बावरा=भ्रमिष्ट ]

**झुरांटॉ**—पु. ( गो. ) झुरका पहा.

**झुरांटी**—स्त्री ( गो. ) लांब पल्ल्याची बंदूक.

**झुरी**—स्त्री. लहान ओढा. झुरा पहा.

**झुरी**—स्त्री. (वे.) आंब्यांच्या फळाच्या देठांतील चीक.

**झुरुका**—पु. १ झुरका पहा. २ झरोका पहा.

**झुरुझुरु**—क्रिवि. खळखळां इ० झुरझुरा पहा.

**झुरूमुरू, झुरेमुरे**—क्रिवि. झिरूमिरू पहा. अत्यंत कष्टावस्थेंत. 'तों झाडून फौज झुरेमुरे बाहेर निघून मैदानांत आली.' —भाव ६६.

**झुल(लू)क**—स्त्री. झुळूक पहा. **झुलकणें**—उक्रि. हळू हालणें किंवा हलविणें, फडफडणें (वाऱ्यांत–निशाण, कापड, कागद इ०).

**झुलक(का)वणी, झुलवणी**—स्त्री. भुलथाप; झुकावणी; चालढकल; चकवणी. **झुलक(का)विणें–झुल(ला)विणें**—उक्रि. १ भुलथाप देणें; वतावण्या सांगून झुलत ठेवणें; नादीं लावणें; सबबी लावून लांबणीवर टाकणें. २ आळसानें वेळ घालविणें. [झुलणें]

**झुल(ळ)णा**—पु. झोंपाळा; चोपाळा; पाळणा. [हिं. झूलना]

**झुल(ळ)णी**—स्त्री. झोंका; डोल. [झोलणें; हिं. झूलना]

**झुलणें**—अक्रि. १ अंग हालणें; झुलणें (हत्ती, चालत असतां, घोडेस्वार दौडत असतां). २ (ल.) हळू हळू चालणें; रमतगमत चालणें; रेंगाळणें. झुलणें पहा. ३ (ल.) हलणें (हंसतांना शरीर). ४ झोंका येणें; आंदोलणें. [सं. दोलनं; प्रा. झुल्ल]

**झुलवा**—पु. (मुसलमानांत) वेश्या किंवा विधवा हीस स्वस्त्री म्हणून बाळगतांना तिच्याशीं लग्नविधीप्रमाणें करावयाचा एक विधि. (क्रि० लावून घेणें). [झुलविणें?]

**झुल(ला)वा**—पु. १ झोंका; आंदोलन. २ चौपाळा; झुला.

**झुलवॉ**—पु. (गो.) देवालयांत किंवा देवाच्या पालखीपुढें कलावंतिणींनीं गावयाचीं स्तुतिपर पदें. [झुलविणें]

**झुलवाझुलव–झुलवी**—स्त्री. झुलकवणी पहा. टोलवाटोलवी; कपटानें लांबणीवर टाकणें. (क्रि० करणें; मांडणें; लावणें). [झुलविणें]

**झुला**—पु. झोला. १ दोन काठ्यांत लोंबकळणारी पाटी. हींत बसून (जत्रेंत) झोंके घेतां येतात; पाळणा; हिंदोळा; झोंपाळा; चौपाळा. २ डोंगराच्या कडयांवर, नदीतीरांवर खांब वगैरे उभारून त्यांस दोरखंड बांधून त्या दोरावरून सरकणारी टोपली, तिच्यांतून जाण्याची योजना. ३ वरीलप्रमाणें दोन कडयांनां, तीरांनां दोरी बांधून त्या दोरीच्या साहाय्यानें खालीं बांधलेल्या लाकडावरून जाण्याकरतां केलेला रस्ता; दोरीचा पूल. उदा० 'लक्ष्मण झुला.' ४ झुलता विछाना; झोंपाळा; पाळणा. [सं. दोला; प्रा. झुल्ल; हिं. झूला]

**झुला**—पु. घोड्याचा रोग. कमरी पहा. —अश्वप २.१८९.

**झुलार**—पु. झोंपाळा; पाळणा; झुला पहा. 'परी पुत्रमोहाची संपत्ती। चित्तझुलारीं हेलावे।' —नव १६.१७३.

**झुलावणें**—न. झुला; झोला पहा.

**झुलूप**—न. १ कुरळ्या केसांचा झुपका किंवा गुच्छ; कानावर लोंबलेले डोक्याचे केस. २ लहान मुलाच्या टाळूवर व कानांवर ठेवण्यांत येणारे केस; (बहुधा अनेकवचनी (झुलपें) प्रयोग); काकपक्ष. [फा. झुल्फ्]

**झुळ, झुल**—पु. (क.) विटीदांडूच्या खेळांतील संज्ञा; खंड; डाव; झक्.

**झुवा**—झुवा पहा.

**झुळकणें**—अक्रि. हळू हळू व मधूनमधून वहाणें; झुळझुळ, मंदमंद वहाणें (वारा). [प्रा. झुल्ल; ध्व.]

**झुळका**—पु. झुळका; चूळ (पाण्याची). (क्रि० घेणें; टाकणें). [ध्व.]

**झुळकी**—वि. (क.) आसमणी रंगाचें आडवें सूत व कुंकवासारख्या भडक रंगाचें उभें सूत घालून विणलेलें अशा रंगाचें (लुगडें). 'झुळकी रंगाचें लुगडें लवकर विकतें.'

**झुळझुळां–ळ**—क्रिवि. १ झुरझुर–रां पहा. झऱ्याचा आवाज, पाण्याचें मंद वहाणें, मंद वायूचा आवाज, धुराचें वर जाणें इ०च्या आवाजाप्रमाणें. (क्रि० वाहणें). २ अंधुक; अस्पष्ट; (दिसणारी आकृति). **झुळझुळणें**—अक्रि. झुळझुळां, हळू हळू, मंदमंद वहाणें (पाणी, वारा). [ध्व. झुळ. द्वि.]

**झुळझुळीत**—वि. १ चकचकीत; तेजस्वी; चांगली जिल्हई दिलेलें; झकपक; गुळगुळीत; मोहरेदार; तकतकीत. २ झकपक; स्वच्छ; सुंदर (लुगडें इ०). [सं. झला]

**झुळं(ळुं)बक**—न. १ एक कर्णभूषण; लोलक. —शर. २ (महानु.) झळाळी; तजेला. 'मौक्तिकांचे झुळुंबकें।' —शिशु ४२४. [सं. ज्वललंबक; किंवा प्रा. झुल्ल(=डोलतें)+लंबक]

**झुळमुळी**—स्त्री. झिलमिली पहा. चौकड्याचे व जोडीचे मोती माझ्या झुळमुळ्या एवढेहि नाहींत।' —भाऊ ३.१.

**झुळवणी**—न. झुळझुळ वाहणारें पाणी. [झुळ+पाणी]

**झुळा**—वि. १ जुळें; जुळ्यांतील एक. २ दुहेरी (फळ). [जुळा]

**झुळूक, झुळकी, झुळक**—स्त्री. १ वाऱ्याची मंदगति, लहर 'वारेयांची झुळकी आली।' —शिशु ६१३. २ (ल.) अनुकूल वेळ, संधि. (क्रि० वहाणें). 'व्यापार करीत असावें, एकाद वेळ झुळूक वाहिली म्हणजे फलद्रूप होईल.' ३ अंधुक, अस्पष्ट देखावा; अपूर्ण दृश्य; (वस्तूच्या) आकाराचा किंचित् भास. ४ ओघ; मार्ग; अखंड प्रवाह, चलती, प्रवृत्ति (वारा, विशेष प्रकारची हवा, पाऊस, उन्ह, थंडी, व्यापारधंदा, रोगराई, सांथ इ० ची). ५ अल्प अनुभव. ६ (ल.) तकाकी; चकाकी. —क्रिवि. झुळझुळ पहा. (क्रि० वाहणें). [सं. दोल्; प्रा. झुल्ल; ध्व. झुळ]

झू—स्त्री. कुत्र्याला एखाद्याच्या अंगावर घालतांना करावयाचा आवाज. छू पहा. [ ध्व. ]

झूज-स—न. झुंज पहा.

झूट—स्त्री. लबाडी. –वि. लबाड; खोटें; असत्य ( भाषण, मजकूर ). [ सं. शठ ? प्रा. झुट्ठ=असत्य; हिं. झुठ ]

झूड—स्त्री. झुडूप; लहानसें झाड, झाडझुड. [झाड; हिं. झुड]

झूड-म—स्त्री. झुंड. १ तगादा; निकड; आग्रह. २ भोंवतीं जमणें; गर्दी करणें; पुढें ढकलणें. ( क्रि० घालणें; पडणें ). [ फा. झुड्=जलद ]

झूमरा—पु. ( संगीत ) एक ताल. यांत चौदा मात्रा व चार विभाग आहेत.

झूर—स्त्री. १ सच्छिद्र जागा, भोंक (बंधारा, मातीची घागर वगैरेंतील ). यांतून पाणी झिरपतें. २ सच्छिद्रता. ३ झिरपलेलें, गळालेलें पाणी; द्रवपदार्थ. [ प्रा. झूर; म. झुरणें ]

झूर—न. सडतांना झालेल्या तांदुळाच्या कण्या; चूर. ०कणी—स्त्री. झुराची कणी; बारीक कणी. झुरकणी पहा.

झूल-ली—स्त्री. घोडा, हत्ती इ०च्या अंगावरील, पाठीवरील वस्त्र, आच्छादन. 'यापरी पृथ्वीं झुली व्यक्त।'—नव १३.७४. [ हिं. ]

झूला—पु. झुला पहा. [ हिं. ]

झे—अ. जो; अतिरेक दाखविणारा प्रत्यय; विशेष जोर दाखविण्यासाठीं योजतात. 'झे पाऊस पडला कीं चहूंकडे पाणी पाणी होऊन गेलें.' 'झे तो रगडून जेवला मग पोट फुगून उताणा पडला.'

झेंगट—न. एक वाद्य. झंगट, झंगड पहा. [ ध्व. जंगट ]

झेंगट—न. १ कठिण काम; त्रास; लचांड; कचाटी; घोटाळ्याचा प्रश्न. २ गुप्त कट; हिकमत; युक्तिप्रयुक्ति. ३ (ल.) ठेवलेली बाई; रांड. [ जंगट, झंगट पहा. तुल० सं. जेंगट=डोहाळे. 'जेंगटो दोहदः स्मृतः।'—हारावली २१९. डोहाळे वरून पिरपीर असा अर्थ व त्यावरून सांप्रतचा अर्थ बनला ]

झेंगट्या—वि. हिकमती; युक्तीबाज; कट करणारा; लटपट्या; विनाकारण लचांडें आणणारा.

झेंजटणें—अक्रि. वाजविणें; गाणें. [ ध्व. झेंगट ]

झेंझट(ड)णें—अक्रि. थंडीनें जड होणें; नाक चोंदणें; थंडी बाधणें; सुन्न होणें.

झेज(झ)रणें—उक्रि. १ (राजा.) घांसटणें; खरचटणें; झाजरणें. २ (ल.) मोंदणें; फसविणें. ३ हालवून खिळखिळें करणें; धसकफसक करून, वेडेंवांकडें वापरून नादुरुस्त करणें; इजा करणें; विघडविणें; शिथिल करणें. ४ ( गो. ) झेजरचें=चेंचणें; वदडणें; ठेचणें. –अक्रि. झेंझट(ड)णें; पहा. (नाक)झेजरणें—पडशानें नाक हुळहुळें होणें.

झेटि—स्त्री. केसांची वट. 'कपाळ झेटि मिसें वोट लावि तेसी ललाटीं।'—निगा ९०. [ सं. जटा; झाट ]

झेंडा—पु. १ पताका; निशाण; ध्वज; काठीसह निशाण. २ फुलांच्या माळा घालून मिरवणुकींत चालविलेलें निशाण. ३ धेंडा ( नाचणारा ) पहा. ४ मोजणीकामगाराची काठी, निशाण. [ सं. ध्वज; प्रा. झअ; सिं. झंडो; हिं. झंडा; सं. ध्वजदंड; का. झेंडे ] ०नाचविणें-मिरविणें—स्वतःची प्रौढी मिरविणें; स्वतःस मोठें समजणें; आपलाच पराक्रम सांगणें (पराक्रम केल्यानंतर, विवाहानंतर झेंडा( धेंडा ) नाचविण्याची चाल असे तीवरून ). ०लावणें-रोवणें—एखादा मोठा पराक्रम करणें; कीर्ति संपादणें; ध्वज लावणें ( हा शब्द उपरोधिक अर्थानेंहि वापरतात ). 'विठ्ठचा गजर हरिनामाचा झेंडा रोविला.' 'दिल्लीआग्र्यावर झेंडे रोविले।'—ऐपो २४९. ०पट्टी, झेंडेपट्टी—स्त्री. १ नवीन निशाणाचा खर्च भागविण्यासाठीं गांवावर ( व्यापारी, प्रवासी यांच्यावरहि ) बसविलेला फाळा. २ झेंडा लावण्या-वापरण्याबद्दल कर. ०बोपा—पु. (व.) धेंडा, झेंडा अर्थ ३ पहा. 'उद्यां झेंडाबोपा नाचावयाचा आहे.' [ झेंडा+बाप्पा ]

झेंडू—पु. १ एक फुलझाड व त्याचें फूल. याच्या कळ्या ( लहान फुलें ) तांबड्या मखमलीच्या चेंडूसारख्या दिसतात; मखमाल. २ जहरी साप चावल्यानंतर तोंडांतून बाहेर येणारा रक्तमिश्रित फेंस; फेंसकूट; रक्ताची गुळणी. ( क्रि० येणें; फुटणें ) 'तत्काळचि झेंडू येऊन। तेथेंच त्याचा गेला प्राण।'—भवि ५४.४७. ३ (राजा.) गुरांच्या घशांतील एक रोग. [प्रा. झंडुअ] ०गेंद—पु. झेंडूच्या आकाराचा गेंद; गुच्छ.

झेंडोली-ळी—स्त्री. गवताची चूड. धेंडोली पहा.

झेंप—स्त्री. १ पुढें किंवा बाजूस कलण्याची गति; झोंक; तोल; झोकांडा; हेलकावा; झांप. ( क्रि० देणें; खाणें; घेणें; जाणें ). 'झेंप घालीं सुखरूप गगनपंथें।'—र १८. २ पक्ष्याची भक्ष्यावरील झडप. ३ एखादा पदार्थ पकडण्यासाठीं पुढें मारलेली उडी, झांप. 'झाला सावकाश झेंप घाली वरी।'—तुगा ५१. ४ पोहणाऱ्याची पुढें जाण्याची अथवा पाणी तोडण्यासाठीं लांब हात टाकण्याची गति इ०. ( क्रि० घालणें; मारणें; टाकणें ). ५ लवक, पाळणा, झोपाळा इ० ची झुलती गति; आंदोलन; डोल; झोल; मागेंपुढें होणें. ( क्रि० घालणें; देणें; घेणें ). ६ (व.) अथांग पूर असलेली स्थिति. [ झांप पहा ]

झेपटी—स्त्री. झिंपरी अर्थ १ पहा.

झेंपणें—अक्रि. ( खा. ) पोहणें; पाण्यावर तरंगणें; खेळणें. [ झेंप ]

झे(झें)पणें, झे(झें)पाविणें—उक्रि. तोलणें; सोसणें; पूर्ण करणें; पार पाडणें; बजाविणें; करणें. (एखादें कष्टसाध्य काम). 'प्रतिपादन करावयाचे गहन अर्थ कोणत्या मराठी भाषेस झेपण्यास कठिण असें वाटून......' —नि २. 'वरी मसलत झेपावली.' [झेंप]

झेपला—पु. १ (कों.) झोंपाळ्याची दोरी; झेपुटा. २ झोंका; दोल; डोल. (क्रि० येणें; घेणें). [सं. क्षेप; म. झेपटा]

झेपसा—पु. (प्रां) मातीचा ढेपसा; ढेंकूळ.

झे(झें)पावणें—अक्रि. १ (काव्य) उडी घालणें किंवा टाकणें. 'कितीयेक झेंपावती अंतराळीं।' —राक १.१३. २ झडप घालणें (पक्ष्यानें). 'कीं वृक्ष दाटला देखोनी फळीं। विहंगम झेपावती।' ३ वेगानें येणें; उसळणें; झांप टाकणें (सापानें). 'लज्जेनें न पुसे सखिप्रति कदा कंदर्प झेंपावला।' —अकक २ विठ्ठल, रसमंजरी ५९. ४ लुब्ध होणें; भुलणें; मागें लागणें. 'पाहुन मोहरा तुजसारखा तुजवर झेपावती। तुला आपल्याकडे मोहिती।' —होला ९३. [झेंप]

झेपेलीन—न. एक प्रकारचें मोठें विमान. हें याच नांवाच्या एका जर्मन संशोधकानें १९०० सालीं निर्माण केलें. [विशेषनामावरून]

झेपुटा—पु. झोक्याची, पाळण्याची दोरी; झेपसा. [सं. क्षेप]

झेंब(म)णें, झेमणें—अक्रि. १ (कों.) कोमेजणें; वाळत जाणें (वृक्ष, लता इ०). २ झोपेची डुकली घेणें. [झेम]

झेम—स्त्री. (गो.) डुलकी; झोंप.

झेरमोगे—पु. वखार. —मुंव्या १५०.

झेल—स्त्री. १ (गो.) झोंका. २ झोंपाळा; झोला. 'तुटली संसाराची झेल.' —अमृत ११३. ३ जाळें. [सं. दोल—दोला] ०चेंडू—पु. (बडोदें) लॉनटेनीस खेळ. —झेल चेंडूचा खेळ १. [झेल—जाळें+चेंडू]

झेलगें—न. आंबे काढण्याची आंकडी. झेलणी अर्थ २ पहा.

झेलचें—अक्रि. (गो.) मागेंपुढें होणें; डोलणें; झोका घेणें. [झेल]

झेलणी—स्त्री. १ पकडणें; पकड. २ फळें काढण्याची जाळें असलेली आंकडी; झेलगें. [झेलगें]

झेलणें—उक्रि. १ फेंकलेली किंवा पडणारी वस्तु हातानें पकडणें; झिंकणें. २ (ल.) तत्काळ (श्लोक, गाणें वगैरे) ध्यानांत ठेवणें, उचलणें; अनुसरणें. ३ उत्सुकतेनें कबूल करणें, मान्यता देणें, परवानगी देणें (सूचना, विनंति, वचन य स). ४ स्वीकारणें; ग्रहण करणें; पतकरणें (आव्हान इ०). [झेल] (शुंका, शब्द इ०) झेलणें—आपल्या कामासाठीं दुसऱ्याची वाटेल ती गोष्ट ऐकणें.

झेलती—स्त्री. (नाविक) वोडतांस दमण भरण्याकरितां असलेली दोरी. [झेल]

झेलरवा—पु. (सोनारी) फीव; सोन्याच्या सुताच्या एका टोंकास दिव्यावर धरून केलेला रवा; गोळी (हा नथेसाठीं वापरतात).

झेला—पु. १ पुष्पगुच्छ; फुलांचा झुबका; गोंदा; घोंस. 'रमे चंपक—कुसुमौघ हार झेला।' —र १८. २ झाडावर लोंबणारें मोठें जाळें, आंखी. यांत झेलणीनें उतरलेले आंबे टाकतात. (झेला, झेली, झेलें)—(पुस्त्रीन.) हे शब्द (झेलण्याची आंकडी या) एकाच अर्थानें कांहींजण वापरतात. ३ शेताला पाणी द्यावयाची एक प्रकारची टोपली. ४ (पोतकाम) मण्यांचें एक प्रकारचें कुसरीचें काम. [झेलणें]

झेलोंचें—क्रि. (गो.) मागेंपुढें करणें; झोके घेणें; हलविणें. झेलचें पहा. [झेल]

झोक—पु. (ना.) झुबका; गुच्छ. [हिं.]

झोक—पु. डौल; दिमाख; ऐट. [अर. झोक्] ०दार—डौलदार; ऐटबाज. झोकांत होणें—चांगल्या प्रकारें, डौलांत घडणें, होणें.

झो(झों)क—पु. १ कल; ओळंब्यांतून एकीकडे कलणें; झुकणें; तोल (क्रि० जाणें). 'डोंगरावरून उतरतांना झोक गेला तर रसातळाला जाण्याची भीति.' २ (ल.) वळण; रोंख; कल; दिशा; मोडणी; रीत; चाल; वृत्ति (सैन्य कूच करतांना, स्वभावाची, भाषणाची इ०). 'वामनरावांचे बोलण्याचा झोक माझे लक्षांत आला.' ३ वाऱ्याचा मोठा झोत; वादळाचा तडाखा, झटका. ४ झपाटा (वस्त्राच्या पदराचा). ५ (ल.) भाषणाचा प्रवाह, वेग. 'कोणी कसाहि शब्द सांगितला तरी हा बोलण्याचे झोंकाखालीं नेतो.' 'श्लोक वाचण्याचा झोंक थांबवून अर्थाकडे धांवावें लागतें.' —विवि ८.७.१२४. ६ प्रवृत्ति; तालमान; रीत. 'देशा—काळाचा झोंक पाहून वागावें.' [हिं. झुकणें झोक] ०चिट्ठी—चिठ्ठी—स्त्री. १ एखाद्यानें, एखाद्यास, एखाद्यावर काम न होण्याजोगी दिलेली चिठ्ठी; रोखा, करारपत्र (ज्यामुळें ती घेणाराची निराशा होईल असें). २ (ल.) व्यर्थ दिलेला हेलपाटा; कपटवचन; खोटी आशा. (क्रि० देणें). ०पट्टी—स्त्री. पोकळवचन; सुलथाप; फुसलावणी. झोकचिठ्ठी पहा. (क्रि० देणें). झोकली बातमी—स्त्री. उडत बातमी; हूल; अफवा.

झोकणी—स्त्री. १ झुकणें. २ ढोसणें. [झोकणें]

झोकणें—अक्रि. १ ओळंब्यांतून एकीकडे जाणें; कलणें; वांकणें; नमणें. २ झोंके खात जाणें; झुकणें. —सक्रि. १ ढोसणें; मोठमोठे घोट घेणें, ढसढसां पिणें (दारू, दूध इ०). २ फेंकणें; झुगारणें. ३ झेपणें; पुरें करणें; साधणें; पार पाडणें, करणें (कष्टसाध्य काम). ४ बेधडक गप्प ठोकून देणें, सांगणें; (नसेल तें) उठविणें. [झुकणें]

झों(झो)का—पु. १ हेलकावा; झोला; आंदोलन. (क्रि० घेणें; खाणें; देणें; टाकणें). २ वजन करतांना झुकेगिरीनें

तराजूला मारलेला झटका, आंचका. ३ (ल.) निष्कारण प्रवास; हेलपाटा; फेरा; धक्का; फुकट फेरी; चक्कर. 'मीं पंधरा दिवस त्याचे घरीं झोंके खातों.' 'त्या वाटेनें चार कोसांचा झोंका बसतो.' ४ तोटा; नुकसान. (क्रि० बसणें) 'पांचशें रुपयांचे कापडांत दोनशें रुपये झोका बसतांच कमर बसली.' ५ फसवणूक; लुच्चेगिरी; गोता. (क्रि० देणें). ६ झोंपाळा; झोला. ७ हलविणें; मार्गेपुढें ओढणें. (क्रि० टाकणें). ०झोंक-स्त्री. १ फेंकाफेंक. २ (ल.) टाळाटाळ; सबबी सांगणें; दिवसगत लावणें; चालढकल. ३ दुसऱ्यावर काम टाकणें; कोलवाकोलव; टोलवाटोलव. [झोंकणें द्वि.] ०ठोका-पु. वेलाफुलास गांठ पडणें; अवचित घडणारी गोष्ट; दैवयोग; तडाखा; लग्गा (नशिबाचा. [झोका+ठोका=ज्योतिषांतील पडताळा] झोक्याठोक्यांत येणें-सहजगत्या किंवा दैवयोगानें घडून येणें.

झोंकांडा-डी-डें—पुस्त्रीन. १ झुकांडी. पुढली किंवा एका बाजूची गति, कल, झोंक (झुकत चालतांना); तोल जाणें. (क्रि० जाणें). २ झुकापुरी; निसटणें; तुरी देणें.; झुकांडी. (क्रि० देणें).

झोग—स्त्री. झुकलेला, पुढें आलेला भाग (मोटवणीचे खांबाचा, मुळक्याचा इ०). [झोक]

झोजा-झा, झोज्या-झ्या—वि. १ स्थूल; ढमाल्या. २ सुस्त; आळशी व मंद. ०मल्लारी-पु. गबदुल, अजस्र माणूस. कपड्यानें वोंगा आलेल्यास, मोठ्या माणसाचे कपडे घातलेल्यास म्हणतात. [हिं. झोझ=दोंद]

झोजा—पु. गांडु, गांडीया. [अर. झौजा=बायको]

झोंट-टी—स्त्री. १ झिपरी; पुढील केंस. झुलप; बट. 'झोंटी धरूनि विराटसुता।' -मुवि ६.६२. २ लहान मुलांचें (शेंडी पूर्वीचें) जावळ. ३ (सामा.) शेंडी. [सं. जटा; हिं.] ०धरणी-स्त्री. १ एकमेकांचे केंस धरून ओढणें; भांडणें; केशाकेशी. २ (ल.) भांडण; तंटा; कज्जा. 'झोंटधरणी केशयुद्ध।' -मुआदि ३०.१६०.

झोंट—पु. १ निर्लज्ज, अरेराव, सदसद्विचारशून्य माणूस. २ (विशेषतः) कर्ज फेडण्याच्या कामीं लबाडया किंवा खळखळ करणारा माणूस. 'माझ्या वांटणीसच कां झोंट कुळाची खतें?' ३ (सामा) अरेराव, जुलमी, दांडगा माणूस. झोंड पहा. [सं. जट] ०धरणी-स्त्री. १ झोंट माणसापासून कर्जफेड करून घेण्यासाठीं केलेले अतिशय श्रम, खटपट. २ कृपा व्हावी म्हणून एखाद्याची केलेली हांजीहांजी; नीच सेवा; गांडगुलामी.

झोंटाई—स्त्री. झोंट माणसाचें वर्तन, वर्तणूक, दांडगाई; झोंडपणा. [झोंट]

झोंटाळणें—सक्रि. शेंडी धरून ओढणें. 'मन धांवतां कल्पनेपाशीं। विवेक उठाउठीं झोंटाळी।' -एभा २३.९५.

झोटिंग—पु. भूत; पिशाच्च (विशेषतः मृत मुसलमानाचें). 'आग्या झोटिंग जखिणी। त्यांस भजोन जन बुडाले।' -ह १३.६५. २ (ल.) घरदार, बायको मुलगा नसलेला, फटिंग माणूस. ३ अव्यवस्थित, जुलमी, अडदांड, त्रासदायक माणूस. [सं. जोटिंग=शंकर। हिं. झोटिंग=भेंसाळ] ०पाच्छाई-पाद(बाद)शाही-स्त्री. १ वेबंदशाही; जुलमी व अव्यवस्थित कारभार, राज्यव्यवस्था. 'सुधारलेल्या राज्यपद्धतीस अनुसरून कांहीं गोष्टींत सर्वच झोटिंग पाच्छाई करतां येत नाहीं.' -टि ४.२३०. २ अंदाधुंदी; गोंधळ; घोटाळा. [झोटिंग+बादशाही] म्ह० वेबंदराज्य झोटिंग पादशाहा.

झोड—स्त्री. १ ठोक; मार; चोप. (क्रि० मारणें; काढणें). (ल.) यथास्थित दणकणें, झोडणें; खरपूस समाचार. २ (भाताची, धान्याची इ०) झोडपणी. ३ (ल.) एकसारखा जोराचा पाऊस. (क्रि० बसणें; किंवा पावसानें झोड लावणें). ४ अतिरेक; पराकाष्ठा; अतिशय चालविणें. उदा० गाण्याची, जेवण्याची, लिहिण्याची झोड. (क्रि० लावणें; लागणें; पडणें). 'आज त्यानें दिवसभर पुराणाची झोड लाविली आहे.' [झोडणें] ०काम-न. ओबडधोबड, साधारण प्रतीचें काम; ज्याला चातुर्यापेक्षां शक्तीची जास्त गरज आहे असें काम; अंगमेहनतीचें काम. [झोडणें+काम] ०कामी-म्या-वि. जिकीरीचें, त्रासदायक, हमालीचें काम करणारा; कसबी नव्हे असा (सुतार इ०); अकुशल. [झोड+काम]

झोंड—पु. १ झोंट पहा. २ दांडगा; पुंड. -भवि ५३. १२२. ३ (विशेषतः) निगरगट्ट कूळ. 'नाहीं गळां पडलों झोंड।' -तुगा १२५४. झोंडगी-स्त्री. निलाजरी; दांडगी स्त्री. 'झोंडा झोंडगीचे पोटीं। फळें विजाती करंटीं।' -तुगा २९७४. झोडणें पहा.

झोडगा—वि. झोडण्याची आवड असणारा; मारकट; मारका; निर्लज्ज; हट्टी; हेकेखोर; ठोक देणारा. [झोडणें]

झोडगी—स्त्री. धान्याचीं कणसें झोडपून त्यांतून दाणे काढण्याची क्रिया; झोडणी; झोडपणी. [झोडण]

झोडगें—न. (राजा.) कोडगी, निर्लज्ज, स्वैरिणी, हट्टी स्त्री.

झोडझपाट-झपेट—पुस्त्री. १ जोराचा हल्ला, धाड (मारण्यासाठीं किंवा लुटण्यासाठीं). २ मारामार; लुटालूट; जुलूम; मूटमर्दाई. 'हा झोडझपाट करून पोट भरतो.' झोडणें झपेटणें-झपाटणें-१ लुटालूट करणें; दरवडे घालणें. २ हाणमार करीत राहणें; दांडगाईचें वर्तन ठेवणें. [झोडणें+झपेटणें किंवा झपाटणें.]

झोडणी—स्त्री. १ भात झोडण्याकरितां आयंडा ज्या दोरीनें बांधतात ती दोरी. -यल्लापूर २९०. झोडपणी. झोडगी पहा. २ काठी इ०नीं मारण्याची क्रिया. [झोडणें]

**झोडणें**—उक्रि. १ बडविणें; कुटणें; झोडणी करणें; मळणें. २ (ल.) चांगलें मारणें; ठोकणें; झोडपणें; कुमलणें. 'वरि बैसले असुर समस्त। त्यांसि झोडून पाडिलें।' ३ रेटणें; भरडून काढणें; ओबडधोबडपणें भरमसाट करणें (काम, मेहनतीचें काम, व्याख्यान.) ४ (अशिष्ट) घशांत कोंबणें; खच्चून भरणें. 'हा पंचवीस लाडू झोडून आणखी घाल म्हणेल.' ५ (ग्राम्य) संभोग करणें; झवणें. ६ (खेळांत) डाव मारून घेणें. [प्रा. झोडण= पडणें] झोडून घेणें–(गंजिफांचा खेळ) घेणी घेणारानें राजा-बरोबर आणखी एक पान टाकून मारणें; देणी देणारा जर आपल्या सगतचा (उजव्या हाताकडील) असेल व देणीसाठीं उतरलेल्या पानाच्यावरील पान आपल्या हातांत असेल तर राजा-बरोबर तें पान टाकून डाव घेणें. असें केल्यानें या हाताचीं सहा पानें मिळतात. ०पट्टी–स्त्री. खरपूस मार, चोप ठोक. (ल.) खरड-पट्टी. [झोडणें+पट्टी]

**झोडपणें**—उक्रि. झोडणें (शब्दशः व ल.) पहा. १ ठोकणें; बडवणें. २ ताव मारणें; फडशा पाडणें. ३ झोडणें; बडवून दाणे इ० वेगळे करणें.

**झोंडाई**—स्त्री. निगरगट्टपणा; अरेरावी. झोंटाई पहा.

**झोडाझोड**—स्त्री. १ यथास्थित चोप, मार; मारामारी; ठोकाठोकी. २ (ल.) चलाखी; चपळाई (काम, लढाई, पाऊस इ० तील). [झोडणें द्वि.]

**झोडीव**—वि. १ झोडलेलें; मळणी केलेलें. २ (ल.) ओबडधोबड रीतीनें तयार केलेलें; कसें बसें भरडून काढलेलें. ३ वाकसानें कसें बसें छिलून काढलेलें (लाकूड). याच्या उलट तासीव..[झोडणें].

**झाडोरा**—पु. (कों.) झाडी.

**झोत, झोतावा**—पु १ आगीची मोठी ज्वाळा. २ पाण्याचा मोठा प्रवाह, लोंढा, लोट (वरून खालीं पडणारा); धोत. ३ (सामा.) प्रवाह; लाट (वारा; इ०ची). [सं. ज्योतिस्=उजेड; म. ज्योत]

**झोती**—स्त्री. धक्का; विक्षेप. 'रचलेपणा पडैल। झोती हन।' –ज्ञा १३.२५६.

**झो(झों)प**—स्त्री. निद्रा; नीज. (क्रि० घेणें; येणें). [सं. स्वप्] म्ह० झोंपेला धोंडा भुकेला कोंडा. झोपणें–अक्रि. निजणें. झोपीं जाणें–झोप लागणें; झोंपणें. ०मोड–स्त्री. निद्राभंग; झोपेंत पडणारा खळ; झोंप लागली असतां मध्येंच जागें होणें, करणें. झोपाळू, झांप्या, झोपाळ–ळ्या–वि. अतिशय झोंप घेणारा. नेहमीं सुस्त.

**झोंपडी–डें**—स्त्रीन. १ गवताळ घर; खोपटी; पर्णकुटी. २ काड्यामोड्यांचें घर; अगदीं गरिबाची राहण्याची जागा (झोंपडी-पेक्षां झोपडें हें जास्त हलकेपणा दर्शवितें. अगदीं कमी प्रतीची झोपडी=झोंपडें असाहि अर्थ करतात). [प्रा. झुंपडा; का. झोंपडें]

**झांपण**—न. बैलाच्या डोळ्यावरील ढापणी; झांपण. [झांप]

**झोंपय, झांपै**—स्त्री. (गो.) झोका; आंदोलन 'झोंपय काढ.'

**झो(झों)पा**—पु. १ डोल; हेलकावा; झोका. २ (कों.) नांगरलेल्या जमिनींत धान्य पेरून ती जमीन सारखी करण्यासाठीं लांब दोरी बांधलेला टहाळांचा झुबका, केरसुणी. ३ झांपा; झोपाटा; झोंपडी किंवा कुंपण यांचें (बारीक फांद्यांचें विणलेलें) ताटीवजा दार. ४ झोंपडी; खोंपटी. ५ झोपाळा; चौपाळा; झुला. म्ह० बैल गेला न झोपा केला (लावला). =थंडीनें बैल मेल्यावर गोठा बांधला.

**झोपाट–टा**—पु. (व.) ताटी; झोंपडीचें, कुंपणाचें दार; झांपा. झोपा अर्थ ३ पहा.

**झोंपळा**—पु. झोके घेण्याचें साधन; हिंदोळा; चौपाळा; झुला. [झोका–पा+ळा प्रत्यय]

**झोव**—न. (गो.) एक जातीचा शिंपा.

**झोंबकळा**—पु. (माण.) झोंपाळा; हिंदोळा. [झोकाळा]

**झोंबट**—न. मैथुन; संभोग, तें करणारें जोडपें; झांगड (विशेषतः सापाचें, प्राण्यांचें).

**झोंब(बा)ट, झोंबडें**—न. त्रासदायक काम किंवा माणूस; लचांड; कुलंगडें; कचाट; संकट; तंटाबखेडा. [झुंबड, झोंबणें]

**झोंब(बा)ट, झोंब(बा)ड–डें**—न. तंटा; भांडण, कलह; सामुदायिक भांडण, वाद आणि त्याचे सर्व वादीप्रतिवादी. 'झोंबटचे झोंबट सरकारांत नेलें.'

**झोंब(बा)डणी**—स्त्री. १ ओढाओढ; हिसकणी. २ लूट; चोरी. [झोंबडणें]

**झोंबडणें**—उक्रि. १ धान्याची मळणी करणें. २ चोपणें; घाव घालणें; आपटणें (धुतांना कपडे) ३ झोंबाडणें पहा.

**झोंबडा**—वि. १ (बायकी) निर्लज्जपणें, दांडगेपणानें अंगाशीं लगट करणारा; अंगास झोंबणारा; आंवळणारा (अतिप्रसंग करणाऱ्या पुरुषास म्हणतात). २ लोंचट; चिकट; नकार दिला तरी पिच्छा पुरविणारा; अत्यंत आग्रही. ३ चावणारी. (मुंगी, माशी). [झोंबणें] ०झोंबड–स्त्री. १ हिसकाहिसकी; ओढाओढी. २ झगडणी; झोंबी.

**झोंबणी**—स्त्री. १ कुस्ती; झोंबी. २ झगडाझगडी; हिसका-हिसकी. [झोंबणें]

**झोंब(म)णें**—अक्रि. (हें क्रियापद कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणें चालतें) १ तीव्र वेदना होणें; मर्मभेद होणें. (ल.) बोचणें; टोंचणें; चावणें; चरचरणें; झणाणणें; चुणचुणणें; डसणें (जाळ, उपरोधिक शब्द किंवा भाषण, निंदा). 'दाही मुखीं झोंबती ज्वाळा।' २ डसणें (साप). 'कीं झोंबला करीं साप।'–मोकर्ण ६.५६. नांगीनें

टोंचून तीव्र वेदना करणें ( विंचू इ०नीं ). ३ जोरानें व बलात्कारानें कीस आलिंगणें, दाबून धरणें; पकडणें; अंगलट येणें; मिठी मारणें. 'ऐसे वदोनि कंठीं झोंबे दुःशासन स्वभावाच्या' —मोवन ७.७०. जोरानें घसटणें. ४ भांडणें; मस्ती करणें; युद्ध करणें; तुटून पडणें. 'इकडे निशाणाकडे जनकोजी शिंदे झोंबतच होते.' —भाव ६३. ५ (ल.) ओढा असणें. 'कृष्णाकडे झोंबति मायबापें।' —सारुह ७. ९२. ६ (ल.) आकलन करणें; समजून घेणें. 'बोलाआदि झोंबिजे। प्रमेयासि।' —ज्ञा १.५८. ७ (ल.) झटून काम करणें. 'नरनारी झोंबती साहित्य करित।' —दावि १७२. ८ लगटणें; गुंतणें; विलगणें; पकडणें. 'उत्तरिया झोंबे तान्हें तें दूर करून।' —विक ११५. [का. जोंपिसु=थरारणें, धक्का]

**झोंबणें**—अक्रि. दाट येणें; गुच्छ बनणें; अतिशय लिगडणें (फुलें, फळें, बहर). 'या मोगऱ्यास पाणी लावा म्हणजे हजारों फुलें झोंबतील.' [का. जोंपु=गुच्छ]

**झोंबरा**—वि. १ तीव्र वेदना करणारा, देणारा; मर्मभेद करणारा; जिव्हारीं लागणारा; दंश करणारा; टोंचणारा (अक्षरशः वल.) 'त्यांचा विनोद कधींही झोंबरा नसे.' —कोरकि ७२०. २ जोरानें लगटणारा; अंगलट करणारा; जोरानें अंग आवळणारा, धरणारा; पकडणारा. ३ एकदम चावणारा, तोडणारा. ४ जळजळीत. [झोंबणें]

**झोंबा**—पु. तेल ठेवण्याचें भांडें. झावा, झावू पहा.

**झोंबाडणें**—सक्रि. १ जोरानें, दांडगाईनें हिसकावून घेणें; धसकफसक करणें. २ लुटणें; नागविणें; लुबाडून घेणें; चोरी करणें. [झोंबणें] **झोंबाडा**—पु. झोंबण्याचा प्रकार. जबरीनें पकडणें, घेणें; घाला; हिसकावून घेणें; धाड; झेप. (क्रि० घालणें; करणें; घेणें; मारणें). २ चोर; लुटारू; दरवडेखोर. [झोंबाड]

**झोंबिन(ण–नि)णें**—सक्रि. (काव्य) आलिंगणें. झोंबणें पहा. 'असासितु झोंबिनिली। प्राणवल्लभासि।' —शिशु ७०६. [झोंबणें]

**झोंबी**—स्त्री. १ कुस्ती; झुंज; लढाई. (क्रि० घेणें; खेळणें). 'कृष्णापुढें नाचती गोवळे। झोंबिया घेती एक वळें।' —ह १३. २२४. २ कज्जा; भांडण; तंटा. (क्रि० घेणें). 'की बांधिलेती आरोचकें। झोंबिआं विणू।' —शिशु ११९. ३ अंगलगट; आलिंगन. 'तारुण्याच्या वळें घेऊं धांवलीस झोंबी।' —निगा ९६. [झोंबणें] ०लोंबी—स्त्री. अगलट; कुस्ती. 'झोंबीलोंबीघेऊन। जाती टांकिती नेऊन।' —दावि ४०४.

**झोरा**—पु. (व.) थोडेसें सामान मावण्याजोगी, गळ्यांत अडकविण्याची, शिपायाजवळची कापडी पिशवी, बॅग. [हिं. झोला]

**झोरा**—पु. (बांधकाम) धाव्यांतील धारें; झरोका.

**झोरीमुशी**—स्त्री. समुद्रांतील मुशी नांवाच्या माशाची एक जात.

**झोरो**—पु. (राजा.) कृशता; अशक्तता. [झुरणें.]

**झोऱ्या**—पु. (खा.) १ जाड सुताडा. ह्या जाड्याभरड्या सुताचा असतो; बोऱ्या; पांढरें जाजम किंवा सतरंजी. २ (कों.) सुताराचें एक हत्यार.

**झोल–ळ**—पु. १वस्त्राचा सैल व हलणारा शेवटाचा भाग; घोळ; घेर (अंगरखा इ०चा). २ परिधान केलेल्या वस्त्राचा इतर पदार्थांस लागणारा लांब भाग, झोळ, घोळ. ३ कल; तोल; एकदम एका बाजूस वळणारी गति; झोंक; झटका; फेर; गिरकी. (क्रि० देणें). 'ऐकून मातेचा बोल। दिल्हा वनाकडे झोल।' ४ झोंका; डोल. 'झोल झोलों देवापासी जागावें रे।' —दावि २०३. —वि. थलथलीत. 'वर्षे उतार झोल शेवटीं।' —अकक २. उद्धवचिद्घन, शुकरंभासंवाद २६. [सं. दोल; प्रा. झुल्ल; म. झुलणें. हिं. झूलना] **झोकांडा**—पु. झोक; झोंकांडी. (क्रि० जाणें). **झोलणें**—अक्रि. झोंका घेणें; देणें; खाणें; डोलणें; हालणें. **झोलर, झोलार**—वि. घोळानें; फुगीर; झोल आलेलें (छत, वाज, वस्त्र, इ०). **झोलविणें**—सक्रि. झोंके घेणें, खाणें. देणें; हलविणें.

**झोल**—वि. (व.) लफंगा; लबाड.

**झोला**—पु. १ झोंका. (क्रि०देणें; घेणें.) २ फसवणूक; गप्प; कपट; लबाडी; टाळाटाळ. (क्रि०देणें.) ३ झोळ–ल; पदर; कांठ; सोगा. ४ घोळ सुटणें, सोडणें; झोलफुगारा (वस्त्राचा). ५ झोंपाळा; हिंदोळा. ६ गोता; हिसका. 'जो देता मधुकैटभ—कनककशिपुमुख—महासुरां झोले' —मोस्त्री २.३०. ७ धोका; संकट; त्रास. 'येमयातनेचा झोला। कठीण आहे।' —दा ११.३.८. ८ झोंक; कल; तोल. , 'डोले बोलत बोल तों न धरवे गेलाचि झोला भला।' —आसी ४४. [सं. दोला] **झोल**—स्त्री. झुकांडी; टाळाटाळ; टोलवाटोलवी. [झोलणें, झोलविणें द्वि.]

**झोलावणें**—अक्रि. डेरपोट्या, थलथलीत, गबदुल होणें असणें. [झोल]

**झोळ**—पु. झोल पहा. —वि. (ल.) मिथ्या; खोटा. 'ते देह झोळ ऐसें मानुनी। ठेले आपणपें-आपणवि होउनी।' —ज्ञा ८.६०. [झोल]

**झोळकंबणें, झोळंबणें**—उक्रि. लोंबकळणें; लोंबकळत राहणें, टेंगणें; झोके घेणें; हेलकावणें; हेलकावे घेणें.

**झोळकंबा–कुंबा–खंबा–खुंबा**—पु सैलपणें इकडेतिकडे, पुढेंमागें हलणें; झोल; झोका; लोंबकळी; हेलकावा. (क्रि० घेणें; खाणें). 'तदन्याय तरूवरतीं देव उफराटे झोळकंबे घेती।' —नव१२. १८१ २ झोपाळा; चोपाळा; पाळणा; झोला. [सं. दोला+खांब]

**झोळण**—स्त्री. घोळ; झोळ; फुगवट (वस्त्र, छत इ०चा). २ सुरकुती; वळी; आंठी. [झोळ]

